# शिक्षकांस सूचना.

—:०:—

हें व्याकरणाचें दुसरें पुस्तक मराठी पांचवी, सहावी आणि सातवी इयत्ता, इंग्रजी पहिली, दुसरी आणि तिसरी इयत्ता यांसाठीं आणि मराठी व इंग्रजी 'स्कूलफायनल' परीक्षेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं तयार केलें आहे. पहिलें पुस्तक हें मराठी तिसरी आणि चौथी या इयत्तांसाठीं आहे. प्रस्तुत पुस्तक हें पहिल्या पुस्तकाचा पुढील भाग म्हणून तयार केलेलें नसून यांत व्याकरणाचे सर्व भाग स्वतंत्रपणें पूर्ण लिहिलेले आहेत. इतकेंच कीं, पहिल्या पुस्तकांतल्या मजकुराचा विस्तृतपणा कमी करून या पुस्तकांत पुढील इयत्तांस लागणारे असे व्याकरणाचे सर्व भाग जास्त घातले आहेत. तसेंच पहिलें पुस्तक वाचनाच्या पुस्तकासारखें लिहून अगदीं सोपें करण्याचा प्रयत्न केला आहे; आणि हें पुस्तक सोप्या भाषेंतच परंतु शास्त्रीय पद्धतीवर लिहिलें आहे. हें पुस्तक मुलांच्या हातांत देण्यापूर्वी त्यांनीं **प्रथम-पुस्तक** वाचलेलें आहे असें मात्र समजलें पाहिजे.

व्याकरणाचीं हीं दोन्हीं पुस्तकें **मे० काव्हर्नटनसाहेब** यांनीं नवीन इयत्ता शिकविण्याबद्दल ज्या सूचना केल्या आहेत त्यांप्रमाणें तयार केलीं आहेत. प्रथमतः मुलांना ठाऊक असलेल्या गोष्टी उदाहरणांच्या द्वारें मुलांच्या ध्यानांत आणून देऊन मग एकेक व्याख्या आणि नियम हीं त्यांच्या तोंडांतूनच काढून घ्यावीं, अशी पद्धत पहिल्या पुस्तकांत योजिली आहे, तीच पद्धत या पुस्तकांत कायम ठेविली आहे. तसेंच, व्याकरण हा विषय पृथक्करण-पद्धतीनें शिकविण्याची योजना या पुस्तकांतही केली असून प्रथमतः वाक्य आणि त्याचे अवयव यांचें विवरण केलें आहे. आणि मग एकेक गोष्ट जशी ओघानें येत गेली तसतशी घेऊन तिचें विवरण केलें आहे.

व्याकरण शिकविण्याची ही तऱ्हा नवीन आहे. या तऱ्हेनें व्याकरण शिकवितांना शिक्षकास प्रथमतः जास्त श्रम घ्यावे लागतात असें वाटेल; परंतु अनुभवान्तीं त्यास कळून येईल, कीं यामुळें आपलें काम उत्तरोत्तर सोपें होत जाऊन मुलांना विषयही चांगला समजतो. या नवीन पद्धतीनें कसें शिकवावें हें मे० **काव्हर्नेटनसाहेब** यांच्या सूचनांमध्यें थोडक्यांत सांगितलें आहे. तेंच त्यांत विषयाच्या जरूरीपुरता थोडा फेरफार करून, पुढें उतरून घेतों:—

"शिक्षकानें नियम अथवा एकादी व्याख्या आरंभीं मुलांस कधींही सांगू नये; तर मुलांपुढें इष्ट कामास उपयोगीं पडण्यासारखीं उदाहरणें ठेवून, त्यांच्याकडून त्यांची तुलना व वर्गीकरण करवून आणि त्यांपासून निघणारीं अनुमानें काढवून मग जरूर त्या व्याख्या अगर नियम त्यांच्याकडून तयार करवून घ्यावे. उदाहरणार्थ, लिंगाची समजूत द्यावयाची असेल तर मुलांना कांहीं पदार्थांचीं नांवें घ्यावयास सांगून त्यांचें वर्गीकरण करावयास सांगावें. असें कीं त्या पदार्थांपैकीं प्राणिकोटींतील पुरुषजातीच्या पदार्थांचा वर्ग पहिला, स्त्रीजातीच्या पदार्थांचा वर्ग दुसरा आणि ज्यांच्या संबंधानें पुरुष, स्त्री, असा भेद केलेला नाहीं किंवा करितां येत नाहीं, अशा पदार्थांचा वर्ग तिसरा. नंतर या प्रत्येक वर्गास पुल्लिंग, स्त्रीलिंग, आणि नपुंसकलिंग अशीं नांवें देण्यास सांगावें. इतकी गोष्ट चांगली समजल्यावर अप्राणिवाचक अशीं नांवें घ्यावीं. यांतलीं पुरुषांच्या नांवांसारखीं आणि स्त्रियांच्या नांवांसारखीं, तसेंच दोहोंच्या नांवांसारखीं नाहींत अशीं, असे तीन वर्ग करून अप्राणिवाचक नामांनाही हा लिंगभेद कसा मानिलेला आहे, आणि मानण्यास पुरुषपणा किंवा स्त्रीपणा कारण नसून केवळ भाषेंतली रूढि कशी कारण आहे, हें नीटपणें समजावून द्यावें. जेव्हां नामें, विशेषणें वगैरे यांस लिंग, वचन, विभक्ति, यांचे प्रत्यय लागतात, तेव्हां त्यांच्या रूपांत लिंगादि भेदांनीं कसे फेरफार होतात, हेंही त्यांनीं समजावून द्यावें. तसेंच प्रयोग शिकवितेवेळीं लिंग, वचन वगैरेवरून होणारे फेरफार ज्यांत स्पष्ट होतील अशीं साधीं वाक्यें घेऊन त्यांची परस्पर तुलना करावी. मुलांस कळून येईल, कीं वाक्यांत क्रियापदाचें लिंग, वचन आणि

पुरुष हीं कर्त्यास अनुसरून बदलतात; कांहींत कर्मास अनुसरून बदलतात, आणि कांहींत दोघांच्याही संबंधानें बदलत नाहींत. या वर्गीकरणावरून त्यांना प्रयोगाचे तीन प्रकार समजतील आणि त्यांना कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग आणि भावेप्रयोग अशीं तीन नांवें देतील, व शेवटीं प्रयोगांच्या व्याख्या त्यांस देतां येतील. व्याकरणाच्या पुस्तकांत व्याख्या व नियम सांगून शेवटीं उदाहरणें दिलेलीं असतात. परंतु शिक्षकानें व्याकरण शिकवितांना त्याच्या उलट क्रम ठेवावा; म्हणजे उदाहरणांपासून आरंभ करून व्याख्या व नियम शेवटीं आणावे आणि वर सुचविल्याप्रमाणें मुलांच्या तोंडून व्याख्या व नियम काढून घेण्याचा यत्न करावा. ”

प्रस्तुतच्या व्याकरणाच्या दोन्हीं पुस्तकांत प्रथमतः उदाहरणांपासून आरंभ करून व्याख्या व नियम शेवटीं आणिले आहेत; म्हणजे सूचनांमध्यें सांगितल्याप्रमाणेंच विषयरचना मुद्दाम केली आहे, आणि प्रत्येक धड्याच्या अथवा प्रकरणाच्या शेवटीं 'अभ्यास' देऊन त्यांवरून शिकविलेल्या गोष्टींचें अधिक स्पष्टीकरण होण्याची योजना केली आहे.

नवीन पद्धतीप्रमाणें शिकवावयाचें म्हणजे मुलांकडून कांहींएक पाठ करून घ्यावयाचें नाहीं अशी कित्येकांची समजूत असते. पण ती सर्वस्वी खरी नाहीं.* विषयज्ञान झाल्याशिवाय केवळ घोकून पाठ करून घ्यावयाचें नाहीं, हें खरें. पण उदाहरणांच्या द्वारें एकेक गोष्टीची समजूत करून देऊन त्यांतील जरूरीच्या गोष्टी मुलांच्या ध्यानांत राहातील म्हणजे त्या त्यांना सहजीं पाठ होतील, असें तर झालेंच पाहिजे. व्याकरणांतील व्याख्या, नियम आणि शब्दांचीं निरनिराळीं रूपें या गोष्टी पाठ करून घेण्यास प्रत्यवाय नाहीं. परंतु अगोदर विषय समजावून न देतां शिक्षकानें हातांत पुस्तक घेऊन—'उद्यां इतकें पाठ करून या '—असा धडा मुलांना नेमून द्यावा आणि दुसरे

---

* पाठ करावयाच्या गोष्टी कोणत्या आणि त्या कशा रितीनें पाठ करून घ्याव्या याविषयीं ' शिक्षणोपयोगी मानसशास्त्र ' पृ० २५ आणि २६ यांतील मजकूर पाहावा.

दिवशीं तेवढा धडा म्हणून द्यावा, असें न होतां मुलांना विषय अगोदर नीट समजून मग त्यांतील ध्यानांत ठेवावयाचे प्रकार पाठ झाले पाहिजेत; आणि आवांतर प्रकार अभ्यासाच्या द्वारें मुलांना अवगत झाले पाहिजेत. एकदां विषय नीट समजल्यावर मग शास्त्रीय व्याख्या, नियम आणि रूपें ह्या गोष्टी पुस्तकांतल्याप्रमाणें मुलांना पाठ व्हाव्या हें बरें.

बालबोध व्याकरणाच्या प्रथम पुस्तकाचे, तें पुस्तक दोन इयत्तांकरितां नेमलेलें असल्यामुळें दोन स्वतंत्र भाग केले आहेत. तसें या पुस्तकांत केलें नाहीं. तसें केल्यानें अनेक विषयांची पुनरुक्ति होऊन पुस्तक फार वाढलें असतें. यासाठीं अशी योजना केली आहे कीं, पांचव्या इयत्तेस शिकवावयाचा विषय जाड टाइपांनीं आणि सहाव्या इयत्तेस शिकवावयाचा विषय बारीक टाइपांनीं छापला आहे; आणि पाठ करावयाच्या व्याख्या आणि नियम यांना सर्वांत जाड टाईप घातला आहे. तसेंच वाचणारांना व शिक्षकांना सूचनांदाखल लिहिलेल्या टीपा अगदीं बारीक टाइपांनीं छापल्या आहेत. जीं सबंध प्रकरणें केवळ सहाव्या इयत्तेस शिकवावयाचीं आहेत, त्यांचे आरंभींच तशी सूचना लिहिली आहे. मग त्या प्रकरणांत टाइपांचा भेद घ्यावयाचा नाहीं. तसेंच नामें व क्रियापदें चालवून दाखविलेलीं कोष्टकें आणि इतर कोष्टकें यांना छापण्याच्या सोयीप्रमाणें टाईप घातला आहे. ही व्यवस्था लक्षांत घेऊन पांचव्या आणि सहाव्या इयत्तेस विषय शिकवावा. सातव्या इयत्तेस सर्व पुस्तक उजळणीच्या द्वारें पुनः संगतवार शिकवावें.

शिक्षकांच्या आणि प्रौढ विद्यार्थ्यांच्या माहितीसाठीं मराठी भाषेच्या उत्पत्तीचा आणि वाङ्मयाचा संक्षिप्त इतिहास द्यावा अशी सूचना शाळाखात्याकडून झाल्यावरून तो इतिहास पुस्तकाच्या शेवटीं ३१ व्या प्रकरणांत थोडक्यांत दिला आहे.

---

# अनुक्रमणिका.

# बालबोध व्याकरण.

## पुस्तक दुसरें.

### १—वर्णविचार.

( १ ) आपण बोलतांना शब्दांचा उपयोग करितों, ते शब्द आपल्या तोंडांतून जे ध्वनि निघतात त्यांचे झालेले असतात. जसें,— ' मूल ' हा शब्द ' मू ' आणि ' ल ' या ध्वनींनीं झाला.

( २ ) हे ध्वनि निरनिराळे आहेत, आणि त्यांना निरनिराळीं नांवें आहेत. तसेंच, ते लिहितां यावे म्हणून त्यांच्या खुणा किंवा चिन्हेंही निरानिराळीं ठरविलेलीं आहेत. या ध्वनींना आणि त्यांच्या चिन्हांना **वर्ण** असें म्हणतात.

( ३ ) वर्ण दोन प्रकारचे आहेत. कांहीं असे आहेत कीं, ते आपल्या तोंडांतून स्पष्टपणें बाहेर निघतात; जसें,—अ, आ, ऊ, ए, इत्यादि. त्यांना **स्वर** असें म्हणतात.

( ४ ) कित्येक वर्ण असे आहेत कीं, ते आपल्या तोंडांतून उत्पन्न होतात, पण ते त्यांचे तेच स्पष्टपणें बाहेर येऊं शकत नाहींत; तसें होण्यास त्यांना स्वरांचें साह्य लागतें; जसें,—क्, ग्, प्, ल्, र्; यांना स्वरांपैकीं एखादा स्वर जोडून जेव्हां क, गे, पी, लू, रू, असें करावें, तेव्हां त्यांचा उच्चार तोंडाबाहेर येतो. असल्या वर्णांना **व्यंजनें** असें म्हणतात.

**( ५ ) व्याख्याः—बोलतांना आपल्या तोंडांतून जे ध्वनि निघतात, त्यांस किंवा ते लिहितां यावे म्हणून त्यांच्या खुणा किंवा चिन्हें ठरविलेलीं आहेत, त्यांना वर्ण असें म्हणतात.**

( ६ ) हे वर्ण दोन प्रकारचे आहेत; ( १ ) **स्वर** आणि ( २ ) **व्यंजनें.**

(७) ज्या वर्णांचा उच्चार आपोआप स्पष्ट होतो, त्यास स्वर असें म्हणतात.

(८) ज्या वर्णांचा उच्चार स्पष्टपणें करण्यास स्वराचें साह्य लागतें, त्यास व्यंजन असें म्हणतात.

(९) स्वरः—मराठी भाषेंत स्वर पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत:—

ऱ्हस्व स्वर—अ, इ, उ, ऋ, ऌ;
दीर्घ स्वर—आ, ई, ऊ, ॠ;
संयुक्त स्वर—ए, ऐ, ओ आणि औ.

(१०) ऱ्हस्व स्वर म्हणजे ज्यांचा उच्चार तोकडा होतो ते. दीर्घ स्वर म्हणजे ज्यांचा त्याहून जास्त म्हणजे त्यांच्या दुप्पट उच्चार होतो ते. संयुक्त स्वर हे अनेक स्वरांच्या जुळणीनें झालेले आहेत; जसें,—अ किंवा आ आणि इ किंवा ई मिळून ए; अ किंवा आ आणि ए मिळून ऐ; अ किंवा आ आणि उ किंवा ऊ मिळून ओ; आणि अ किंवा आ आणि ओ मिळून औ. संयुक्त स्वर हे दीर्घ स्वरच होत.

(११) ऋ, ॠ आणि ऌ हे स्वर संस्कृत भाषेंतून मराठींत जे शब्द येतात, त्यांमध्यें येतात; हे मराठींत नाहींत.

(१२) याप्रमाणें एकंदर स्वर तेरा आहेत.

टीप—अ हा ऱ्हस्व स्वर आणि त्याचाच आ हा दीर्घ स्वर असें मागें सांगितलें आहे; ही संस्कृतांतली व्यवस्था आहे. सांप्रत मराठींत या दोन्ही स्वरांचे ऱ्हस्व आणि दीर्घ असे भेद मानण्यास पाहिजे आहेत. उदाहरणार्थ,—'गॅवत' यांत पहिल्या 'ग' या अक्षरांतल्या अचा ऱ्हस्व उच्चार असून 'व' यांतला दीर्घ आहे. म्हणजे 'दीर' याचें 'दिरास' झालें असतां दीर्घ ईची जशी ऱ्हस्व इ होते, त्याचप्रमाणें गॅवत याचें गॅवॅतास असें झालें असतां 'व' यांतील अ याचा उच्चार दीर्घाचा ऱ्हस्व होतो.

असाच प्रकार आ या स्वराचाही आहे. जसें, दोरें यामध्यें दा यांतील आ दीर्घ आहे; पण दॉरास असें झालें असतां तो ऱ्हस्व होतो. तथापि ऱ्हस्व अ, आ आणि दीर्घ अ, आ असे भेद मानण्याची चाल अजून पडली नाहीं. यासाठीं येथें त्या दोन अक्षरांच्या दोन प्रकारच्या उच्चारांचें फक्त दिग्दर्शन केलें आहे.

(१३) **व्यंजनें:**—व्यंजनें पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत:—

| | |
|---|---|
| क्, ख्, ग्, घ्, ङ्,—कवर्ग | च्, छ्, ज्, झ्, ञ्,—चवर्ग |
| ट्, ठ्, ड्, ढ्, ण्,—टवर्ग | त्, थ्, द्, ध्, न्,—तवर्ग |
| प्, फ्, ब्, भ्, म्,—पवर्ग | य्, र्, ल्, व,—अर्धस्वर |

श्, ष्, स्,—सकारयुक्त वर्ण अथवा ऊष्म वर्ण;
ह्, ळ्, मिळून एकंदर चौतीस.

टीप—व्यंजनांत स्वर मिळाला नसल्यास तीं क्, ग्, प्, अशीं लिहावीं. तथापि सोपे-पणाकरितां तीं क, ग, प, अशींही लिहितात.

(१४) 'य्' वगैरे व्यंजनें कांहींशीं स्वरांसारखीं आहेत; म्हणून त्यांस **अर्धस्वर** असेंही म्हणतात. 'ह्' याचा उच्चार कर-ण्यास जास्त जोर लागतो, म्हणून त्यास **महाप्राण** असें म्हणतात.

(१५) व्यंजनाचा उच्चार त्यांत कोणतातरी स्वर मिळाल्या-खेरीज पूर्ण होत नाहीं. प्रत्येक व्यंजनांत एकेक स्वर मिळून पूर्ण उच्चारांचीं **अक्षरें** अशीं होतात:—क् + अ, क; क् + आ, का; क् + इ, कि; याप्रमाणें क, का, कि, की, कु, कू, के, कै, को आणि कौ; यांत आणखी अनुस्वार आणि विसर्ग ( जे पुढें क० २२ यांत सांगितले आहेत ते ) मिळून कं आणि कः अशीं बारा अक्षरें करितात. त्यांना **बाराखडी** असें म्हणतात.

टीप—संस्कृतांतले स्वर ऋ, ॠ आणि ऌ हे मिळवूनही कृ, कॄ, कॢ, अशीं अक्षरं करितां येतील.

(१६) **प्रत्येक स्वरास आणि स्वरयुक्त व्यंजनास अक्षर असें म्हणतात;** उदा०:—अ, ई, का, पू, री, हे, तो, ये, कृ, इत्यादि.

(१७) दोन अथवा अधिक व्यंजनांत स्वर मिळून जें अक्षर बनतें त्यास **संयुक्तअक्षर** किंवा **जोडाक्षर** असें म्हणतात; जसें:—न्य ( न् य् + अ ), प्र ( प् र् + अ ), त्र ( त् र् + अ ) इत्यादि.

टीप—क्ष् आणि ज्ञ् यांना व्यंजनामध्यें गणण्याची जुनी चाल आहे, पण हीं क् + ष् = क्ष् आणि ज् + ञ् = ( किंवा उच्चाराप्रमाणें द् + न् + य् ) =ज्ञ् अशीं जोडाक्षरें आहेत.

( १८ ) व्यंजनांचा उच्चार केला असतां असें दिसून येईल कीं, क् + ह् मिळून ख्; ग् + ह् मिळून घ्; प् + ह् मिळून फ्; अशा रितीनें पहिल्या पांच वर्गांतलीं पहिलीं व तिसरीं व्यंजनें यांत ह् मिळून दुसरीं व चौथीं व्यंजनें झालीं आहेत; ह् यास **महाप्राण** म्हणतात. म्हणून—

( १९ ) पहिल्या पांच वर्गांतील दुसरीं व चौथीं व्यंजनें आणि ह् यांना **महाप्राण** आणि बाकीच्या व्यंजनांस **अल्पप्राण** असें म्हणतात.

( २० ) पहिल्या पांच वर्गांतील पहिलीं दोन आणि शवर्गांतील व्यंजनें यांना **कठोरव्यंजनें**, आणि बाकीच्या सर्वांस **मृदुव्यंजनें** असें म्हणतात.

टीप—या व्यंजनांच्या उच्चारामध्यें असणारा कठोर आणि मृदु असा भेद उच्चार करून पाहिला असतां दिसून येईल.

( २१ ) पहिल्या पांच वर्गांतील शेवटचीं व्यंजनें ङ्, ञ्, ण्, न्, म्, यांचा नाकांतून उच्चार होतो, म्हणून यांस अनुनासिक व्यंजनें असें म्हणतात.

टीप—वास्तविक म् हें मूळचें एकच अनुनासिक व्यंजन आहे. याच्यापुढें कवर्गाचें अक्षर आलें असतां त्याचा उच्चार ङ् असा होतो, ( उदा०—तङ्क ); पुढें चवर्गाचें अक्षर आलें असतां ञ् उच्चार होतो, ( उदा०—सञ्चार ); टवर्गांतलें आलें असतां ण् सारखा उच्चार होतो, ( उदा०—घण्टा ); आणि तवर्गांतलें आलें असतां न् सारखा उच्चार होतो, ( उदा०—पन्त ); याप्रमाणें. अनुनासिकाचे ङ्, ञ्, ण्, न्, म्, असे पांच प्रकार झाले आहेत.

( २२ ) स्वर आणि व्यंजनें यांशिवाय **अनुस्वार** आणि **विसर्ग** असे दोन विशेष वर्णोच्चार आहेत.

( अ ) **अनुस्वार** म्हणजे अक्षराच्या माथ्यावर एक टिंब देऊन नाकांतून उच्चार करितात तो; जसें,—जें, तें, तळें, तों, जंव, तंव, घंटा, तंटा, भिंत, शंख, इत्यादि.

( आ ) **विसर्ग** म्हणजे अक्षरापुढें ( : ) अशीं दोन टिंबें देऊन ह् सारखा उच्चार करितात तो; जसें,—अधःपतन, दुःख, निःपात, छिः, थुः, इत्यादि.

( २३ ) अनुस्वाराचा उच्चार दोन प्रकारचा आहे. एक थोडकाच उच्चार, जसा—जंव, तंव, जों, तों, इत्यादि शब्दांत होतो तसा; आणि दुसरा अगदीं स्पष्ट उच्चार, तंटा, घंटा, पंथ, रंग, यांत होतो तसा. पहिल्यास मराठी अनुस्वार आणि दुसऱ्यास संस्कृतांतला अनुस्वार असें म्हणावें. मराठींतल्या उच्चारास **अनुनासिक** आणि संस्कृतांतल्या उच्चारास **अनुस्वार** असें कोणी म्हणतात.



( २४ ) हा जो दुसऱ्या प्रकारचा अनुस्वार, त्याचा उच्चार करण्याचे नियम असे आहेतः—( १ ) शब्दामध्यें अनुस्वारापुढें पहिल्या पांच वर्गांतलें

व्यंजन असल्यास अनुस्वाराचा उच्चार पुढील अक्षराच्या वर्गांतील अनुनासिका-सारखा होतो; उदा०:–रंग, रङ्ग; चंचू, चञ्चू; तंटा, तण्टा; पंत, पन्त; पिंपळ, पिम्पळ; इत्यादि. ( २ ) अनुस्वारापुढें य अथवा ल असल्यास त्या अक्षराचा उच्चार होऊन त्याचे अगोदर आणखी अनुस्वाराचाही उच्चार होतो; जसें,– संलग्न, सँल्लग्न; संयमन, सँय्यमन; इत्यादि. ( ३ ) अनुस्वारापुढें बाकी राहिलेल्या व्यंजनांपैकीं कोणतेंही असल्यास त्याचा उच्चार सानुस्वार 'व' सारखा होतो; उदा०:—संसार, सँव्सार; संशय, सँव्शय; संरक्षण, सँव्रक्षण; संहार, सँव्हार; इ०

( २५ ) वर्णांचा उच्चार तोंडाच्या निरनिराळ्या भागांपासून होतो. त्यावरून वर्णांचीं स्थानें मानिलीं आहेत व त्यांचे वर्ग केले आहेत, ते असे:—

| | स्वर | व्यंजनें | स्थान आणि वर्ग |
|---|---|---|---|
| १ | अ, आ विसर्ग | क्, ख्, ग्, घ्, ङ्, ह् | कंठस्थान, कंठ्यवर्ण. |
| २ | इ, ई | च्, छ्, ज्, झ्, ञ्, य्, श् | तालुस्थान, तालव्यवर्ण. |
| ३ | ऋ, ॠ | ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, र, ष्, ळ् | मूर्धास्थान, मूर्धन्यवर्ण. |
| ४ | ऌ | त्, थ्, द्, ध्, न्, ल, स् | दंतस्थान, दन्त्यवर्ण. |
| ५ | उ, ऊ | प्, फ्, ब्, भ्, म् | ओष्ठस्थान, ओष्ठ्यवर्ण. |
| ६ | | व् | दन्तौष्ठस्थान, दन्त्यौष्ठ्यवर्ण. |
| ७ | ए, ऐ | | कंठतालुस्थान, कंठतालव्यवर्ण. |
| ८ | ओ, औ | | कंठौष्ठस्थान, कंठौष्ठ्यवर्ण. |
| ९ | अनुस्वार | ङ्, ञ्; ण्, न्, म्, | नासिकास्थान. |

( २६ ) च-वर्गांतलीं अक्षरें च्, ज्, झ्, यांचे उच्चार दोन प्रकारचे होतात. एक—चमत्कार, जन, झंझावात, यांत होतो तसा; आणि दुसरा—चवाठा, जागा, झपाटा, यांत होतो तसा. पहिला उच्चार संस्कृतांतला म्हणजे तालव्य आणि दुसरा शुद्ध मराठींतला म्हणजे दंततालव्य आहे. तथापि कित्येक शुद्ध मराठी शब्दांतही पहिल्या उच्चारासारखा उच्चार होतो; जसें,—चंग, जंगल, इ०

---

## २—संधि.

( २७ ) संस्कृत भाषेंत असा नियम आहे कीं, दोन स्वर अथवा दोन व्यंजनें किंवा एक व्यंजन आणि एक स्वर जवळ जवळ आलीं असतां तीं एकांत एक मिळून जावीं, अथवा पुढल्यांत किंवा मागल्यांत कांहीं तरी फेरफार व्हावा. असें होण्याचें कारण उच्चार करण्यास सोपें जावें हें आहे. उदाहरणार्थ, 'राम + आश्रय' असें जर म्हणावयाचें आहे, तर उच्चार चट्दिशीं करण्यास 'म' यांतील 'अ' आणि 'आश्रय' यांतील 'आ' हे एकत्र मिळाले असतां बरें. यासाठीं 'रामाश्रय' असें एकदम म्हणण्याची चाल पडली. त्याचप्रमाणें शुद्ध मराठी शब्दांत आपणांस 'खिडकी+आंत' असें म्हणावयाचें असेल तर, आपण 'की' यांतील 'ई' स्वर कायम ठेवून 'आंत' यांतला 'आ' गाळितों, आणि खिडकींत' असें म्हणतों. तसेंच, 'सत्+जन' यामध्यें 'त्' आणि 'ज्' यांचा उच्चार एकदम करण्यांत 'त्' याचा 'ज्' झाला तर बरें, म्हणून आपण 'सज्जन' असें म्हणतों.

याप्रमाणें पाहिलें तर बाराखड्या आणि जोडाक्षरें हे संधीच आहेत. तसेंच घोडा+यावर=घोड्यावर, राम+नें=रामानें या रचनाही संधीच्याच आहेत. परंतु ज्यांत कांहीं विशेष प्रकार असतो ते संधी असें समजण्याची चाल आहे.

या फेरफारास **संधि** असें म्हणतात. संधि हे मुख्यतः संस्कृत शब्दांत होतात; क्वचित् मराठी शब्दांतही संधि करितात.

(२८) दोन वर्ण एकापुढें एक आले असतां दोहोंबद्दल एक वर्ण करितात, अथवा दोहोंबद्दल तिसराच वर्ण घालितात, किंवा दोहोंपैकीं एक गाळून दुसरा कायम ठेवितात; या प्रकारास संधि असें म्हणतात.

(२९) दोन स्वर एकमेकांपुढें येऊन जो संधि होतो, त्यास **स्वर-संधि** असें म्हणतात; आणि दोन व्यंजनें, अथवा एक व्यंजन आणि एक स्वर मिळून जो संधि होतो, त्यास **व्यंजनसंधि** असें म्हणतात.

टीप—संस्कृतांत संधिनियम, त्यांचे उपनियम आणि अपवाद वगैरे फार आहेत. येथें मुख्य मुख्य नियम तेवढे सांगितले आहेत.

(३०) **स्वरसंधिः**—स्वरसंधींचे मुख्य नियम असें आहेतः—

(१) संयुक्त स्वरांखेरीज कोणत्याही एखाद्या ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वरापुढें तोच स्वर [ ऱ्हस्व किंवा दीर्घ ] आला, तर दोहों-बद्दल तोच दीर्घ स्वर होतो; उदाहरणेंः—

घर + अनघर = घरानघर | जा + आवें = जावें
कुंभ + आर = कुंभार | क्रीडा + आरंभ = क्रीडारंभ
सिंह + आसन = सिंहासन | हरि + इच्छा = हरीच्छा
विद्या + अर्थी = विद्यार्थी | कवि + ईश्वर = कवीश्वर
भानु + उदय = भानूदय | पितृ + ऋण = पितॄण.

(२) अ किंवा आ या स्वरापुढें इ, उ, ऋ, यांपैकीं एखादा [ ऱ्हस्व किंवा दीर्घ ] स्वर आला, तर संधि असे होतातः—

अ किंवा आ + इ किंवा ई = ए;
उदा०– गज + इंद्र = गजेंद्र,
सुर + ईश्वर = सुरेश्वर,
राम + ईश्वर = रामेश्वर.
अ किंवा आ + उ किंवा ऊ = ओ;
उदा०– गंगा + उगम = गंगोगम,
सूर्य + उदय = सूर्योदय,
ब्रह्मा + इंद्र = ब्रह्मेंद्र.
अ किंवा आ + ऋ = अर्;
उदा०–देव + ऋषि = देवर्षि,
ब्रह्मा + ऋषि = ब्रह्मर्षि.
इ० इ०

( ३ ) अ किंवा आ यापुढें ए किंवा ऐ आल्यास दोहोंबद्दल ऐ होतो; आणि अ किंवा आ यापुढें ओ किंवा औ आल्यास दोहोंबद्दल औ होतो; उदाहरणें:—

| | |
|---|---|
| सुख + एव = सुखैव | गंगा + ओघ = गंगौघ |
| सर्वथा + एव = सर्वथैव | रक्त + ओष्ठ = रक्तौष्ठ |
| देव + ऐश्वर्य = देवैश्वर्य | मम + औदार्य = ममौदार्य. |

( ४ ) इ, उ, ऋ, [ ऱ्हस्व किंवा दीर्घ ] यांपुढें कोणताही विजातीय स्वर असल्यास पूर्वस्वराबद्दल अनुक्रमें य्, व्, र् होऊन मग पुढील स्वर त्यांत मिळतो; उदा०:—

| | |
|---|---|
| प्रीति + अर्थ = प्रीत्यर्थ | भी + आवें = भ्यावें |
| गुरु + आज्ञा = गुर्वाज्ञा | नदी + आंनीं = नद्यांनीं |
| सासू + आंनीं = सास्वांनीं | पितृ + आशा = पित्राशा. |

( ५ ) ए, ऐ, ओ, औ यांच्यापुढें कोणताही स्वर आला असतां त्यांबद्दल अनुक्रमें अय्, आय्, अव्, आव् होऊन मग पुढील स्वर त्यांत मिळतो; जसें:—

| | |
|---|---|
| गै + अन = गायन | नौ + इक = नाविक |
| क्रे + अ = क्रय | गो + ईश्वर = गवीश्वर. |

( ६ ) शुद्ध मराठी शब्दांतही प्रत्यय वगैरे लागतांना कांहीं संधि होऊन शब्दांचीं रूपें होतात. मराठीमध्यें बहुधा पुढील नियमांनीं संधि करितात:—

( अ ) केव्हां अगोदरचा स्वर राहून पुढील जातो; यास पूर्वरूपसंधि असें म्हणतात; उदाहरणें:—

खिडकी + आंतून = खिडकींतून
किती + एक = कितीक
नदी + आंत = नदींत.

( आ ) केव्हां अगोदरचा स्वर जाऊन पुढील स्वर राहतो; यास पररूपसंधि असें म्हणतात; उदाहरणें:—

| | |
|---|---|
| कर + ऊन = करून | घर + ई = घरीं |
| जन + ऐं = जनें | पाखरूं + ऐं = पाखरें. |

(३१) व्यंजनसंधिः—व्यंजनसंधीचे मुख्य नियम असे आहेतः—

(१) पहिल्या पांच वर्गांपैकीं अनुनासिकाशिवाय कोणत्याही व्यंजनापुढें श् खेरीज कठोर व्यंजन आलें असतां मागील व्यंजनाबद्दल त्याच्याच वर्गांतलें पहिलें व्यंजन होतें; उदा०ः–

ककुभ् + प्रांत = ककुप्प्रांत
शरद् + काल = शरत्काल
सरिद् + प्रवाह = सरित्प्रवाह.

(अ) या नियमाप्रमाणें च् किंवा ज् याबद्दल क् होतो; उदा०ः— वाच् + पति = वाक् + पति = वाक्पति.

(२) अनुनासिकाशिवाय कोणत्याही व्यंजनापुढें मृदु व्यंजन किंवा शब्दाच्या आरंभींचा स्वर आल्यास पहिल्या व्यंजनाबद्दल त्याच्या वर्गांतलें तिसरें व्यंजन येतें; उदा०ः–

| | |
|---|---|
| वाक् + वर = वाग्वर | अप् + द = अब्द |
| अच् + अन्त= अजन्त | भगवत् + गीता = भगवद्गीता |
| षट् + रिपु = षड्रिपु | अप् + ज = अब्ज |
| सरिद्+ उगम= सरिदुगम | षट् + अंग = षडंग. |

टीप—पुढें शब्द न येतां प्रत्यय आल्यास असा संधि होणार नाहीं. उदा०ः— पत् + अंति = पतंति.

(३) कोणत्याही व्यंजनापुढें अनुनासिक आलें असतां पहिल्या व्यंजनाबद्दल त्याच्या वर्गांतलें अनुनासिक किंवा तिसरें अक्षर होतें; उदा०ः–

वाक् + मन = वाङ्मन किंवा वाग्मन
षट् + मास = षण्मास किंवा षड्मास
जगत् + नाथ = जगन्नाथ किंवा जगद्नाथ.

(४) स् अथवा तवर्ग यांतील वर्णांपुढें ल्, श् किंवा चवर्ग यांतला वर्ण आला असतां पहिल्याबद्दल श् किंवा यथानुक्रम चवर्गांतले वर्ण होतात; त्याचप्रमाणें स् किंवा तवर्ग यांतील वर्णांपुढें ष् किंवा टवर्ग यांपैकीं वर्ण आल्यास पहिल्याबद्दल ष् किंवा यथानुक्रम टवर्गांतले वर्ण होतात. यथानुक्रम म्हणजे त् बद्दल च् किंवा ट्, थ् बद्दल छ् किंवा ठ्. उदा०ः—

| | |
|---|---|
| सत् + जन = सज्जन* | भगवत् + डमरु = भगवड्डमरु |
| तत् + चरित्र = तच्चरित्र | भूभृत् + ढक्का = भूभृड्ढक्का |
| सत् + लीला = सल्लीला | शरद् + झंझावात = शरज्झंझावात |
| तत् + टीका = तट्टीका | शनैस् + चर = शनैश्चर, इ० |

( ३२ ) संस्कृत शब्दांमध्यें विसर्गाचे संधि होत असतात. ते असेः–

( १ ) शब्दाच्या अंतीं र् अथवा स् आल्यास त्याचा प्रथमतः विसर्ग होतो; जसें,–पुनर्, पुनः; अधस्, अधः; इ०

( २ ) विसर्गापूर्वी अ असून पुढें अ अथवा मृदु व्यंजन आलें असतां विसर्गाचा उ होतो, आणि मग मागला अ आणि हा उ मिळून ओ होतो; उदा०:–मनः + राज्य = मनोराज्य; अधः + मुख = अधोमुख; मनः + वृत्ति = मनोवृत्ति; इ०

( ३ ) विसर्गाच्या पूर्वी अ, आ यांखेरीज स्वर असून पुढें स्वर किंवा मृदु-व्यंजन आल्यास विसर्गाचा र् होतो; उदा०:–निः + अंतर = निरंतर; बहिः + द्वार = बहिर्द्वार.

( ४ ) विसर्गापुढें च्, छ् आल्यास त्याचा श् होतो; ट्, ठ् आल्यास ष् होतो; आणि त्, थ् आल्यास स् होतो; उदा०:–शनैः + चर = शनैश्चर, रामः + टीकते = रामष्टीकते, अधः + तल = अधस्तल, इ०

( ३३ ) संस्कृतांत एकाच शब्दामध्यें ऋ, र्, किंवा ष्, यांच्या पुढें न् आला तर न् चा ण् होतो. असें होतांना ऋ, र्, ष् आणि न् यांच्यामध्यें स्वर, य्, र्, व्, किंवा ल्, अथवा कवर्गाचीं किंवा पवर्गाचीं अक्षरें आलीं तरी चालतात. मात्र न् च्या पुढें एखादा स्वर अथवा न्, म्, य्, व् यांपैकीं अक्षर असावें लागतें; उदा०:–कारण, मरण, तारण, तरण, इत्यादि; पण कृंतन, प्रसन्न, यांत 'न्' चा 'ण्' झाला नाहीं.

टीप १ – येथें थोडक्यांत माहिती होण्यापुरते संधिनियम दिले आहेत. यापेक्षां जास्त नियमांनीं झालेले संधि क्वचित् कवितेंत वगैरे येतील, ते तेवढ्यापुरते शिक्षकांनीं मुलांस समजावून द्यावे.

टीप २– 'वर्णविचार' हा भाग पुस्तकरचनेच्या सोईसाठीं प्रथमारंभीं दिला आहे. परंतु तो अमुकच वेळीं शिकविणें हें शिक्षकाच्या मर्जीवर आहे. व्याकरण शिकविण्यास आरंभ करणें तो पुढच्या भागापासूनच करावा. हा भाग निराळा आहे हें समजण्यासाठीं कलमांचे आंकडेही पुढील भागापासूनच दिले आहेत.

---

* या नियमाप्रमाणें संधि होतांना आणखी नियम ( २ ) प्रमाणेंही फेरफार होतात; उदा०:–सत्+जन=सद्+जन (नि० २)=सज्+जन=सज्जन. याचप्रमाणें शरज्झंझावात यांतही समजावें.

## ३–व्याकरण म्हणजे काय ?

१. आपण आपल्या मनांतला अभिप्राय शब्द बोलून दुसऱ्यास समजावितों; या आपल्या बोलण्यास **भाषा** असें म्हणतात.

२. भाषेचें शास्त्र असतें; त्यांत शुद्ध कसें बोलावें आणि ध्वनींच्या ज्या खुणा ठरल्या आहेत त्याप्रमाणें शुद्ध कसें लिहावें हें सांगितलें असतें; या शास्त्रास **व्याकरण** असें म्हणतात.

टीप–शुद्ध म्हणजे सुज्ञ लोक बोलतात तसें, असें समजावें.

**३. व्याकरण म्हणजे शुद्ध कसें बोलावें आणि लिहावें हें समजण्याचें शास्त्र.**

टीप—व्याकरणशास्त्रांत मूल वर्णांच्या योगानें शब्द कसे तयार करावे आणि त्यांचा बोलण्यांत व लिहिण्यांत नीट उपयोग करा करावा हें सांगितलेलें असतें, म्हणून व्याकरणाचे ( १ ) **वर्णविचार**, ( २ ) **शब्दविचार**, आणि ( ३ ) **वाक्यविचार** असे तीन भाग करितात.

## ४–शब्द.

४. आपण शब्दांनीं बोलतों. शब्द म्हणजे कांहीं अर्थ आहे असें एक अक्षर किंवा अधिक अक्षरांचा समुदाय; उदा०:—रामा, मुलगा, बाप, मनी, वाघ, पाटी, दौत, चांगला, बरा, चार, उंच, मी, तूं, तो, हा, गेला, आहे, बसेल, वर, छे, व, जरी, तरी, इ०

टीप—अक्षरें एके जागीं आलीं पण त्यांना कांहीं अर्थ नसला तर त्यांस शब्द असें म्हणतां येणार नाहीं; उदा०:–‘क म न र त,’ ‘वि ना पा,’ या अक्षरांना कांहीं अर्थ नाहीं; तेव्हां हे शब्द नव्हेत.

**५. ज्याला अर्थ आहे असें एक अक्षर अथवा अधिक अक्षरांचा समुदाय यास शब्द असें म्हणतात.**

६. बोलतांना शब्दांचा निरनिराळ्या तऱ्हेचा उपयोग होतो; त्यावरून शब्दांचे निरनिराळे प्रकार झाले आहेत; ते असे:—

( १ ) कांहीं शब्द पदार्थांचीं नांवें असतात; जसें,–रामा, मुलगा, मनी, मुलगी, भाऊ, बाप, पाटी, लेखणी, हौद, दौत, राग, मन, रजेड, पुस्तक, इ०. यांना व्याकरणांत **नामें** असें म्हणतात.

( २ ) दुसरे कांहीं शब्द या नांवांबद्दल येतात; जसें,–मी (जो बोलतो तो मनुष्य), तूं (ज्यापाशीं बोलावयाचें तो), तो (मनुष्य), हा ( मुलगा ), हें ( जनावर ), इ०. यांना **सर्वनामें** म्हणतात.

( ३ ) कांहीं शब्द पदार्थांविषयीं कसा, किती, असें **विशेष** कांहीं सांगतात; जसें,–बरा, काळा, गोरा, उंच, चार, पांच, इत्यादि. यांना **विशेषणें** म्हणतात.

( ४ ) कांहीं शब्दांवरून पदार्थांचें **असणें** किंवा **करणें**, म्हणजे **व्यापार**, याविषयीं समजतें; जसें,–असतो, बरोल, वाचीन, गेला, लिहिलें, द्यावें, इ०. यांना **क्रियापदें** म्हणतात.

( ५ ) कांहीं शब्दांवरून पदार्थ वगैरे कांहीं कळत नाहीं; परंतु ते शब्द वाक्यांत कोठें, केव्हां, कशा प्रकारानें, असा कांहीं अर्थ दाखवितात, अथवा शब्द आणि वाक्यें जोडितात; जसें,–काल, आज, लौकर, फार, जेव्हां, वर, खालीं, पुढें, आंत, ( त्या– ) कडे, ( हरी– ) मुळें, आणि, आणखी, इत्यादि. यांना **अव्ययें** असें म्हणतात.

टीप—हीं पांच कलमें म्हणजे व्याख्या नसून केवळ समजुनीसाठीं केलेलं स्पष्टीकरण आहे.

( ६ ) याप्रमाणें शब्दांच्या पांच जाती आहेतः– ( १ ) नामें, ( २ ) सर्वनामें, ( ३ ) विशेषणें, ( ४ ) क्रियापदें आणि ( ५ ) अव्ययें.

---

## अभ्यास

### १.

१ आपण आपल्या मनांतला भाव दुसऱ्यास कसा समजावितों ?

२ भाषा कशाला म्हणतात ?

३ भाषेचें शास्त्र म्हणजे काय ?

४ भाषेच्या शास्त्रास काय म्हणतात ?
५ व्याकरण म्हणजे काय ?
६ व्याकरणशास्त्राचे विभाग कोणते आहेत ?
७ वर्ण म्हणजे काय ?
८ शब्द म्हणजे काय ?
९ शब्दांचे निरनिराळे प्रकार किती व कोणते आहेत ?
१० शब्दांच्या प्रत्येक प्रकारावरून काय काय कळतें ?
११ पुढें सांगितलेल्या प्रत्येक प्रकारच्या शब्दांचीं कांहीं उदाहरणें सांगाः– नामें, सर्वनामें, विशेषणें, क्रियापदें, अव्ययें.

---

## ५–वाक्य.

७. ' आई बोलते, ' यांत आई काय करिते हें सांगितलें; ' पक्षी उडाला, ' यांत पक्ष्यानें काय केलें हें सांगितलें; ' आज सुटी आहे, ' यांत आज काय आहे हें सांगितलें; ' वासरें पळतात, ' यांत वासरें काय करितात हें आपण बोलतों. अशा रितीनें आपल्या प्रत्येक बोलण्यास आपण कांहीं तरी म्हणतों; असें जें आपलें एकेक **म्हणणें**, त्याला **वाक्य** असें म्हणावें.

( अ ) बोलणें नीट समजण्यास निदान दोन शब्द तरी पाहिजेत; नुसतें ' मांजर ' म्हटल्यानें कांहीं समजावयाचें नाहीं, अथवा ' पळतें ' एवढ्यावरूनही कांहीं कळणार नाहीं; तर ' मांजर पळतें ' असें जुळून म्हटलें पाहिजे.

( आ ) तसेंच, जे शब्द बोलावयाचे, त्यांपासून थोडा तरी अर्थ पुरा झाला पाहिजे. ' आई निघून, ' ' हरी जातां, ' ' पक्षी उडतांना, ' असें म्हटलें तर अर्थ पुरा होत नाहीं.

( इ ) तेव्हां यावरून दिसून येईल कीं, वाक्य होण्यास निदान

दोन तरी शब्द पाहिजेत; आणि त्यांचा परस्परांशीं संबंध नीट जुळून त्यांवरून कांहीं तरी पूर्ण अर्थ झाला पाहिजे.

८. बोलण्यामध्यें शब्दांचा परस्परांशीं नीट संबंध जुळून पुरा अर्थ झाला, म्हणजे त्या बोलण्यास वाक्य असें म्हणावें.

---

## अभ्यास

### २.

१ पुढें जे शब्द दिले आहेत, त्यांचीं वाक्यें होतात काय ? होत नसल्यास त्यांत बदल करून वाक्यें कराः–मुलगा शाळेंत. घरीं बसतो. मांजर पळत. असें बोलून. माणसें जेवावयास. घरांत चाकर. तो मुलगा आपल्या आईची वाट. हरी पक्ष्यास. पाहतो आणि मारितो. मुलगे रुमालांत. पुस्तकें बांधितात. गुराखी गाई कुरणांत. हरीचा बाप आणि भाऊ. गोष्ट शेवटपर्यंत. वाचा धडे. ईश्वर दयावंत. मुलांनो वडिलांची आज्ञा.

२ पुढील वाक्यांतील शब्दांच्या जाती सांगाः–मुलगे आणि मुली शाळेस जातात. उनाड मुलें रस्त्यांत खेळतात. आजारी माणूस घरीं बसला. गरुड हा पक्षी आहे. घार आकाशांत उंच उडते. पांढरा पक्षी दुरून दिसतो. पंतोजी लेखणी करितील. आम्ही पुस्त्या लिहूं. मीं एक पीस घेतलें. वासरूं दूध पितें. गाय थोडें दूध देते. सोमा गवळी दूध आणितो. विद्यार्थ्यानें पुस्ती लिहिली.

**सूचना**—वरील वाक्यांवर मुलांस आणखी प्रश्न करून वाक्याची ओळख करून द्यावी.

---

९. या सर्व वाक्यांवरून दिसून येईल कीं, प्रत्येक वाक्यांत कोणाबद्दल कांहीं तरी सांगितलेलें असतें. यावरून प्रत्येक वाक्याचे दोन भाग असतात असें दिसून येईल. एकामध्यें पदार्थाचें नांव घेऊन तो पदार्थ आपल्या मनांत येईल असें केलें असतें; आणि दुसऱ्यामध्यें त्याविषयीं जें आपल्यास सांगावयाचें असतें तें सांगितलें असतें.

(अ) प्रत्येक वाक्यामध्यें हे दोन भाग अवश्य असतात. त्यांवांचून वाक्य होणार नाहीं.

(आ) वाक्याच्या पहिल्या भागावरून **ज्याविषयीं बोलावयाचें** त्याचा आणि दुसऱ्या भागावरून **जें बोलावयाचें** त्याचा बोध होतो.

१०. ज्याविषयीं बोलावयाचें त्यास **उद्देशून** आपण बोलतों, म्हणून त्यास **उद्देश्य** असें म्हणावें; आणि उद्देश्याविषयीं आपण **बोलतों** म्हणजे **विधान करितों,** म्हणून त्यास **विधेय** असें म्हणावें; उदाहरणार्थ,— 'पक्षी उडाला,' यांत **पक्षी** हें **उद्देश्य** आणि **उडाला** हें **विधेय.**

११. आतां पुढील वाक्यें पाहा:—

(१) पक्षी । उडाला.

(२) मोठा पक्षी । उंच उडाला.

(३) मोठा पांढरा पक्षी । वर उंच उडाला.

(४) मोठा पांढरा चपळ पक्षी । फार त्वरेनें वर उंच उडाला.

(अ) या प्रत्येक वाक्यांत **पक्षी** याविषयीं **उडाला** असें सांगितलें आहे. पण दुसऱ्या, तिसऱ्या, आणि चौथ्या वाक्यांत **उद्देश्य** आणि **विधेय** या दोन्ही भागांविषयीं कांहीं जास्त सांगितलेलें आहे.

(आ) उद्देश्याविषयीं जें कांहीं जास्त सांगितलें आहे तें विशेषणांच्या योगानें (साह्यानें) सांगितलें आहे; आणि विधेयाविषयीं जें सांगितलें आहे तें अव्ययांच्या योगानें (साह्यानें) अथवा तसल्या शब्दांनीं सांगितलें आहे.

(इ) उद्देशाचा एकच शब्द असतो, तेव्हां तो नाम, सर्वनाम किंवा विशेषण असतो. विधेयाचा एकच शब्द असतो तेव्हां तो **क्रियापद** असतो.

१२. उद्देश्य आणि त्याच्याबरोबरचे शब्द यांमिळून झालेला वाक्याचा जो भाग त्यास **उद्देश्यांग** असें म्हणावें; आणि विधेय आणि त्याच्याबरोबरच्या शब्दांमिळून झालेला जो भाग त्यास **विधेयांग** असें म्हणावें.

---

## अभ्यास

### ३.

१ पुढील वाक्यांमधील प्रत्येक वाक्यांतलें उद्देश्यांग आणि विधेयांग व उद्देश्य आणि विधेय सांगाः—मुलगा पत्र वाचितो. बकरीं आणि मेंढरें कुरणांत चरतात. पाऊस फार पडला. काल संध्याकाळीं गारांचा पाऊस पडला. रामा हरीला धोंडा मारितो. कांहीं मुलें तळ्याच्या कांठीं गेलीं. मुलांनीं मौजेनें तळ्यांत दगड फेंकले. एक मोठा दगड एका बेडकाला लागला. दुर्गी गाणें म्हणते. मांजर उंदीर धरितें. मोठाले पक्षी उंच उडतात. लहान पक्षी उंच उडत नाहींत. गाडीचे घोडे भरधांव चालतात. कांहीं शेतकरी नांगर हाकतात; दुसरे दाणे पेरतात. ते मुलगे घरीं चालते झाले. रामा आज गांवाहून आला. पंतोजी मुलांस शिकवितो. पोपट शिकविलेले शब्द बोलतात. आमची मैना गाणीं गाते. घोडा मोठ्यानें खिंकाळला. पावसाळीं पुष्कळ झाडें नवीन उगवतात. आम्हांस मोठी मौज दिसली. तो मौज पाहात रस्त्यांत उभा राहिला आहे. माझा सोबती मला इतिहासाचें पुस्तक देईल.

२ वाचनाचें पुस्तक घेऊन त्यांतील वाक्यांवरून उद्देश्यांग, विधेयांग, उद्देश्य, विधेय, या गोष्टी मुलांस विचाराव्या.

---

१३. उद्देश्यांग यामध्यें उद्देश्याचा विस्तार करण्यासाठीं विशेषणें घातलीं आहेत. विधेयांगामध्यें विधेयाचा विस्तार करण्यासाठीं अव्ययांचा उपयोग केला आहे. उद्देश्य आणि विधेय हीं विस्तृत नसलीं तरी वाक्याचा अर्थ पुरा होतो. आपणांस जास्त अर्थ हवा असला तर मात्र तीं विस्तृत करावयाचीं.

( अ ) उद्देश्य वाढविणाऱ्या शब्दांस **उद्देश्य-विस्तार** आणि विधेय वाढविणाऱ्या शब्दांस **विधेय-विस्तार** असें म्हणावें; उदाहरणार्थ,– ' पांढरा पक्षी फार उंच उडाला ' यांत उद्देश्य–पक्षी, उद्देश्यविस्तार–पांढरा, विधेय–उडाला, आणि विधेयविस्तार—फार उंच.

१४. क्रियापदाच्या योगानें उद्देश्याबद्दल काय करणें हें सांगितलें असतें, यामुळें **उद्देश्य,** आणि **क्रियापद** म्हणजे **विधेय,** यांच्या योगानें वाक्य पूर्ण होतें. परंतु कित्येक क्रियापदांचा **करणें** असा अर्थ असतां, **काय** करणें हें सांगावें लागतें; एरव्हीं त्यांचा अर्थ पूर्ण होत नाहीं; उदाहरणार्थ,—' हरी बसतो, ' यांत **हरी** याविषयीं **बसतो** यानें पूर्णपणें काय सांगावयाचें तें सांगितलें. परंतु ' हरी लिहितो, ' यांत लिहितो काय, तर अमुक,–**पत्र** असें काय तें सांगावें लागतें; एरव्हीं वाक्याचा अर्थ पुरा होत नाहीं, हें ' जें **काय** करितो ' हें सांगावें लागतें, त्यास **कर्म** असें म्हणतात; उदा० :—' हरी पत्र लिहितो. ' ' मुलगे पुस्त्या काढितात. ' ' मुलें फुलें वेंचितात. ' ' धनी गडी बोलावील, किंवा गड्यास बोलावील. ' ' मी त्या मुलाला आणितों, ' ' बाप हरीला शाळेंत घालील. ' ' चाकर काम करितात. ' यांत **पत्र, पुस्त्या, फुलें, गडी, गड्यास, मुलाला, हरीला** आणि **काम** हीं कर्में होत. कर्मदर्शक शब्द नाम, सर्वनाम किंवा विशेषण असतो.

टीप—कर्मदर्शक शब्द पत्र, पुस्त्या, फुलें, इत्यादि असा साधा असतो, अथवा त्याला गड्यास, मुलाला, इत्यादि असें कांहीं निराळें स्वरूप येतें; ही गोष्ट मुलांच्या लक्षांत आणून द्यावी. याविषयीं जास्त माहिती पुढें होईल.

१५. यावरून दिसून येईल कीं, कोणत्याही वाक्याचे मुख्य भाग दोनः—( १ ) उद्देश्यांग, आणि ( २ ) विधेयांग. उद्देश्यांगाचे भाग दोनः– ( १ ) उद्देश्य, आणि ( २ ) उद्देश्यविस्तार. विधेयांगाचे भाग तीनः–( १ ) विधेय, ( २ ) कर्म ( त्याच्या विशेषणांसह ), आणि ( ३ ) विधेयविस्तार.

टीप—हे सर्व भाग वाक्यांत नेहमीं असतात असें नाहीं. केव्हां सर्व असतात, केव्हां कांहीं असतात. उद्देश्य आणि विधेय, व क्रियापद सकर्मक असल्यास त्याचें कर्म, हीं मात्र प्रत्येक वाक्यांत नेहमीं असलींच पाहिजेत.

१६. पुढील वाक्यांचे निरनिराळे भाग कोष्टकामध्यें स्पष्ट दाखविले आहेत:—( १ ) हरी कुत्र्यामागें धांवतो. ( २ ) हुषार मुलगा आपले धडे मन लावून करितो. ( ३ ) आमचा चाकर गांवाला गेला. ( ४ ) गरुडपक्षी आकाशांत फार उंच उडाला. ( ५ ) माझा भाऊ पत्रें लिहितो. ( ६ ) मुलांनीं आपल्या पुस्त्या लिहिल्या. ( ७ ) पंतोजींनीं आमचा धडा समजावून सांगितला.

| उद्देश्यांग | | विधेयांग | | |
|---|---|---|---|---|
| उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
| हरी | | धांवतो | | कुत्र्यामागें |
| मुलगा | हुषार | करितो | आपले धडे | मन लावून |
| चाकर | आमचा | गेला | | गांवाला |
| गरुडपक्षी | | उडाला | | आकाशांत, फार उंच |
| भाऊ | माझा | लिहितो | पत्रें | |
| पुस्त्या | आपल्या | लिहिल्या | | मुलांनीं |
| धडा | आमचा | सांगितला | | पंतोजींनीं समजावून |

## अभ्यास

### ४.

१ पुढें वाक्यें दिलीं आहेत त्यांतील उद्देश्यांग, विधेयांग, उद्देश्य, विधेय आणि कर्म, या गोष्टी कोष्टक देऊन सांगाः—पक्षी झाडांवर बसून फळें खातात. उद्यां सुटीच्या वेळीं आपण मैदानांत खेळावयास जाऊं. बाबा गांवाला गेले. माझा भाऊ मला दर रविवारीं पत्र लिहितो. रात्रीं आकाशांत असंख्य तारे प्रकाशतात. तुम्ही गणित शिकावयास कोठें जातां ? हरी आपले धडे केव्हां करील ? विठू कुत्र्यामागें धांवतांना पडला. वाईट मुलगे पक्ष्यांस दगड मारितात. बेडकांना दगड मारूं नका. मीं त्याला आपलें पुस्तक दिलें. हरीनें उदाहरण सोडविलें.

२ याप्रमाणें वाचनाच्या पुस्तकांतून वाक्यें करून घ्यावीं.

---

## ६–नामविचार.

१७. मनुष्यें, इतर प्राणी, झाडें आणि दुसरे जे पदार्थ, ते जवळ असोत, दूर असोत; दिसत असोत अथवा नसोत, ते आपल्यास ठाऊक असले ह्मणजे त्यांस आपण नांवें देतों. या नांवांना व्याकरणांत **नामें** असें म्हणतात.

टीप—पदार्थ किंवा वस्तू म्हणजे जें कांहीं तरी अमुक म्हणून सांगतां येतें किंवा ज्याचें नांव घेतलें कीं, आपल्या मनास त्याची कांहींतरी आकृति ठरवितां येते, तें; त्याचें जें नांव तें नाम; कित्येक पदार्थ आपणास प्रत्यक्ष दिसतात; जसें,–मनुष्य, पोथी, पुस्तक, लेखणी, झाड, गाय, हत्ती, पशू, सूर्य, इत्यादि. कित्येक प्रत्यक्ष दिसत नाहींत, परंतु दिसण्यासारखे आहेत असें आपणास ठाऊक असतें; जसें,–मुंबई, काशी ( शहर ), गंगा ( नदी ), हिमालय, बर्फ, युरोप, धबधबा, घांट, फूल, इत्यादि. कित्येक केवळ मनानें कल्पना करून जाणावयाचे असतात. जसें,—देव, परमेश्वर, मन, लाभ, रोग, आकर्षण, उंची, जडपणा, करणें, बोलणें, न्याय, अन्याय, भूत, राक्षस, पिशाच्च, जाडी, गोरेपण, इत्यादि. अशा सर्व पदार्थांना जीं आपण नांवें देतों, तीं नामें.

**१८. लक्षणः—नाम म्हणजे पदार्थाचें नांव.**

टीप— पदार्थास जें कांहीं आपण म्हणतों तें नाम, तो पदार्थ नाम नव्हे; उदाहरणार्थ,—'पाटी' हा शब्द नाम,—'पाटी' हा पदार्थ नाम नव्हे.

(अ) नामांचीं उदाहरणें:—

(१) माणसांचीं नांवें:—रामा, विठू, हरी, शिक्षक, विद्यार्थी, चाकर, राजा, प्रजा, मूल, बाई, पाटील, कुळकरणी, इ०

(२) इतर प्राण्यांचीं नांवें:—वाघ, सिंह, डुक्कर, मांजर, पोपट, मोर, सरडा, घोडा, सर्प, विंचू, मासे, घूस, मुंगूस, इ०

(३) देशांचीं, गांवांचीं व स्थलांचीं नांवें:—गुजराथ, पंजाब, इंग्लंड, बंगाल, पुणें, मुंबई, सुरत, पंचवटी, पर्वती, इ०

(४) झाडांचीं, फळांचीं व इतर पदार्थांचीं नांवें:—पिंपळ, नारळ, लिंबू, बदाम, गुलाब, जाई, पाट, लेखणी, शाई, कागद, पान, पेरू, आंबा, फणस, डाळिंब, पाटी, बूक, इ०

(५) दिसत नाहींत अशा वस्तूंचीं नांवें:—राग, मन, उंची, लोभ, आनंद, दुःख, गोडी, उन्हाळा, थंडी, करणें, कांडण, दळण, कृति, रडणें, पित्त, वारा, इ०

याप्रमाणें जेवढीं म्हणून नांवें त्यांना व्याकरणांत **नामें** असें म्हणतात.

---

## ७—नामांच्या जाती.

१९. कित्येक नामें अशीं असतात कीं, तीं एकसारख्या एकाच प्रकारच्या, एकाच जातीच्या किंवा एकाच गुणाच्या सर्व पदार्थांस आणि त्यांतल्या प्रत्येकास देतां येतात. जसें,—गाय, घोडा, माणूस, घर, गांव, आंबा, पेरू, इत्यादि. कित्येक एकाच जातीच्या सर्व पदार्थांस अथवा त्यांच्या भागांस देतां येतात; उदा०:—लांकूड, गहूं, तांदूळ, पाणी, माती, इत्यादि.

२०. अशा रीतीनें हीं नामें सामान्यीकरून एका जातीच्या

सर्व पदार्थांस, आणि त्या जातीच्या प्रत्येक पदार्थास किंवा त्याच्या भागास देतां येतात, म्हणून यांस **सामान्यनामें** असें म्हणतात.

२१. कित्येक नामें अशीं असतात कीं, तीं ज्यांना दिलेलीं असतात, त्यांना तीं त्यांची जात, त्यांचा गुण अथवा त्यांचा प्रकार यांवरून दिलेलीं नसतात; तीं ज्यांचीं असतात, त्यांस मात्र **विशेषें-करून** लागतात, म्हणून त्यांस **विशेषनामें** असें म्हणतात; उदाहरणें:—रामा, गोविंदा, काशी, गंगा, देशपांडे, जोशी, आगरकर, ढवळे, मुंबई, नगर, सोलापूर, हिमालय, इंग्लंड, लंडन, वाघ्या, सांवळ्या, पिऱ्या, टिपू, इत्यादि.

२२. तेव्हां नामांच्या दोन जाती आहेत:—( १ ) **सामान्य-नामें** आणि ( २ ) **विशेषनामें.**

**( १ ) एकाच जातीच्या पदार्थांस सामान्यैंकरून दिलेलीं नांवें तीं सामान्यनामें.**

**( २ ) नियमित पदार्थांस त्यांचीं त्यांसच विशेषेंकरून दिलेलीं जीं नांवें तीं विशेषनामें.**

२३. कित्येक नामांपासून एकाच जातीच्या पदार्थांचा स्वभाव, गुण, किंवा धर्म, यांचा बोध होतो; उदाहरणार्थ,—**धैर्य** यापासून धीट मनुष्यांचा गुण कळतो; **मैत्री** यापासून मित्रांचा धर्म कळतो; **गोडी** यापासून गोड पदार्थांचा गुण कळतो; इत्यादि. या प्रका-रच्या नामांस **भाव–वाचक–नामें** असें म्हणतात.

**( १ ) एकाच जातीच्या पदार्थांमध्यें असणारा गुण, स्वभाव, किंवा धर्म यांचीं जीं नांवें, त्यांस भाववाचकनामें असें म्हणतात.**

**उदाहरणें:**—मनुष्यपण, भलेपण, नीचपण, चांगलेपणा, शत्रुत्व, मित्रत्व, जडत्व, जडता, गुलामगिरी, पाटीलकी, भालेरावी, गरीबी, लुच्चेगिरी, श्रीमंती, चपळाई, मोवाळी, मधुकरी, शांतता, धिटाई, माधुर्य, उष्णता, इत्यादि.

टीप-भाववाचकनामें हा नामांचा निराळा प्रकार नसून सामान्यनामांचाच प्रकार आहे; कारण 'धैर्य' म्हटलें कीं, तें जितके धीट लोक असतील त्या सर्वांमध्यें सामान्येंकरून आढळेल. याचप्रमाणें गोडी, श्रीमंती, चांगलेपणा, इत्यादि नामांचें समजावें.

(अ) केव्हां भाववाचकनामाचा अगदीं सामान्यनामाप्रमाणेंच उपयोग होतो; उदा०:-'तुम्हीं यांत काय **थोरपणा** केला?' 'ज्याचें **शहाणपण** त्याच्याबरोबर.' इत्यादि.

२४. सामान्यनाम आणि विशेषनाम यांतला भेद असा आहे कीं, एखादें सामान्यनाम ज्या अनेक पदार्थांस देतां येतें, त्या सर्व पदार्थांमध्यें कांहीं तरी एक **सामान्य** म्हणजे **सर्वांमध्यें असणारा** असा गुण असतो; जसें,-गाय, घोडा, हत्ती, यांमध्यें प्रत्येकीं एकमेकांपासून भिन्न, पण सर्वांमध्यें सारखा असा गुण आहे; **चाकर** म्हटला म्हणजे सेवा करणारा; **वैद्य** म्हणजे औषधें देणारा; इत्यादि. परंतु विशेषनामामध्यें तसा सामान्य गुण नसतो. एका मनुष्यास 'विठू' असें नांव दिलें तर अगदीं त्याच्याचसारखा दुसरा मनुष्य असला म्हणून त्यास 'विठू' च म्हटलें पाहिजे असें नाहीं.

२५. (१) केव्हां **सामान्यनाम** अर्थावरून विशेषनाम होतें; उदाहरणार्थ,-हिमालय, म्हणजे बर्फांचें स्थान, हें नांव सामान्येंकरून ज्यावर बर्फ आहे अशा कोणत्याही पर्वतास देतां येईल, परंतु तें आतां हिंदुस्थानच्या उत्तरेस जो पर्वत आहे त्यास मात्र देतात, म्हणून तें विशेषनाम झालें. याचप्रमाणें पंचवटी, पंजाब, मध्यप्रांत, महानदी, इत्यादि नामांचें समजावें.

(२) तसेंच केव्हां विशेषनाम अर्थावरून सामान्यनाम होतें; उदाहरणार्थ,—**कर्ण** हें विशेषनाम आहे; पण पूर्वीं '**कर्ण**' म्हणून जो योद्धा होऊन गेला, तो मोठा उदार होता; म्हणून सांप्रत आपण एखाद्या उदार मनुष्यास **कर्ण** असें म्हणतों. याचप्रमाणें, जमदग्नि, बाजीराव, कैकेयी, रावण, भीम, बृहस्पति, कुंभकर्ण, इत्यादि.

---

## अभ्यास

### ५.

१ पुढील नामांतलीं सामान्यनामें, विशेषनामें, आणि भाववाचकनामें सांगा:-सागर. नदी. देव. इंद्र. कुबेर. वरुण. गवत. कविता. मांजर. पंचवटी. नगर. काशी. प्रांत. मध्यप्रांत. गरीबी. धिटाई. मिठाई. धैर्य. चित्र. पाटी.

स्लेटपाटी. लेखणी. पेनसील. सिसपेन. चंद्र. तारे. सूर्य. शनि. ग्रह. तांबें. पैसा. रुपया. पावली. पांचशेरी. पायली. राज्य. राजा. सातारा. प्रधान. टेकडी. डोंगर. तैमूर. अकबर. धीर. वीर. पुरुष. पंतोजी. पाटीलकी. कुळकरण. कुळकरणी. चावडी. भाषा. वर्ग. फौज. व्याकरण. नियम. व्याख्या. पगार. गहूं. भात. तांदूळ. हरभरा. उत्पन्न. उत्पत्ति. दळण. कांडण. चाळण. माळी. माळण. सैन्य. त्रेधा. उजळणी. बाण. पांडव. दुःख. नातें. निष्ठुरता. घड्याळ. चेहेरा. स्थिति. उंची. कत्तल. लोणी. श्रेष्ठत्व. वाळू. पांढरेपणा. गोडी. पाणी. लढाई. बाजरी.

२ पुढील वाक्यांत कोणतीं सामान्यनामें अर्थावरून विशेषनामें झालीं आहेत आणि कोणतीं विशेषनामें सामान्यनामें झालीं आहेत हें सांगाः— तो भोळा सांब आहे. हिंदुस्थानांत पंजाब म्हणून एक प्रांत आहे. श्वेतसमुद्रांत निरंतर बर्फ असतें. हरी मोठा बाजीराव आहे. मध्यप्रांतांत गहूं पिकतो. अमेरिकेंत संयुक्तसंस्थानें हा एक देश आहे. तो सध्या नारदमुनि बनला आहे. ज्ञानदेव, तुकाराम, रामदास, हे अलीकडले व्यास, वसिष्ठ, वाल्मीकीच होत. तो गृहस्थ दातृत्वांत कर्ण आणि प्रामाणिकपणांत हरिश्चंद्र आहे.

३ पुढील सामान्यनामांचा विशेषनामांसारखा उपयोग कराः—पेशवा, निजाम, दक्षिण प्रांत, महानदी, महायात्रा, पंचवटी, सुंदरबन.

४ पुढील विशेषनामांचा सामान्यनामांसारखा उपयोग कराः—रावण, कुंभकर्ण, लक्ष्मी, शुक्राचार्य, भीम, दुर्वास, धर्मराजा, कैकेयी, बृहस्पति, नानाफडनवीस.

टीप—प्रश्न २, ३, ४, यांचीं उत्तरें देण्यास शिक्षकांना मुलांस सूचक प्रश्न करावे लागतील आणि मदत द्यावी लागेल हें उघडच आहे.

२६. ( १ ) नामावरून पदार्थाची संख्या कळते; जसें,–घोडा, एक; घोडे, पुष्कळ; माणूस, एक; माणसें, पुष्कळ; इत्यादि.

( २ ) त्याचप्रमाणें नामावरून स्त्री, पुरुष, अशी जात कळते; उदा०:—मुलगा, मुलगी; गाय, बैल; घोडा, घोडी; कुत्रा, कुत्री; सुतार, सुतारीण; इत्यादि.

( ३ ) या ठिकाणीं घोडा याचें घोडी असें झालें; माणूस याचें माणसें झालें; मुलगा याचें मुलगी झालें; हा जो फरक झाला,

याला रूप असें म्हणतात. तसेंच ' घोडा ' याचें पुष्कळ अशा अर्थी घोडे असें केलें, म्हणजे अंत्यस्वर जो ' आ ' त्याच्या जागीं ' ए ' घातला; आणि स्त्रीजात अशा अर्थी घोडी असें केलें, म्हणजे ' आ ' चे जागीं ' ई ' हें अक्षर लाविलें; असें जें अक्षर लावितात त्यास **प्रत्यय** असें म्हणतात. व्याकरणांत पुष्कळ रूपें अशा रितीनें प्रत्यय लावून करितात.

**( ४ ) एखाद्या शब्दामध्यें फेरफार करून त्यापासून दुसरा शब्द बनवितात, त्यास रूप असें म्हणतात.**

**( ५ ) एखाद्या शब्दाचें कोणतेंही रूप बनविण्यासाठीं त्यास जें अक्षर किंवा अक्षरें जोडितात, त्यांस प्रत्यय असें म्हणतात.**

उदाहरणार्थ,—' पाटील ' हा मूळचा शब्द; याचें ' पाटीलकी ' हें भाववाचकनामाचें रूप केलें; आणि तें करण्यासाठीं ' की ' हें अक्षर जोडिलें, तो **प्रत्यय**. त्याचप्रमाणें ' सुतार ' हा मूळचा शब्द, ' ईण ' हा प्रत्यय आणि ' सुतारीण ' हें स्त्रीलिंगाचें रूप.

( ६ ) प्रत्यय लावून रूप करतांना, प्रत्ययाच्या आरंभीं स्वर असल्यास, मूळ शब्दाच्या अन्तींच्या स्वराचा लोप होतो, म्हणजे तेथें पररूप संधि होतो; उदा०:—सुतार + ईण = सुतार् + ईण = सुतारीण; पाय + ईं = पाय् + ईं = पायीं; इ० हा नियम केवळ मराठी शब्दांच्या संबंधानें समजावा.

( ७ ) तेव्हां नामांची संख्या, व स्त्री पुरुष अशी जात, इत्यादि दाखविण्यासाठीं रूपें होतात. त्यांविषयीं पुढें सांगितलें आहे.

---

## ८—लिंग—विचार.

२७. ' मनुष्य, ' ' बैल, ' ' घोडा, ' या शब्दांनीं पुरुषजातीचा प्राणी असा बोध होतो; ' स्त्री, ' ' गाय, ' ' घोडी, ' यांनीं स्त्रीजातीचा प्राणी समजतो; ' जनावर, ' ' घोडें, ' यांनीं पुरुष किंवा स्त्री

कोण तें ठाऊक नाहीं, असा बोध होतो. याप्रमाणें शब्दांच्या रूपांवरून पुरुषत्वाचा अथवा स्त्रीत्वाचा बोध होतो.

२८. मनुष्यें आणि इतर प्राणी यांच्या नांवांमध्यें पुरुषजातीचीं तीं पुल्लिंगी, आणि स्त्रीजातीचीं तीं स्त्रीलिंगी, असें मानितात; उदा०:—मुलगा, वाघ, कुत्रा, सुतार, बकरा, बैल, हीं पुल्लिंगी; आणि मुलगी, वाघीण, कुत्री, सुतारीण, शेळी, गाय, हीं स्त्रीलिंगी.

२९. मनुष्यांचीं किंवा प्राण्यांचीं नांवें नाहींत अशा नांवांतीलही कांहीं पुरुषांच्या नांवांसारखीं आणि कांहीं स्त्रियांच्या नांवांसारखीं मानलीं आहेत; उदाहरणार्थ,—आंगरखा, सोटा, खांब, राग, लोभ, गळा, खडू, खर्डा, ठोकळा, इत्यादि पुल्लिंगी; आणि काठी, चोळी, टोपी, लेखणी, माती, बुद्धि, पाटी, बेगड, वही, दौत, इत्यादि स्त्रीलिंगी; अशीं शब्दांचीं लिंगें भाषेंत ठरविलेलीं आहेत.

३०. निर्जीव पदार्थांत वास्तविक पुरुष, स्त्री, असा भेद नाहीं, पण भाषेंत तो मानिला आहे.

३१. जेव्हां नामावरून पुरुष, स्त्री, असा भेद होत नाहीं किंवा करीत नाहींत, तेव्हां त्या नामाचें नपुंसकलिंग असें म्हणतात; उदा०:—मूल, माणूस, कुत्रें, मांजर, झाड, जनावर, जाकीट, घर, बस्कर, टेबल, कपाट, पुस्तक, डोकें, इ०

३२. पदार्थांच्या नांवावरून पुरुष, स्त्री असा जो बोध होतो, त्यास **लिंग** असें म्हणतात. लिंगें तीन आहेत:—( १ ) पुल्लिंग, ( २ ) स्त्रीलिंग आणि ( ३ ) नपुंसकलिंग.

**ज्या नामांवरून पुरुषजातीचा बोध होतो, तीं पुल्लिंगी; ज्या नामांवरून स्त्रीजातीचा बोध होतो, तीं स्त्रीलिंगी; आणि ज्यांवरून पुरुष किंवा स्त्री असा बोध होत नाहीं, तीं नपुंसकलिंगी.**

## अभ्यास

### ६.

१ पुढील शब्दांचीं लिंगें सांगाः—मूल. मुलगा. हरी. गोटी. आस्वल. बाई. मध. लांकूड. कुत्रा. पक्षी. पाखरूं. छडी. घड्याळ. हरण. मुंगूस. खसखस. जिरें. कुत्रें. घूस. अर्घ्यी. चमचा. पाळणा. सिंह. वाघ. लांडोर. नवरी. नवरा. उपाध्या. काकू. मामा. उंबरठा. काकडी. कवठ. पाडा. ग्रंथ. एडका. ब्राह्मण. विप्र. मोरोपंत. चित्र. फळा. पुस्तक. बूक. पोथी. जोडा. पायतण. बूट. धेनु. गरुड. खार. घार. घुबड. खोपड. खोंकड. बोका. गाय. वासरूं. शिंगरूं. शिंगा. बुवा. टांक. पुष्टिपत्र. ओळ. पैसा. पै. कवडी. सुख. मुख. मुखवटा. सोनार. विलूशेट. मोरशास्त्री. पेटारा. वाडा. वाडी. वडी. भूक. माडी. मावळत. दक्षिण. तरवार. वीट. शिडी. मीठ. वड. पिंपळ. चिंच. बोर. उगम. उगवत. उखळ. इ०

२ मनुष्यजातीचीं, इतर प्राण्यांचीं, व ज्यांना जीव नाहीं अशा वस्तूंचीं दहा दहा नांवें पुढें लिहिल्याप्रमाणें फळ्यावर लिहाः—

( १ ) पुल्लिंगी. ( २ ) स्त्रीलिंगी. ( ३ ) नपुंसकलिंगी.

**सूचना**—वाचनाचें पुस्तक वाचतांना नामें येतील त्यांचीं लिंगें शिक्षकांनीं मुलांस विचारावीं.

---

२२. प्राण्यांचीं नांवें पुल्लिंगी असलीं तर तीं प्रत्यय लावून स्त्रीलिंगी अथवा नपुंसकलिंगी करतां येतात. स्त्रीलिंगाचे प्रत्यय ‘ ईण ’ आणि ‘ ई ’ आणि नपुंसकलिंगाचा ‘ एँ ’ असा आहे; यांचीं उदाहारणें:—

( १ ) ‘ ईण ’ प्रत्यय लाऊन झालेलीं कित्येक स्त्रीलिंगें:—

| | | | |
|---|---|---|---|
| सुतार | सुतारीण | वाघ | वाघीण |
| सोनार | सोनारीण | सिंह | सिंहीण |
| देशमुख | देशमुखीण | उंट | उंटीण |
| भट | भटीण | पाटील | पाटलीण |
| शेट्या | शेटीण | कुळंबी | कुळंबीण |
| परभू | परभीण | ब्राह्मण | ब्राह्मणीण |

( २ ) प्राणिवाचक आकारान्त पुल्लिंगी नामाचें स्त्रीलिंग 'ई' लागून आणि नपुंसकलिंग 'एँ' लागून होतें, याचीं कित्येक उदाहरणें:—

| | | |
|---|---|---|
| मुलगा | मुलगी | मुलगें |
| पोरगा | पोरगी | पोरगें |
| कुत्रा | कुत्री | कुत्रें |
| कोल्हा | कोल्ही | कोल्हें |
| घोडा | घोडी | घोडें |

३४. कित्येक प्राणिवाचक पुल्लिंगी नामांचीं स्त्रीलिंगें म्हणजे निराळेच शब्द असतात; त्यांतले कांहीं येथें देतों:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पुरुष | स्त्री | मोर | लांडोर | नर | मादी |
| काळवीट | हरिणी | नवरा | बायको | बैल | गाय |
| दीर | जाऊ | बोकड | शेळी | बोका | भाटी |
| बाप | आई | रेडा | म्हैस | राजा | राणी |
| भाऊ | बहीण | उंट | सांड | वडील | मातुश्री |
| पिता | माता | एडका | मेंढी | वाघ्या | मुरळी |

३५. कित्येक हलक्या प्राण्यांच्या नांवांचीं लिंगें पुरुष, स्त्री, असा भेद न मानितां भावंत ठरवून टाकिलेलीं आहेत; उदाहरणार्थ,–साप, विंचू, सरडा, पोपट, राघू, ढेंकूण, वगैरे पुल्लिंगी; आणि घूस, चोपय, पाल, सुसर, मैना, घार, वगैरे स्त्रीलिंगी; इत्यादि.

३६. केव्हां प्राण्यांचीं नाहींत अशा नामांच्या पुल्लिंगाचें स्त्रीलिंग करितात, तेव्हां त्याचा तशा प्रकारचा लहानसा पदार्थ असा बोध होतो; उदा०:—लोटा, लोटी; गोटा, गोटी; सुपला, सुपली; पळा, पळी; शिंपला, शिंपली; टोपला, टोपली; इत्यादि.

---

## अभ्यास

### ७.

१ पुढील पुल्लिंगी नामांचीं स्त्रीलिंगें कराः—सिंह. वाघ. गाढव. बकरा. मेंढा. सुतार. चिमणा. उंदीर. कोल्हा. सोकड. बोका. राजा. पंतोजी. घोडा. कावळा. कुत्रा. वानर. अतीत. काका. सासरा. मामा. भाचा. आजा. गोटा. पेटारा. अमका. लोटा. सोटा. पाट. ब्राह्मण. भट.

२ पुढील स्त्रीलिंगी नामांचीं पुल्लिंगें सांगाः—गवळण. पंतोजीण. मेव्हणी. मादी. शेळी. कोंचडी. हत्तीण. सुसर. पिंजारीण. शेटीण. पारशीण. मुरळी. बेडकी. कवडी. भावजय. काकी. पुतणी. चुलती. गोटी. लोटी. पेटी. रजपुतीण. काठी. तेलीण.

---

## ९—वचन-विचार.

३७. 'घर' म्हटलें म्हणजे एक; 'घरें' म्हटलें असतां, पुष्कळ घरें. 'मुलगा,' एक; 'मुलगे,' पुष्कळ. 'पोर,' एक; 'पोरी,' 'पोरें,' अनेक. 'झाड,' एक; 'झाडें' अनेक. याप्रमाणें नामाच्या रूपावरून 'किती' अशी संख्या कळते.

**नामाच्या रूपावरून किती अशी संख्या कळते त्यास वचन असें म्हणतात.**

३८. नामाच्या रूपावरून एक वस्तू आहे असें कळतें, तें नामाचें **एकवचन**; आणि त्याच्या रूपावरून एकापेक्षां जास्त वस्तू आहेत असें कळतें, तें **अनेकवचन.**

टीप—अनेक-वचन यास बहु-वचन असेंही म्हणतात. कारण 'बहु' म्ह॰ पुष्कळ.

३९. अनेकवचनाचे प्रत्यय पुल्लिंगी 'ए,' स्त्रीलिंगी, 'आ (या)' आणि नपुंसकलिंगी 'ईं,' आणि 'एँ (यें)' असे आहेत; उदाहरणें:—मुलगा, मुलगे; नदी, नद्या; तळें, तळीं; करडूं, करडें; मोतीं, मोत्यें; इत्यादि.

४०. नामांच्या एकवचनांचीं अनेकवचनें करण्याचे प्रकार:—(अ) कित्येक नामांचीं दोन्ही वचनें सारखींच असतात; पण कित्येकांचीं निराळीं होतात. हे फेरफार नामांच्या लिंगांवरून आणि त्यांच्या अंतीं असणाऱ्या स्वरांवरून होतात.

टीप—अंतीं असणाऱ्या स्वरास अन्त्यस्वर म्हणतात; आणि शेवटच्या अक्षराच्या अगोदरचें जें अक्षर त्याच्या स्वरास उपान्त्यस्वर असें म्हणतात. उदाहरणार्थः—कवि, नदी, गुरु, पांडू, गुरूं, यांतले अन्त्यस्वर अनुक्रमें इ, ई, उ, ऊ, आणि ऊं असे आहेत. आणि हरिण, कोशिंबीर, सुत, सूत, यांतले उपान्त्यस्वर अनुक्रमें इ, ई, उ आणि ऊ असे आहेत.

( आ ) ज्यांचीं दोन्ही वचनें सारखीं असतात, अशीं नामें:—

( १ ) **पुल्लिंगी**—कांहीं आकारान्त नामें खेरीजकरून सर्व. उदाहरणें:—खांब, खांब; तेली, तेली; कवि, *कवि; शत्रु, *शत्रु; काका, काका; मामा, मामा; डोहो, डोहो; इत्यादि.

टीप—काका, मामा, यांचें अनेकवचन तिरस्कारानें बोलावयाचें असतां, काके, मामे, असेंही करितात.

( २ ) चुलता, मेहुणा, आंबा, भाचा, बकरा, मेंढा, वगैरे आकारान्त नामांचें अनेकवचन एकसारखें नसून तें चुलते, मेहुणे, आंबे, भाचे, बकरे, मेंढे, इत्यादि असें एकारान्त होतें. हे शब्द नियम (१) यास अपवादक होत.

( ३ ) **स्त्रीलिंगी**—सर्व आकारान्त, एकारान्त, ऱ्हस्व इकारान्त, आणि ऱ्हस्व उकारान्त नामें; उदा०:—माता, माता; विल्हे, विल्हे; रुचि, *रुचि; धेनु, *धेनु; इ०

( इ ) अकारान्त स्त्रीलिंगी नामांचें अनेकवचन तीन प्रकारचें होतें; उदा०:—सून, सुना; भिंत, भिंती; आणि परात, परातीं अथवा पराता; इ०

**पहिल्या प्रकारचीं नामें:**—वीट, आत, वेळ, चिंच, गार, गरज, खेप, नणंद, मौज, मोहोर (नाणें). इ०

---

* कवि, रवि, रुचि, मति, भानु, गुरु, धेनु, इत्यादि संस्कृत शब्द मराठींत आले म्हणजे ते एकवचनीं आणि अनेकवचनीं ऱ्हस्व लिहिण्याची चाल आहे. वास्तविक पाहिलें तर ते शब्द मराठींत आले म्हणजे त्यांचा अन्त्यस्वर दीर्घच समजला पाहिजे. कारण मराठींत शब्दांच्या अंतीं ऱ्हस्व स्वर असत नाहीं. यांचा उच्चारही दीर्घच होतो; तेव्हां हे स्वर दीर्घ लिहिण्याची चाल पाडणें जरूरीचें आहे. तूर्त जुनी चाल चालत आली आहे म्हणून हे स्वर ऱ्हस्व लिहावे. हरी, विष्णू वगैरे फार प्रचारांत आलेलीं विशेषनामें यांचा अन्त्यस्वर दीर्घ लिहिण्यास चिंता नाहीं.

**दुसऱ्या प्रकारचीं:**—भिंत, केळ (झाड), चाळण, गोष्ट, बोर (झाड), भाकर, खीळ, पोफळ, इ०

**तिसऱ्या प्रकारचीं:**—तरवार, परात, वरात, इजार, विजार, तसवीर, खबर, बखर, कसर, नथ, इ०

(ई) ईकारान्त स्त्रीलिंगी नामें:—काठी, नदी, चुलती, स्त्री, बाई, वगैरे आणि ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें:—सासू, जाऊ, यांचीं अनेकवचनें काठ्या, नद्या, चुलत्या, स्त्रिया, बाया, सास्वा-सासवा, जावा, अशीं होतात.

(उ) अकारान्त नपुंसकलिंगी नामांचें अनेकवचन एँकारान्त होतें; उदा०:—घर, घरें; पोर, पोरें; मूल, मुलें; इत्यादि. ईकारान्त नामांचें एँकारान्त होतें; उदा०:—मोतीं, मोत्यें; मिरीं, मिऱ्यें; इत्यादि. ऊंकारान्त नामांचें एँकारान्त होतें; उदा०:—पाखरूं, पाखरें; गळूं, गळवें; तारूं, तार्वें किंवा तारवें; असूं, अस्वें; इत्यादि. एँकारान्त नामांचें ईंकारान्त होतें; उदा०:—खेळणें, खेळणीं; तळें, तळीं; इत्यादि.

४१. कित्येक नामांचें अनेकवचन होतांना अथवा त्यांस लिंगांचे अथवा इतर प्रत्यय लावतांना त्यांच्या उपान्त्यस्वरांत फेरफार होतात. याविषयींचे मुख्य नियम पुढें देतों:—

(१) मराठी भाषेचा साधारण नियम असा आहे कीं, शब्द अकारान्त असल्यास उपान्त्य ई, ऊ, हे स्वर दीर्घच असावयाचे; जसें,—खीर, मीठ, पीठ, चूल, फूल, कूळ, मूल, भूल, वीट, चीट, रीत, पीर, तारीख, उदीम, कापूर, तपकीर, कऊल, देऊळ, कोशिंबीर, इ०

(२) ज्यांचा उपान्त्यस्वर ऱ्हस्व इ किंवा उ आहे असे अकारान्त संस्कृत शब्द मराठींत आले असतां, त्यांच्या उपान्त्याचा उच्चार मराठीच्या नियमाप्रमाणें दीर्घच होतो, परंतु तो उपान्त्यस्वर ऱ्हस्व लिहिण्याची चाल आहे; उदा०:—गुण, हित, सुत, विष, अधिक, इत्यादि.

(३) उपान्त्य अ किंवा आ असल्यास तो स्वर जरी ऱ्हस्व लिहितां येत नाहीं, तरी त्याचा अगोदरचा उच्चार दीर्घ असून प्रत्यय लागल्यावर उच्चार

ऱ्हस्व होतो; उदा०:–गवंत, गवॅतास; कागंद. कागॅदास; जवंळ, जवॅळचा; दोंर, दॉरास: इ०

(४) अन्त्यस्वर दीर्घ असल्यास किंवा अन्त्याक्षर जोडाक्षर असल्यास अथवा उपान्त्यावर अनुस्वार असल्यास उपान्त्य इ, उ, ऱ्हस्वच राहातात; उदा०:–भुसा, भुश्यास; चिंच, खुंट, बंच, गुहा, इ०

(५) शब्द अकारान्त असून त्याचा उपान्त्य दीर्घ ई अथवा ऊ असेल तर तो स्वर ऱ्हस्व होतो, अथवा त्याचा अ होतो; उपान्त्य केवळ ई किंवा ऊ असल्यास तो ऱ्हस्व होतो किंवा त्याचद्दल अनुक्रमें य किंवा व होतो; उदा०:–उंदीर, उंदिरास, उंदरास; कापूर, कापुरास, कापरास; ताईत, ताइतास, तायतास; कऊल, कउलास, कवलास; इ० यांचीं आणखी उदाहरणें:–उडीद, कणीक, काळीज, तारीख, परीट, बटीक, भोगीप, तालीम, रेशीम, खारीक, तांदूळ, बेडूक, मुद्गल, बाभूळ, पडूल, टेंगूळ, कुडूक, चेटूक, वाळूक, गेडूक, हुकूम, मुंगूस, लांकूड, शेंपूट, कवाईत, खुईण, दऊत, पाऊल, पाऊस, देऊळ, राऊळ, इ०

(६) शब्दामध्यें दोनच अक्षरें असल्यास वरील नियमाप्रमाणें ई किंवा ऊ फक्त ऱ्हस्व होतो; उदा०:–मीठ, मिठास; चूल, चुलीस; पीठ, पिठांत; धूर, धुराचा; इ०

(७) तीन अक्षरी शब्दाच्या उपान्त्य ई किंवा ऊ या स्वरापूर्वी जोडाक्षर अथवा ह असल्यास उपान्त्य फक्त ऱ्हस्व होतो; उदा०:—भक्तीण, भक्तिणी; पक्षीण, पक्षिणी; विहीण, विहिणी; बहीण, बहिणी; माहूत, माहुतास; विहीर, विहिरीवर; इ०

(८) शब्दामध्यें चार किंवा अधिक अक्षरें असून उपान्त्याच्या अगोदरच्या अक्षराचा स्वर ऱ्हस्व असल्यास उपान्त्य फक्त ऱ्हस्व होतो; उदा०:-परटीण, परटिणीस; परभीण, परभिणीला; जांचणूक, जांचणुकी; इ०

(९) परंतु शब्दांत चार किंवा अधिक अक्षरें असून त्याच्या उपान्त्याच्या अगोदरच्या अक्षराचा स्वर दीर्घ असल्यास, उपान्त्य ईकाराचा अ होतो आणि ऊकार ऱ्हस्व होतो; उदा०:—मराठीण, मराठणी; सुतारीण, सुतारणी; धुमाकूळ, धुमाकुळी; इ०

(१०) मूळचा शब्द संस्कृत भाषेंतला अथवा परभाषेंतला असल्यास त्याचा उपान्त्य असेल तसाच राखण्याची चाल आहे; उदा०:—गीत, गीतें; सूत्र, सूत्रें; मयूर, मयूरास; अमीर, अमीरानें; मुनीम, मुनीमाचा; इ०

(११) परंतु हा संस्कृत किंवा परभाषेंतला शब्द भाषेंत रुळला असल्यास मराठीच्या नियमाप्रमाणें त्यांत फेरफार करितात; उदा०:—जीव, जिवास; रूप, रुपानें; रीत, रितीचा; मुनीम, मुनिमानें; इत्यादि अशींही रूपें करण्याची पुष्कळांची चाल आहे.

**सूचना**—हे नियम पाठ करून घेऊं नयेत. उदाहरणांच्या द्वारें ते मुलांच्या ध्यानांत राहातील असें करावें.

४२. मनुष्यवाचक सामान्यनामें आणि विशेषनामें जरी एकाच माणसाबद्दल घातलीं असलीं तरी त्या माणसास मान देऊन बोलावयाचें असलें म्हणजे त्यांचें अनेकवचन करितात; याला **आदरार्थी बहुवचन** असें म्हणतात; उदा०:—'यजमान आले;' 'विष्णुपंत आज येतील;' 'आमचे गुरुजी ममताळू आहेत;' इ०

४३. पदार्थ, व्यक्ति वगैरे एकदम पुष्कळ आहेत असें दाखविण्यासाठीं मागें बाहुल्यदर्शक संख्याविशेषण असतांही पुढें नामाचें एकवचन घालितात, जसें,—'तो चमत्कार पाहाण्यास हजारों माणूस लोटलें;' 'मोगलांचे सैन्यांत पांच हजार घोडा (किं० घोडें) असे;' 'पुण्यांत हजार तरी कुत्रें असेल;' इ०

---

## अभ्यास

### ८.

१. पुढील नामांचीं अनेकवचनें कराः—मनुष्य. जनावर. पशु. मुलगा. सुनार. क्षत्रिय. वीर. घिसाडी. चेहेरा. पुत्र. मुलगी. कुणबीण. भाऊ. बहीण. कुत्रा. कुत्रें. केळें. पेरु. आंबा. सुंठ. आलें. साखर. नारळ. देश. शहर. गांव. सराफ. दुकानदार. पैसा. रुपया. कागद. लेखणी. पेनसील. पाटी. स्लेट. चाकर. गडी. गाडी. डोंगर. हरीण. केळ. फळ. साल. पान. खोड. शेवट.

२. पुढील नामांत एकवचनीं कोणतीं आणि अनेकवचनीं कोणतीं हें सांगाः—मनुष्य. मनुष्यें. जनावरें. पक्षी. पशु. लेखण्या. शिप्या. दिवे. पिसा.

खुर्च्या. पाट्या. टोपी. दौत. पिशव्या. विजारी. पेनसिली. कागद. पाय. हात. दांत. जिभा. खडे. कांटे. साली. रीत. रिती. रूप. विद्यार्थी. शिष्य. शिक्षक. मित्र. सोबती. छत्र्या. जोडे. पगड्या. रुपें. पागोटीं. सुपाऱ्या. नारळ. पेरु. डाळिंब. पराती. काडी. ताड्या. चेहेरे. पायऱ्या. गुरें. गुराखी. करडें.

३. वरील शब्दांतील एकवचनाचें अनेकवचन आणि अनेकवचनाचें एकवचन सांगा.

---

## १०–विभक्ति-विचार.

४४. 'हरी पुस्तक वाचितो.' या वाक्यांत **हरी** याविषयीं **वाचितो** असें सांगितलें आणि काय **वाचितो** तर **पुस्तक.** तेव्हां यांत '**वाचितो**' या क्रियापदाशीं '**हरी**' या नामाचा एक प्रकारचा संबंध आहे, आणि '**पुस्तक**' याचा दुसऱ्या प्रकारचा संबंध आहे.

अशा रितीनें वाक्यामध्यें क्रियापदाशीं नामाचे आणखी कित्येक प्रकारचे संबंध असतात; उदाहरणार्थ,—'चाकूनें लेखणी कर.' यांत **चाकूनें** हा एक प्रकारचा संबंध आहे. 'तो **भावाला** पत्र लिहितो.' यांत **भावाला** हा आणखी एक प्रकारचा संबंध आहे. 'मी **घरीं** नसेन.' यांत **घरीं** हा आणखी एक प्रकारचा संबंध आहे.

४५. वाक्यांत नामाचा क्रियापदाशीं जो संबंध असतो, त्यास **कारक** असें नांव देतात. हा संबंध दाखविण्यासाठीं नाम जसेंच्या तसेंच येतें असें नाहीं, तर **चाकू** याचें **चाकूनें**, **भाऊ** याचें **भावाला**, **घर** याचें **घरीं**, असें कांहीं तरी रूप करावें लागतें. या रूपाला **विभक्ति** असें म्हणतात.

**व्याख्याः—(१) वाक्यांत नामाचा क्रियापदाशीं जो संबंध असतो त्यास कारक असें म्हणतात.**

**(२) कारक दाखविण्यासाठीं नामाचें जें रूप करितात, त्याला विभक्ति असें म्हणतात.**

टीप—नामाचा संबंध केव्हां क्रियापदाशीं नसून दुसऱ्या एखाद्या शब्दाशीं असतो. उदा॰:—'मनानें मोकळा किंवा मनाचा मोकळा.' 'बुद्धीनें मंद.' 'गणितांत हुषार.' 'परीक्षेंत पास.' इत्यादि यालाही कारक म्हणावें.

४६. कर्त्याचा आणि कर्माचा असे दोन संबंध मागें आले आहेत. तीं **कर्ता** आणि **कर्म** अशीं दोन कारकेंच आहेत. (क॰ १४ पाहा.) '**चाकूनें** लेखणी कर;' यांत क्रिया करण्याचें साधन सांगितलें आहे; याला **करण** असें म्हणतात. '**ब्राह्मणास** दक्षिणा दे;' यांत कोणास हें सांगितलें आहे; याला **संप्रदान** म्हणतात. '**मुंबईहून** आला;' यांत 'अमक्या ठिकाणाहून' असा अर्थ आहे; यास **अपादान** असें म्हणतात. '**आमचा** चाकर;' यांत **स्वामित्व-संबंध** आहे. 'रामा **घरीं** नाहीं;' यांत **घरीं** यानें स्थळ सांगितलें आहे; याला **अधिकरण** असें म्हणतात. '**रामा** इकडे ये;' यांत रामाला बोलाविलें आहे; यास **संबोधन** म्हणतात.

४७. अशा रितीचीं हीं एकंदर **सात कारकें** आहेत, यांना प्रथमा, द्वितीया, तृतीया, इत्यादि अशीं विभक्तींचीं नांवें दिलीं आहेत; तीं अशीं:—

| **कारकाचें नांव** | **विभक्ति** |
|---|---|
| कर्ता | प्रथमा |
| कर्म | द्वितीया |
| करण | तृतीया |
| संप्रदान (क्वचित् अधिकरण) | चतुर्थी |
| अपादान | पंचमी |
| संबंध | षष्ठी |
| अधिकरण | सप्तमी |
| [ हाक मारणें | संबोधन* ] |

* संबोधन हें वास्तविक कारक नाहीं. कारण याचा क्रियापदाशीं संबंध नसतो. परंतु विभक्तींच्या अनुक्रमासाठीं हें येथें दिलें आहे.

टीप—हीं मुख्य कारकें आहेत. यांत बारीक भेद व भिन्न प्रकार अनेक आहेत. त्यांतले सोपे असे कांहीं प्रकार पुढें प्र० २३ यांत सांगितले आहेत.

४८. प्रत्येक नामाचीं प्रत्येक विभक्तीचीं एकवचनीं आणि अनेकवचनीं अशीं निरनिराळीं रूपें होतात, आणि प्रत्येक वचनीं त्याच अर्थाचीं अशींही निरनिराळीं रूपें असतात; जसें:—' पोरानें, ' हें तृतीयेचें एकवचन, ' पोरांनीं ' हें अनेकवचन; तसेंच ' रामास ' ही जशी चतुर्थी तशीच ' रामाला ' ही देखील त्याच अर्थाची चतुर्थी आहे.

४९. नामांचीं जीं निरनिराळ्या विभक्तींचीं उभयवचनीं रूपें होतात त्यांवरून दिसून येईल, कीं तीं होतांना बहुधा प्रत्यय लागतात; जसें:—' रामास ' यांत ' स ' असा प्रत्यय लागला; ' हरीनें ' यांत ' नें ', ' घरीं ' यांत ' ई ' इत्यादि; हे **विभक्तिप्रत्यय** होत.

( अ ) ' पोरानें, ' ' पोरांनीं, ' ' रामास, ' ' रामाला, ' या रूपांवरून आणखी असें दिसून येईल, कीं मूळचें नाम जें ' पोर ' त्यास प्रत्यय लावितांना एकवचनीं ' पोरा—' आणि अनेकवचनीं ' पोरां—' असें करावें लागतें. त्याचप्रमाणें ' घोडा ' याचें ' घोड्या—' आणि 'घोड्यां'—असें करावें लागतें. हा जो फेरफार करावा लागतो, यास **सामान्यरूप** असें म्हणतात.

**( आ ) विभक्तिप्रत्यय लावण्याच्या पूर्वीं जें नामाचें रूप करितात त्यास सामान्यरूप म्हणतात.**

टीप—( १ ) हें सामान्यरूप ज्या विभक्तिप्रत्ययाच्या आरंभीं व्यंजन आहे त्याचे अगोदर करावें लागतें; ज्याचे आरंभीं स्वर आहे त्याचे अगोदर करावें लागत नाहीं. उदा०:—पोर + नें = पोरानें; बाग + स = बागेस; परंतु हात + ईं = हातीं; पाय + आं = पायां; इ० येथें मूळ शब्दाच्या अन्त्यस्वराचा लोप झाला आहे, हें लक्षांत येईलच. [ क. २६( ६ ) पाहा. ]

( २ ) ज्या प्रत्ययाच्या आरंभीं स्वर असतो त्यास **स्वरादि प्रत्यय** आणि ज्याच्या आरंभीं व्यंजन असतें त्यास **व्यंजनादि प्रत्यय** असें म्हणतात.

( ३ ) इंग्रजी वगैरे परकी भाषेंतलीं व क्वचित संस्कृतांतलीं विशेषतः अकारान्त नामें भाषेंत येऊन तीं विशेष प्रचारांत नसलीं म्हणजे त्यांना द्वितीयेचा प्रत्यय ' स '

याशिवाय इतर प्रत्यय लावितांना सामान्यरूप करीत नाहींत. पुढें ते शब्द संवयीचे होत गेले म्हणजे विकल्पेंकरून सामान्यरूप होऊं लागतें. हें पुढील उदाहरणांवरून कळेल:– जाननें, जेम्सला, एडवर्डहून, लंडनपेक्षां, टाडची, फ्रान्सिसला, औरंगजेबनें–बानें, अकबरनें–रानें, गव्हर्नरकडून–राकडून, ज्ञानप्रकाशचा–शाचा; परंतु अकबरास, जानास, इ०

५०. आतां या सात विभक्तींचे आणि संबोधनाचे एकवचनीं आणि अनेकवचनीं निरनिराळे प्रत्यय सांगतों:—

**प्रथमा**—या विभक्तीचें एकवचनाचें रूप कसें करावें हें मुलांना समजून देतां येणार नाहीं; यासाठीं त्यांस असें सांगावें कीं, “कोणत्याही पदार्थाचें नांव घेतांना आपण त्याबद्दल योजावयाच्या नामाचें जें एकवचनीं रूप करितों, तें त्याचें प्रथमेचें एकवचन आणि वचनविचारांत सांगितल्याप्रमाणें जें त्याचें अनेकवचन होईल, तेंच प्रथमेचें अनेकवचन.” याशिवाय प्रथमेचे निराळे प्रत्यय नाहींत. कवितेंत कांहीं प्रत्यय येत असतात ते पुढें सांगितले आहेत. द्वितीया विभक्ति पुष्कळदां प्रथमेसारखीच होते; म्हणजे, प्रथमेच्याच रूपांना अर्थावरून द्वितीया असें म्हणावयाचें असतें; उदा०:—‘मला पुस्तक मिळालें,’ यांत ‘पुस्तक’ ही प्रथमा; परंतु ‘मी पुस्तक मिळवीन,’ यांत ‘पुस्तक’ ही द्वितीया. ही गोष्ट आणखी उदाहरणें सांगून समजून द्यावी.

| विभक्तीचें नांव. | प्रत्यय. | |
|---|---|---|
| | एकवचनीं. | अनेकवचनीं. |
| द्वितीया | (प्रथमेप्रमाणें रूपें होऊन शिवाय)— स, ला, तें, | स, ला, ना, तें. |
| तृतीया | नें, एँ, शीं, आं, | नीं, हीं, ईं, शीं. |
| चतुर्थी | स, ला, तें, | स, ला, ना, तें. |
| पंचमी | ऊन, हून, | ऊन, हून. |
| षष्ठी* | चा, ची, चें, | चा, ची, चें. |
| सप्तमी | ई, आं, | ई, आं. |
| संबोधन | † | नो. |

* षष्ठीविभक्ति ही कारकविभक्ति क्वचित् असते. त्याचप्रमाणें तिचीं रूपें हीं मूळचीं विशेषणें आहेत. ही गोष्ट मुलांस समजण्यास कठीण असल्यामुळें येथें जास्त कांहीं सांगितलें नाहीं. विशेष माहिती योग्य वाटल्यास शिक्षकांनीं मोठ्या व्याकरणावरून सांगावी.

† आपण एखाद्यास हाक मारितांना त्याच्या नांवाचें जें रूप करितों, तें संबोधनाचें एकवचन.

टीप—या प्रत्ययांपैकीं कित्येक फक्त कवितेंत येतात, त्याविषयीं पुढें प्रकरण ३० यांत सांगितलें आहे.

५१. आतां 'पाय' या शब्दास सर्व विभक्तिप्रत्यय लावून तो चालवून दाखवितों. याचें एकवचनीं सामान्यरूप 'पाया–' आणि अनेकवचनीं 'पायां–' असें होतें.

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथमा | पाय; | पाय. |
| द्वितीया | पाय, पायास, पायाला, पायातें; | पाय, पायांस, पायांला, पायांतें, पायांना. |
| तृतीया | पायें, पायानें, पायाशीं; | पायीं, पायांनीं, पायांहीं, पायांशीं. |
| चतुर्थी | पायास, पायाला, पायातें; | पायांस, पायांलीं, पायांतें, पायांना. |
| पंचमी | पायाहून; | पायांहून. |
| षष्ठी | पायाचा, पायाची, पायाचें; | पायांचा, पायांची, पायांचें. |
| सप्तमी | पायीं, पायां; | पायीं, पायां. |
| संबोधन | पाया; | पायांनो. |

टीप—(१) एकेका विभक्तीचे सर्वच प्रत्यय प्रत्येक नामास लागून रूपें होतात असें नाहीं. उदाहरणार्थः—पंचमीचा 'ऊन' हा प्रत्यय लागून पाय याचें रूप झालें नाहीं, पण घर याचें घरून असें होईल. तसेंच सप्तमीचे प्रत्यय 'ई' आणि 'आं' हे लागून फार थोड्या नामांचीं रूपें होतात. बाकीच्या नामांचीं सप्तमीचीं रूपें प्रत्यय लागून होतच नाहींत, त्यांना 'आंत' आणि 'मध्यें' हीं अव्ययें लावावीं लागतात. उदा०:—माणसांत, माणसांमध्यें, इ०

(२) संबोधनाचें एकवचन आणि नामाचें सामान्यरूप हीं एकच असतात. कांहीं अगदीं थोड्या नामांच्या संबंधानें फरक आहे, यासाठीं कोणत्याही नामाचें जें संबोधन तें त्याचें एकवचनीं सामान्यरूप आणि अनेकवचनीं 'नो' हा प्रत्यय लागतो, तो काढून टाकिला म्हणजे राहातें तें अनेकवचनीं सामान्यरूप, असें साधारणतः म्हणतां येईल.

(३) षष्ठीचा मूळचा प्रत्यय 'च' असा आहे. तो षष्ठीचा संबंध पुल्लिंगी नामाशीं असतां 'चा', स्त्रीलिंगी नामाशीं असतां 'ची' आणि नपुंसकलिंगी

नामाशीं असतां ' चें ' असा होतो, आणि अनेकवचनीं नामाशीं संबंध असतां ' चे ', ' च्या ', ' ची ' असा होतो. उदा०:—रामाचा घोडा, रामाचे घोडे; रामाची छत्री, रामाच्या छत्र्या; रामाचें घर, रामाचीं घरें; इ०

**५२. नामांचें सामान्यरूप करण्याचे प्रकार:**—नामांचें सामान्यरूप नामांच्या अन्त्यस्वरावरून निरनिराळ्या प्रकारचें होतें. हें सामान्यरूप सात प्रकारचें होतें. हे सात प्रकार व प्रत्येक प्रकाराप्रमाणें चालणारीं मुख्य मुख्य नामें पुढें सांगतों:—

**[ १ ] पहिला प्रकार:**—आकारान्त सामान्यरूप. मुख्य शब्द बाप; उदा०:—बापास, बापानें, बापाहून, इ० या प्रकाराप्रमाणें चालणारीं नामें:—

( १ ) सर्व अकारान्त पुल्लिंगी आणि नपुंसकलिंगी नामें; जसें—वाघ, बाप, भगवान्,* विद्वान्,* सांब, सुतार, पिंपळ, घर, शेवट, पाप, घन, इत्यादि.

( २ ) कांहीं आकारान्त पुल्लिंगी नात्याचीं वाचक अथवा आदरसूचक नामें:—काका, मामा, दादा, अण्णा, तात्या, अप्पा, नाना, इत्यादि. ' बा ' शेवटीं आहे अशीं:—दाजीबा, आजोबा, राघोबा, इ० ज्यांचे शेवटीं ' च ' किंवा ' ज ' आहे अशीं:—चमचा, भाचा, राजा, आजा, इ० [ यांतील 'च' आणि ' ज ' यांचा तालव्य उच्चार जाऊन दन्ततालव्य उच्चार होतो. ] सकारान्त नामें:—ससा, मासा, आरसा, इ० [ यांच्या ' स ' चा ' श ' होतो. ] जसें:—सशास, आरशांत, इ०

( ३ ) ' णार ' आणि ' णारा ' या प्रत्ययान्त नामें:—करणार, करणारा, इ०

( ४ ) ' या ' प्रत्ययान्त नामें:—नांगऱ्या, वाटाड्या, म्होरक्या, इ०

( ५ ) तट्टू, भट्टू, परभू, आणि वाटसरू यांचीं रूपें:—तट्टस, तट्टास; परभूस, परभास; इत्यादि अशीं दोन दोन होतात.

( ६ ) करडूं, गुरूं, निंबूं, मांजरूं, मेंढरूं, लेंकरूं, वासरूं, शिंगरूं, शेरडूं या नपुंसकलिंगी नामांचीं रूपें:—करडास, वासरानें, शेरडाशीं, इत्यादि अशीं होतात.

( ७ ) सुकाणूं याचें ' सुकाणास ' असें रूप होऊन शिवाय सुकाणवास, सुकाण्वास, सुकाणूस, अशींही रूपें होतात.

---

* भगवान्, विद्वान्, बुद्धिमान्, शक्तिमान् वगैरे संस्कृत शब्द त्या भाषेंत व मराठींतही व्यंजनान्त लिहितात. मराठींत व्यंजनान्त शब्द नाहींत; तथापि चाल पडली आहे म्हणून हे शब्द भगवान्, विद्वान् इत्यादि असे लिहावे. व्यवहाराला हे शब्द अकारान्तच समजावे.

[ २ ] दुसरा प्रकारः—यांत सामान्यरूप आकारान्तच होतें; पण अंतींच्या ' आ ' ला ' या ' आदेश होतो. मुख्य नाम घोडाः–घोड्यास, घोड्याला, घोड्यानें, इ० याप्रमाणें चालणारीं नामें:—

( १ ) पहिल्या प्रकारांत येत नाहींत अशीं सर्व आकारान्त पुल्लिंगी नामें:– घोडा, सोटा, गोटा, चुलता, मेहुणा, सासरा, सरडा, उंचवटा, वरवंटा, इ०

( २ ) ईकारान्त पुल्लिंगी नामें:—शास्त्री, संन्याशी, गोसावी, पुजारी, शेतकरी, वारकरी, थिगारी, गडी, विद्यार्थी, माधुकरी, न्हावी, तेली, कोळी, धोबी, शिंपी, साळी, रंगारी, इत्यादि. हत्ती, केसरी, यती, बंदी, वगैरे. ज्या कांहीं नामांचा ' ई ' स्वर तसाच रहातो, तीं पुढें चौथ्या प्रकारांत येतील.

( ३ ) सर्व ईकारान्त आणि एँकारान्त नपुंसकलिंगी नामें:—पाणीं, लोणीं, चिंचवणीं, मिरीं, मोतीं, नाणें, सोनें, केळें, पाळें, इ०

टीप—यांतल्या पाणीं, लोणीं, चिंचवणीं अशा कांहीं थोड्या शब्दांच्या अंतीं हल्लीं अनुस्वार देत नाहींत. भाषेच्या नियमाप्रमाणें अनुस्वार द्यावा हें योग्य आहे. परंतु तशी चाल पडली आहे म्हणून अनुस्वार देऊं नये.

( ४ ) ' बीं ' नपुंसकलिंग, याचें बियास असें होतें.

( ५ ) ' णें '–प्रत्ययान्त नामें:–करणें, बोलणें, चालणें, इ०

[ ३ ] तिसरा प्रकारः—यांतही सामान्यरूप आकारान्त असतें. पण अंतींच्या ' आ ' ला ' वा ' आदेश होतो. मुख्य नाम गहूंः–गव्हास, गव्हानें, गव्हातें, इ० याप्रमाणें चालणारीं नामें:—

( १ ) कांहीं ऊकारान्त पुल्लिंगीः–गहूं, नातू, पू, रू, लाडू, विंचू, इ०

टीप—' गहूं ' या शब्दाचे शेवटीं अनुस्वार असतो. ज्याचे अंतीं अनुस्वार आहे असा पुल्लिंगी शब्द हा एवढाच आहे. हा अनुस्वार काढून टाकण्याची रीत पडेल तर बरें.

( २ ) कांहीं ऊकारान्त पुल्लिंगी नामें अशीं चालून शिवाय चवथ्या प्रकारांत येतात; उदा०ः—नातूस, नारूस. हीं नामें नारू, पणतू, भाऊ, वेळू, हीं आहेत.

टीप–' नातू ' हें आडनांव, म्हणजे विशेषनाम असतां ' नातूस ' असें रूप होतें. ' भाऊ ' हा नात्याचा वाचक असतां ' भावास ' आणि मानाकरितां ' भाऊ ' असें म्हटलें तर भाऊस अशीं रूपें होतात; उदा०ः–हरीच्या भावास, रामभाऊस, हरिभाऊस, इ० कोणी लाडू याचीं लाडवास, लाडूस, अशींही रूपें करितात.

( ३ ) कांहीं ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें:—असूं, कुंकूं, कुसूं; गळूं, ताळूं, इत्यादि.

[ ४ ] **चौथा प्रकार:**—यांत सामान्यरूप ईकारान्त होतें. मुख्य नाम कवि:—कवीस, कवीला, कवीतें, इ० याप्रमाणें चालणारीं नामें:—

( १ ) संस्कृतांतून आलेलीं ऱ्हस्व इकारान्त पुल्लिंगी, स्त्रीलिंगी आणि नपुंसकलिंगी नामें:–पु०–हरि, कवि, यति; स्त्री०–मति, मुक्ति, भक्ति, रीति; नपुं०–वारि, दधि, अस्थि; इ०

टीप—या नामांच्या अन्त्यस्वराच्या संबंधानें २९ पृष्ठाखालची टीप पाहा.

( २ ) दुसऱ्या प्रकारांत न येणारीं ईकारान्त पुल्लिंगी नामें:—हत्ती, करी, केसरी, दंडी, नंदी, वादी, प्रतिवादी, इ०

( ३ ) कांहीं परकी भाषेंतलीं ईकारान्त नामें:—काजी, मोलवी, फिर्यादी, असामी, इ०

( ४ ) 'जी' असा प्रत्यय लागलेलीं नामें:—पंतोजी, भावोजी, रावजी, शेटजी, इ०

( ५ ) ईकारान्त स्त्रीलिंगी नामें सर्व:—गाडी, घोडी, पेटी, घोंगडी, चिट्टी, चपाती, भाकरी, सती, साध्वी, देवी, इ०

( ६ ) स्त्री आणि बी यांचीं रूपें:—स्त्रीस, स्त्रियेस; बीस, बियेस; अशीं दोन प्रकारचीं होतात.

( ७ ) शेवटीं 'य' आहे अशीं स्त्रीलिंगी नामें:—गाय, चोय, पोय, डोय, सोय, वय [ कुंपण ], इ० यांच्या 'य' बद्दल 'ई' होते.

( ८ ) कांहीं अकारान्त स्त्रीलिंगी नामें*:—म्हण, भेट, केळ, रीत, जात, ओळख, भाकर, गोष्ट, पोर, भिंत, सुंठ, चाळण, धावळ, विहीर, चूल, इ०

( ९ ) 'ईण' प्रत्ययान्त जातिवाचक स्त्रीलिंगी नामें:—वाघीण, सिंहीण, ब्राह्मणीण, सोनारीण, परभीण, इ०

---

* मराठींत अकारान्त स्त्रीलिंगी नामें फार आहेत. तीं तीन प्रकारांनीं चालतात. ते तीन प्रकार असे:–( १ ) कांहींचें सामान्यरूप ईकारान्त,–रीत, रितीस. ( २ ) कांहींचें एकारान्त,–वीट, विटेस. ( ३ ) कांहींचें दोन्ही प्रकारचें,–विजार, विजारीस, विजारेस; इ०, हे तीन प्रकार मुलांस पूर्णपणें समजणें कटीण आहे. तूर्त यांची सामान्य माहिती झाली म्हणजे झालें.

( १० ) ऐकारान्त नामें, तिवै इत्यादि; हीं वास्तविक ईकारान्त समजावीं. जसें:--तिवई, सळई, कल्हई, जिल्हई, इ०

[ ५ ] **पांचवा प्रकार**:--यांत सामान्यरूप ऊकारान्त होतें. मुख्य नाम साधुः--साधूस, साधूला, साधूनें, इ० याप्रमाणें चालणारीं नामें:--

( १ ) मूळचीं संस्कृत ऱ्हस्व उकारान्त तिन्ही लिंगी नामें:--साधु, भानु, धेनु, वस्तु, मधु, इ०

टीप—या नामांच्या अन्त्यस्वरासंबंधानं २९ पृष्ठाखालची टीप पाहा.

( २ ) सर्व ऊकारान्त पुल्लिंगी नामें:--जीं पहिल्या आणि तिसऱ्या प्रकारांत चालत नाहींत अशीं:--चाकू, धाकू, टेंकू, इ०

( ३ ) कांहीं ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें:--चमू, श्वश्रू, वधू, पाचू, शेपू, तराजू, काकू, तंबाखू, अफू, अब्रू, इ० बाकीचीं ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें सहाव्या प्रकाराप्रमाणें चालतात.

( ४ ) उठाणूं, माचेरूं, आवाळूं, हीं ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामें या रितींनेंच चालतात.

[ ६ ] **सहावा प्रकार**:—यांत सामान्यरूप एकारान्त होतें. मुख्य शब्द माता--मातेस, मातेला, मातेनें, इ० या प्रकाराप्रमाणें नामें चालतात तीं: —

( १ ) आकारान्त स्त्रीलिंगी नामें:--माता, जिव्हा, विद्या, आशा, निंदा, शंका, भाषा, निद्रा, कथा, सुता, इजा, मजा, रजा, हवा, जमा, जागा, पागा, इ०

( २ ) कांहीं अकारान्त स्त्रीलिंगी नामें:--जीभ, भूक, लाज, सून, पाच, वेल, वाफ, वीज, लवंग, ऊच, शपथ, पहाट, लसूण, वाट, कांच, तारीख, सकाळ, काव, कांस, रेघ, लाज, तोफ, उत्तर, दक्षिण, इ०

( ३ ) ज्यांचें सामान्यरूप ईकारान्त आणि एकारान्त असें दोन्ही प्रकारांनीं होतें, अशीं अकारान्त स्त्रीलिंगी नामें:--जांचणूक, वागणूक, इ० ' णूक '-प्रत्ययान्त सर्व; तरवार, तसबीर, कबर, खसखस, बंदूक, परात, वरात, विजार, ढाल, शाल, कसर, नथ, टांच, इ०

( ४ ) कित्येक ऊकारान्त स्त्रीलिंगी नामांचें सामान्यरूप ऊकारान्त व वेकारान्त असें दोन्ही प्रकारचें होतें. हीं नामें:-ऊ, जळू, सासू, जाऊ, वाळू, टाळू, टाळू, बाजू, दारू, इत्यादि आहेत. ' सासू ' याचीं सासूस, सास्वेस, सासवेस; ' टाळू ' याचीं टाळूस, टाळ्वेस, टाळवेस; अशीं रूपें होतात; आणि ' पिसू ' याचीं पिसूस, पिसेस, पिस्वेस, पिसवेस, अशीं रूपें होतात.

(५) एकारान्त स्त्रीलिंगी नामें:—विल्हे, सवे आणि आते हीं अशींच चालतात. कोणी ' आत ' असेंच मूळचें रूप समजतात.

[७] सातवा प्रकार:—यांत सामान्यरूप ओकारान्त होतें. मुख्य नाम बायको. अशा रितीनें चालणारीं नामें:—बायको, टाहो, लाहो, डोहो, अशीं थोडींच आहेत.

टीप—हे जे सात प्रकार आहेत, त्यांतील प्रत्येकाचें मुख्य नाम घेऊन प्रत्येक प्रकारास बापाचा गण, घोड्याचा गण, गव्हाचा गण, कवीचा गण, साधूचा गण, मातेचा गण, आणि बायकोचा गण, अशीं अनुक्रमें नांवें द्यावीं. अमुक नाम कसें चालतें हें समजण्यासाठीं तें कोणत्या गणांत आहे तें पाहावें. समजा, कीं तें साधूच्या गणांत आहे; तर तें ' साधु ' या शब्दाप्रमाणें चालेल. अशा रितीनें हीं गणांचीं नांवें कोणतेंही नाम कसें चालतें हें चटकन् ध्यानांत येण्यास उपयोगीं पडतील.

५३. हे एकवचनीं सामान्यरूप करण्याचे नियम सांगितले. अनेकवचनीं सामान्यरूप करण्याचे नियम असे आहेत:—

(१) पहिल्या पांच प्रकारांत येणाऱ्या नामांचें अनेकवचनीं सामान्यरूप त्यांच्या एकवचनीं सामान्यरूपावर अनुस्वार दिल्यानें होतें. जसें:—बापांस, घोड्यांनीं, गव्हांचें, कवींचा, साधूंना, इ०

(२) ईकारान्त स्त्रीलिंगी नामें आणि सहा आणि सात या प्रकारांतील नामें यांच्या अनेकवचनाच्या अन्त्याक्षरावर अनुस्वार दिल्यानें त्यांचें सामान्यरूप होतें. उदा०:—नदी, नद्या, नद्यांस; माता, माता, मातांस; बायको, बायका, बायकांस; इ०

(३) संस्कृत भाषेंतील ईकारान्त स्त्रीलिंगी नामें, जीं मराठींत फारशीं प्रचारांत नाहींत अशीं, आणि आई, बाई, काकी, मामी, इत्यादि नात्याचीं आणि मानाचीं नांवें, यांचें अनेकवचनीं सामान्यरूप ईकारान्त होतें; जसें:—नारींस, वापींस, वापींना, आईंस, बाईंचें, इ०

टीप:—आई, बाई, इत्यादि नामें मानाकरितां योजलेलीं नसतां सामान्यरूप आयां,—बायां–असें होतें.

५४. आकारान्त स्त्रीलिंगी विशेषनामांचीं सामान्यरूपें आकारान्त आणि एकारान्त अशीं दोन्ही प्रकारचीं होतात. परंतु आकारान्त सामान्यरूप आदरार्थीं आणि एकारान्त अनादरार्थीं योजण्याची चाल दिसते. जसें:—रमा, रमा, रमे; गिरिजा, गिरिजा, गिरिजे; इंदिरा, इंदिरा, इंदिरे; मेनका, मेनका, मेनके; इत्यादि.

५५. आतां उदाहरणासाठीं कांहीं नामें चालून दाखवितों:—

### (१) अकारान्त नपुंसकलिंगी नाम 'घर.'

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | घर. | घरें. |
| द्वितीया | घर, घरास, घराला, घरातें. | घरें, घरांस, घरांला, घरांतें, घरांना. |
| तृतीया | घरें, घरानें, घराशीं. | घरांनीं, घरांहीं, घरांशीं. |
| चतुर्थी | घरास, घराला, घरातें. | घरांस, घरांला, घरांतें, घरांना. |
| पंचमी | घरून, घराहून. | घरून, घरांहून. |
| षष्ठी | घराचा, इ० | घरांचा, इ० |
| सप्तमी | घरीं. | घरीं. |
| संबोधन | घरा. | घरांनो. |

### (२) आकारान्त पुल्लिंगी 'वाडा' शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | वाडा. | वाडे. |
| द्वितीया | वाडा, वाड्यास, वाड्याला, वाड्यातें. | वाडे, वाड्यांस, वाड्यांला, वाड्यांना, वाड्यांतें. |
| तृतीया | वाड्यानें, वाड्याशीं. | वाड्यांनीं, वाड्यांहीं, वाड्यांशीं. |
| चतुर्थी | वाड्यास, वाड्याला, वाड्यातें. | वाड्यांस, वाड्यांला, वाड्यांतें, वाड्यांना. |
| पंचमी | वाड्याहून. | वाड्यांहून. |
| षष्ठी | वाड्याचा. | वाड्यांचा, इ० |
| सप्तमी | ( प्रत्यय लागून रूपें होत नाहींत. ) | |
| संबोधन | वाड्या. | वाड्यांनो. |

### (३) ईकारान्त पुल्लिंगी 'विद्यार्थी' शब्दः—विद्यार्थी, विद्यार्थ्यांस, विद्यार्थ्यांना, विद्यार्थ्यांतें, विद्यार्थ्यांहून, इ०

### (४) ईकारान्त पुल्लिंगी 'हत्ती' शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | हत्ती. | हत्ती. |
| द्वितीया | हत्ती, हत्तीस, हत्तीला, हत्तीतें. | हत्तींस, हत्तींला, हत्तींतें, हत्तींना. |
| तृतीया | हत्तीनें, हत्तीशीं. | हत्तींनीं, हत्तींहीं, हत्तींशीं. |
| चतुर्थी | हत्तीस, हत्तीला, हत्तीतें. | हत्तींस, हत्तींला, हत्तींतें, हत्तींना. |
| पंचमी | हत्तीहून. | हत्तींहून. |

| | | |
|---|---|---|
| षष्ठी | हत्तीचा. | हत्तींचा, इ० |
| सप्तमी | ( प्रत्यय लागून रूपें होत नाहींत. ) | |
| संबोधन | हत्ती. | हत्तींनो. |

( ५ ) ऊकारान्त स्त्रीलिंगी ‘ सासू ’ शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | सासू. | सासवा, सास्वा. |
| द्वितीया | सासू, सासूस, सासूला, सास्वेस, सास्वेला, सासवेस, सास्वेतें, इ० | सासू, सासूंस, सासवांस, सास्वांस, सासूंतें, सासवांतें, सास्वांतें, इ० |

( ६ ) ईकारान्त नपुंसकलिंगी ‘ मोतीं ’ शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | मोतीं. | मोत्यें. |
| द्वितीया | मोतीं, मोत्यास, मोत्याला, मोत्यातें. | मोत्यें, मोत्यांस, मोत्यांना, मोत्यांला, मोत्यांतें. |
| तृतीया | मोत्यानें, मोत्याशीं. | मोत्यांनीं, मोत्यांहीं, मोत्यांशीं, इ० |

( ७ ) ऊंकारान्त नपुंसकलिंगी ‘ सुकाणूं ’ शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | सुकाणूं | सुकाणें, सुकाण्वें, सुकाणवें. |
| द्वितीय | सुकाणूं, सुकाणास, सुकाणूस, सुकाण्वास, सुकाणवास. | सुकाणूं, सुकाण्वांस, सुकाणवांस, सुकाणांस. |
| पंचमी | सुकाणाहून, सुकाण्वाहून. | सुकाणांहून, सुकाण्वांहून,–इ० |

( ८ ) अकारान्त स्त्रीलिंगी ‘ केळ ’ शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | केळ; इ० | केळी, इ० |
| द्वितीया | केळीस; इ० | केळींस, केळींना,–इ० |
| पंचमी | केळीहून; इ० | केळींहून—इ० |

( ९ ) अकारान्त स्त्रीलिंगी ‘ वीट ’ शब्दः—वीट, विटा, विटेस, विटांस, विटेनें, विटेशीं, विटांनीं, विटेहून, विटांहून–इ०

( १० ) ओकारान्त स्त्रीलिंगी ‘ बायको ’ शब्दः—बायको, बायका, बायकोस, बायकांस, बायकोनें, बायकांनीं, बायकोहून, बायकांहून, इ०.

५६. नामांच्या विभक्ति नामांस विभक्तिप्रत्यय लावून जशा करितात, तशा त्या कित्येक अव्ययें लावूनही करितात. जसें,— हरीला याबद्दल हरीप्रत, हरीलागीं; मुंबईहून याबद्दल मुंबई-

**पासून**; घरीं याबद्दल **घरांत** ( घर+आंत ), **घरामध्यें**; माथीं याबद्दल **माथ्यावर**; इत्यादि. अशीं द्वितीयेपासून प्रत्येक विभक्तीचीं **अव्ययें** आहेत; त्यांतलीं मुख्य मुख्य अव्ययें अशीं आहेतः—

**द्वितीया**—प्रत, (प्रती), लागीं, ( लागोनी ); उदा०:—रामाप्रत, हरीलागीं, इत्यादि.

**तृतीया**—करून, मुळें, कडून, सह, बरोबर, ( करवीं ), हातें, ( सवें ); उदा०:—रामामुळें, हरीकडून, बापाकरवीं, इ०

**चतुर्थी**—प्रत, ( प्रती ), लागीं, ( लागोनी ), साठीं, स्तव, करितां; उदा०:—पुरुषाप्रत, हरीलागीं, लाभासाठीं, जयास्तव, विठूकरितां, इ०

**पंचमी**—पेक्षां, ( पासाव ), पासून, खेरीज, ( परीस ), वांचून, विना, शिवाय, ( वीण ); उदा०:—रामापेक्षां, घरापासून, हरीखेरीज, इत्यादि.

**षष्ठी**—विषयीं, संबंधी; उदा०:—हरीविषयीं, घरासंबंधी.

**सप्तमी**—आंत, मध्यें, ( माजी ), ( माझारी ), ( भीतरीं ), ठायीं, ( ठायां ); उदा०:—घरांत, रस्त्यामध्यें, युद्धामाजी, इत्यादि.

टीप—हीं अव्ययें विभक्तींच्या रूपांचा अर्थ दाखविण्यासाठीं योजितात, आणि त्यांचा शब्दांशीं योग म्हणजे संबंध असतो, म्हणून यांस विभक्त्यर्थक किंवा शब्दयोगी अव्ययें असें म्हणतात. यांतलीं कांहीं फक्त कवितेंत येतात, तीं वर अशा ( ) कौंसांत दाखविलीं आहेत.

---

## अभ्यास

### ९.

१ सामान्यरूप म्हणजे काय ? तें केव्हां करावें लागतें ?

२ कोणत्याही नामाचें प्रथमेचें रूप कसें होतें ?

३ पुढील नामांचीं एकवचनी सामान्यरूपें सांगाः—भगवान्. काका. चमचा. ससा. पांखरूं. चुलता. शास्त्री. केळें. लाडू. यति. केसरी. वाघीण.

गाय. आत. टाहो. वाट. वीट. तरवार. सासू. ऊ. इजा. परात. हात. डोहो. माऊ. नातू. सुकाणूं. स्त्री. पिसू. बी. बीं. बहीण.

४ पुढील वाक्यांत जीं विभक्तीचीं रूपें असतील तीं सांगा. तसेंच त्या रूपांचीं मूळचीं नामें, लिंगें आणि वचनें सांगाः—शिकारी तरवारीनें वाघास मारील. शेतकरी श्रम करितो तेव्हां त्याचें धान्य पिकतें. उद्योगी कुणबी पुष्कळ धान्य पिकवितो. ब्राह्मण गळ्यांत जानवीं घालितात. सिंहानें एकदम उडी मारून हरिणास पकडलें. आमच्या गुरुजींनीं प्रत्येकाला एक एक पुस्तक बक्षीस दिलें. मुलांनीं वडिलांची आज्ञा पाळावी. मी घरीं असतांना फक्त सदराच घालितों. विद्यार्थ्यांनीं शाळेंत मन लावून शिकावें. इंग्लंडांतील लोक हिंदुस्थानच्या लोकांहून अधिक उद्योगी आहेत. घरून निघालों तेव्हां चार वाजले होते. मुंबईहून पुण्याला येतांना घाटांत पुष्कळ चमत्कार दिसतात. डाक्टरानें मोठ्या कुशलतेनें त्याचा दुसरा डोळा बरा केला. मुंबई शहरांतील लोक नळाचें पाणी पितात. सध्या धान्याचे दर कसे काय आहेत ? तूर्त सोनें महाग आहे, पण मोत्यें बरींच स्वस्त आहेत. बाप घरांत आला पण मुलांशीं एक शब्दही बोलला नाहीं. प्रत्येकानें परमेश्वरास भजावें. हीं अक्षरें किरटीं असल्यामुळें मला नीटशीं वाचितां येत नाहींत. घराच्या गच्चीवर एक मोठा वानर बसलेला आहे. हरीनें चाकरास गांवाला पाठविलें. सोमा गवळी दूध कोठून आणितो ? ‘मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें.’ देवाच्या दासातें नाहीं भय चिंता. तुला पुनः असें करितां कामा नये. तो खिडकींतून खालीं आला. तुमच्या घरावरून गेलों तर आंत येण्यास चुकणार नाहीं. चिनांत प्रत्येक घराभोंवतीं चहाच्या झाडांची लहानशी सुंदर बाग असते.

५ पुढील विभक्त्यर्थक अव्ययें कोणत्या प्रत्ययांबद्दल घालतां येतात, हें वाक्यें तयार करून सांगाः—प्रत. कडून. करवीं. साठीं. विषयीं. मध्यें. माजी. लागोनी. वीण. परीस. पासाव. भींतरीं. ठायीं.

---

## ११—सर्वनाम-विचार.

---

५७. आपण बोलतांना पदार्थांबद्दल नामांचा उपयोग करून बोलतों. परंतु आपणास जर एखाद्या मनुष्याबद्दल अगर इतर

पदार्थाबद्दल वरेंचसें कांहीं सांगावयाचें असेल, तर त्यांच्या नामांचा उपयोग फिरून फिरून आपण करीत नाहीं. उदाहरणार्थ पुढील वाक्यें पाहा:—

" हरीचा एक कुत्रा आहे. हरीला कुत्रा फार आवडतो. हरी कुत्र्याला बरोबर घेऊन नदीच्या वाळवंटावर जातो. तेथें हरी कुत्र्याबरोबर खेळतो. हरी आणि हरीचा कुत्रा हे मित्र आहेत. हरी आणि हरीचा कुत्रा असे नेहमीं लांब फिरावयास जातात. "

या वाक्यांत **हरी** आणि **कुत्रा** हे शब्द फिरून फिरून आल्या-मुळें घोटाळा होतो; म्हणून तें वाक्य पुढीलप्रमाणें बोलतात आणि लिहितात:—

" हरीचा एक कुत्रा आहे. तो त्याला फार आवडतो. तो त्याला बरोबर घेऊन नदीच्या वाळवंटावर जातो. तेथें तो त्याबरोबर खेळतो. ते दोघे मित्र आहेत. ते दोघे नेहमीं लांब फिरावयास जातात. "

यांत **हरी** आणि **कुत्रा** या प्रत्येकाबद्दल **तो** हा शब्द आणि दोघांबद्दल **ते** हा शब्द घातला आहे. त्यामुळें दोन्ही नामांचा बोध होऊन वाक्यही नीट झालें आहे. असले शब्द आपल्या बोलण्या-मध्यें पदार्थांच्या नांवांबद्दल, म्हणजे नामांबद्दल येत असतात. त्यांना **सर्वनामें** असें म्हणतात.

५८. आपल्याला एका नामाच्या जागीं दुसरें नाम घालूनही बोलतां येईल. पण त्या दोन्ही नामांचा एक अर्थ असेल तर बोलतां येईल; तसेंच नामाच्या जागीं विशेषण घालूनही बोलतां येईल. पण विशेषण घातल्यानें आपल्यास सांगावयास नको असेल असें जास्त कांहीं सांगावें लागेल याचें कारण नामें आणि विशेषणें यांना स्वतंत्र अर्थ असतो. सर्वनामांना तसा स्वतंत्र किंवा स्वतांचा अर्थ नसतो. तर ज्या नामांबद्दल तीं घाल-

वयाचीं त्यांचा अर्थ त्यांना तेवढ्यापुरता मात्र येतो. यामुळें सर्व-नामें कोणत्याही नामांबद्दल घालितां येतात.

५९. हीं सर्वनामें अशीं आहेत:—बोलणारा स्वतांबद्दल **मी** असें म्हणतो. बोलणारे पुष्कळजण असले म्हणजे ते स्वतांबद्दल **आम्ही** म्हणतात; ज्याच्याजवळ बोलावयाचें त्याबद्दल तूं हें सर्वनाम येतें; व ते पुष्कळजण असले म्हणजे **तुम्ही** असें घालितात. ज्याविषयीं बोलावयाचें, तो जवळ असला तर, **हा** म्हणतात; दूर असला, तर **तो** म्हणतात. जो मनुष्य अगोदर ठाऊक असतो, त्याचा संबंध दाखवून बोलावयाचें असेल तर, **जो** म्हणतात. **कोणता ?** म्हणून विचारावयाचें असलें तर **कोण** अथवा **काय** म्हणतात. तेव्हां हीं सर्वनामें एकंदर—मी, तूं, तो, हा, जो, कोण आणि काय, अशीं सात आहेत.

६०. **मी** आणि **तूं** हीं सर्वनामें पुरुष, स्त्री, कोणी असलें तरी जशींच्या तशींच असतात; म्हणजे यांना लिंगांविषयींचा फरक होत नाहीं. परंतु **हा, जो, तो,** यांना फरक होतो; व सर्वांना वचनांचीं रूपेंही होतात. हें पुढें सर्वनामें चालविलीं आहेत त्यांवरून दिसून येईल.

( अ ) **कोण** आणि **काय** यांना लिंगांचीं व वचनांचीं रूपें होत नाहींत.

**व्याख्या:—नामांबद्दल घालावयाचे जे शब्द त्यांस सर्वनामें असें म्हणतात.**

६१. सर्वनामें नामांबद्दल येतात असें सांगितलें. तेव्हां व्याकर-णांतील उपयोगाच्या दृष्टीनें जशीं नामें तशींच सर्वनामें आहेत; म्हणजे नामांच्या योगानें जें काम होतें तेंच सर्वनामांच्या योगानें होतें. तसेंच नामांप्रमाणेंच त्यांचीं लिंगें, वचनें आणि विभक्ति यांचींही रूपें होतात.

सर्वनामें वाक्यांत कर्त्याच्या व कर्माच्या जागीं येतात. उदाहरणें:—( १ ) सर्वनामें कर्त्याच्या जागीं असल्याचीं;—**मी** आज येईन. **तूं** उद्यां जा. **तो** बोलतो. **जो** करील **तो** भरील. **हे** उद्यां जाणार आहेत. **जे** ( मुलगे ) उशीरां शाळेंत येतात, त्यांना शिक्षा होते. **त्या** काय म्हणाल्या ? **तुम्ही** फळें आणा आणि **जीं** पिकलीं असतील तीं खा. **कोण** बोलला ? **काय** पडलें ? इत्यादि.

( २ ) सर्वनामें कर्माच्या जागीं असल्याचीं;—बाबा **मला** पाठवितील, **तुला** पाठविणार नाहींत. शिक्षक **आम्हांस** बोलावील. हा **त्याला** काय बोलला ? मीं **हिला** पाहिलें नाहीं. **ज्याला त्याला** बोलावूं नको, इत्यादि.

टीपः—हीं जीं कर्माचीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांवरून दिसून येईल कीं, कर्म असतां सर्वनामाचें रूप मूळचें असतें त्यापेक्षां निराळें होतें; उदा०:–मी,–मला; तूं,–तुला; आम्ही,–आम्हांला; तो,–त्याला; जो,–ज्यास; इत्यादि. अशीं निराळीं रूपें कां होतात हें पुढें समजेल.

**६२. सर्वनामांचे भेद व त्यांचीं रूपें:**—(अ) **मी** आणि **तूं** हीं सर्वनामें बोलणारा व ऐकणारा असे पुरुष [ म्हणजे मनुष्य ] दाखवितात म्हणून यांस **पुरुष-वाचक** सर्वनामें असें म्हणतात. **मी** हें प्रथम-पुरुष-वाचक सर्वनाम, आणि **तूं** हें द्वितीय-पुरुष-वाचक सर्वनाम.

( आ ) हीं तिन्ही लिंगीं जशींच्या तशींच असतात. ज्या पदार्थाविषयीं किंवा मनुष्याविषयीं बोलावयाचें तो वरील दोन पुरुष म्हणजे बोलणारा व ज्याच्याजवळ बोलावयाचें तो, यांपासून निराळा म्हणजे तिसरा (तृतीय) आहे असें समजावें, म्हणून त्यास तृतीय पुरुष असें म्हणतात. **मी** व **तूं** या दोन शब्दांखेरीज सगळीं नामें, विशेषणें व सर्वनामें, यांचा तृतीय पुरुष समजावा.

( इ ) **हा** व **तो** हीं सर्वनामें पदार्थ दर्शवितात म्हणजे दाखवितात; म्हणजे त्यांचा उपयोग केला असतां आपणास अगोदर

ठाऊक आहे असा पदार्थ आठवतो किंवा दाखविला असतां समजतो; उदा०:–‘ हा [मनुष्य],’ ‘तो [मुलगा],’ ‘तें [घर],’ ‘ ही [पाटी],’ असें म्हटलें असतां, मनुष्य, मुलगा, घर, पाटी, हे पदार्थ जे आपणास अगोदर माहीत होते ते त्या सर्वनामांनीं आपणास दाखवून दिले किंवा त्यांची आठवण करून दिली. म्हणून त्यांस **दर्शक-सर्वनामें** म्हणजे ‘दाखविणारीं सर्वनामें’ असें म्हणतात. **हा** यापासून जवळचा पदार्थ समजतो व **तो** यापासून दूरचा समजतो.

६३. ( अ ) केव्हां आपणास मागें सांगितलेल्या किंवा अगोदर ठाऊक असलेल्या वस्तूचा संबंध दाखवून बोलावयाचें असतें. उदा०:— **जो** [ मुलगा ] मीं काल पाहिला तो [ मुलगा ] हा,’ असें म्हटलें म्हणजे **जो** यानें मागें पाहिलेल्या मनुष्याचा संबंध जोडून दिला. याला **संबंधी–सर्वनाम** असें म्हणतात.

( आ ) **काय** आणि **कोण** यांचा उपयोग कांहीं विचारावयाचें असतां करितात, म्हणून त्यांस **प्रश्नार्थक-सर्वनामें** असें म्हणतात.

६४. तेव्हां याप्रमाणें सर्वनामांच्या चार जाती आहेत:—

(१) पुरुषवाचक, (२) दर्शक, (३) संबंधी व (४) प्रश्नार्थक.

( १ ) जीं सर्वनामें बोलणारा आणि ऐकणारा असे पुरुष म्हणजे मनुष्य दर्शवितात, त्यांस **पुरुषवाचक–सर्वनामें** असें म्हणतात. हीं **मी** आणि **तूं** अशीं दोन आहेत.

( २ ) जीं सर्वनामें जवळचा अथवा दूरचा पदार्थ दर्शवितात म्हणजे दाखवितात, तीं **दर्शक–सर्वनामें**. हीं **हा** आणि **तो** अशीं दोन आहेत.

( ३ ) जीं सर्वनामें मागें सांगितलेल्या किंवा अगोदर ठाऊक असलेल्या पदार्थांचा संबंध दाखविण्यासाठीं योजितात, तीं **संबंधी–सर्वनामें**. हीं तिन्ही लिंगीं जो, जी, जें, अशीं आहेत.

( ४ ) पदार्थाबद्दल प्रश्न करून बोलावयाचें असतां योजावयाचीं सर्वनामें जीं **कोण व काय,** त्यांना **प्रश्नार्थक-सर्वनामें** असें म्हणतात.

टीप—कोणी सामान्यसर्वनामें असा पांचवा भेद कल्पून सर्व, अमका, भलता, फलाणा, इत्यादि शब्द त्यामध्यें गणतात. पण हे शब्द विशेषणें आहेत हें पुढें सांगितलें आहे. ( कलम ७७ आ, पाहा. )

६५. सर्वनामांच्या विभक्तींचीं रूपें बरींच कठीण आहेत. तीं पुढें दिलीं आहेत, तीं मुलांनीं ध्यानांत धरावीं:—

### ( १ ) प्रथमपुरुष सर्वनाम ' मी ' ( तिन्ही लिंगीं ).

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | मी. | आम्ही. |
| द्वितीया | मज, मला, मजला, मातें. | आम्हांस, आम्हांला, आम्हांतें. |
| तृतीया | मीं, म्यां, मशीं, मजशीं. | आम्हीं, आम्हांशीं. |
| चतुर्थी | मज, मला, मजला, मातें. | आम्हांस, आम्हांला, आम्हांतें. |
| पंचमी | मजहून. | आम्हांहून. |
| षष्ठी | माझा, माझी, माझें. | आमचा, आमची, आमचें. |

सप्तमी ( या विभक्तीचीं कोणत्याही सर्वनामाचीं प्रत्यय लागून रूपें होत नाहींत. )

संबोधन [ सर्वनामाचा उपयोग करून कोणास हाक मारितां येत नाहीं; यासाठीं सर्वनामांस संबोधन नाहीं. तथापि क्वचित् अरे तूं, अरे ह्या, अरे त्या, असें म्हणतात. ]

### ( २ ) द्वितीयपुरुष सर्वनाम ' तूं ' ( तिन्ही लिंगीं ).

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | तूं. | तुम्ही. |
| द्वितीया | तूज, तूस, तुला, तुजला, तूतें. | तुम्हांस, तुम्हांला, तुम्हांतें. |
| तृतीया | तूं, त्वां, तुशीं, तुजशीं. | तुम्हीं, तुम्हांशीं. |
| चतुर्थी | तूज, तूस, तुला, तुजला. | तुम्हांस, तुम्हांला, तुम्हांतें. |

| | | |
|---|---|---|
| पंचमी | तुजहून. | तुम्हांहून. |
| षष्ठी | तुझा, तुझी, तुझें. | तुमचा, तुमची, तुमचें. |

टीप—मी हें प्रथमेचें एकवचन आणि आम्ही व तुम्ही हीं प्रथमेचीं अनेकवचनें आहेत. तृतीयेचीं रूपें अशींच होतात. परंतु प्रथमेचीं आणि तृतीयेचीं रूपें ओळखतां येण्यासाठीं तृतीयेच्या रूपांवर अन्नीं अनुस्वार देऊन तीं मीं, आम्हीं, तुम्हीं अशीं लिहितात. उदा०:—' मी आलों, ' प्रथमा; ' मीं पुस्तक दिलें, ' तृतीया; ' आम्ही आलों, ' प्रथमा; ' आम्हीं काम केलें, ' तृतीया; ' तुम्ही आलेत, ' प्रथमा; ' तुम्हीं धडा वाचिला काय ! ' तृतीया; इत्यादि.

## ( ३ ) दर्शक सर्वनाम ' तो ' पुल्लिंगी.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | तो. | ते. |
| द्वितीया | तो, त्यास, त्याला, त्याजला, त्यातें. | ते, त्यांस, त्यांला, त्यांजला, त्यांतें, त्यांना. |
| तृतीया | त्यानें, त्याणें, त्याशीं, त्याजशीं. | त्यांनीं, त्यांणीं, त्यांहीं, त्यांशीं, त्यांजशीं. |
| चतुर्थी | त्यास, त्याला, त्याजला, त्यातें. | त्यांस, त्यांला, त्यांजला, त्यांतें, त्यांना. |
| पंचमी | त्याहून, त्याजहून. | त्यांहून, त्यांजहून. |
| षष्ठी | त्याचा, इ०. | त्यांचा, इ० |

## ( ४ ) दर्शक सर्वनाम ' ती ' स्त्रीलिंगी.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | ती. | त्या. |
| द्वितीया | ती, तिला, तिजला, तीस, तीतें. | त्या, त्यांला, त्यांजला, त्यांस, त्यांतें, त्यांना. |
| तृतीया | तिनें, तिशीं, तिजशीं. | त्यांनीं, त्यांहीं, त्यांशीं, त्यांजशीं. |
| चतुर्थी | तीस, तिजला, तिला, तीतें. | त्यांस, त्यांला, त्यांजला, त्यांतें, त्यांना. |
| पंचमी | तिहून, तीहून, तिजहून. | त्यांहून, त्यांजहून. |
| षष्ठी | तिचा, इ०. | त्यांचा, इ०. |

## (५) दर्शक सर्वनाम 'तें' नपुंसकलिंगी.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | तें. | तीं. |
| द्वितीया | तें, त्यास, त्याला, त्याजला, त्यातें. | तीं, त्यांस, त्यांला, त्यांजला, त्यांतें, त्यांना |
| तृतीया | ( पुढील रूपें 'तो' याच्या रूपांप्रमाणें. ) | |

## (६) दर्शक सर्वनाम 'हा' पुल्लिंगी.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | हा. | हे. |
| द्वितीया | हा, ह्यास, ह्याला, ह्याजला, ह्यातें, यास, याला, याजला, यातें. | हे, ह्यांस, ह्यांला, ह्यांजला, ह्यांतें, ह्यांना, यांस, यांला, यांजला, यांतें, यांना. |
| तृतीया | ह्यानें, ह्याशीं, ह्याजशीं, यानें, याशीं, याजशीं. | ह्यांनीं, ह्यांशीं, ह्यांहीं, ह्यांजशीं, यांनीं, यांहीं, यांशीं, यांजशीं. |
| चतुर्थी | ह्यास, ह्याला, ह्यातें, यास, याला, यातें. | ह्यांस, ह्यांला, ह्यांजला, ह्यांतें, ह्यांना, यांस, यांला, यांजला, यांतें, यांना. |
| पंचमी | ह्याहून, ह्याजहून, याहून, याजहून. | ह्यांहून, ह्यांजहून, यांहून, यांजहून. |
| षष्ठी | ह्याचा, याचा. | ह्यांचा, यांचा. |

## (७) दर्शक सर्वनाम 'ही' स्त्रीलिंगी.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | ही. | ह्या, या. |
| द्वितीया | ही, हीस, हिला, हिजला, हीतें, ईस, इला, इजला, ईतें. | ह्या, ह्यांस, ह्यांला, ह्यांजला, ह्यांतें, ह्यांना, या, यांस, यांला, यांजला, यांतें, यांना. |
| तृतीया | हिनें, हिशीं, हिजशीं, इनें, इशीं, इजशीं. | ह्यांनीं, ह्यांजशीं, ह्यांशीं, यांनीं, यांहीं, यांजशीं, यांशीं. |
| चतुर्थी | हीस, हिला, हिजला, हीतें, ईस, इला, इजला, ईतें. | ह्यांस, ह्यांला, ह्यांजला, ह्यांतें, ह्यांना, यांजला, यांला, यांतें, यांना. |

| | | |
|---|---|---|
| पंचमी | हिहून, हीहून, हिजहून, इहून, ईहून, इजहून. | ह्यांहून, ह्यांजहून, यांहून, यांजहून. |
| षष्ठी | हिचा, इचा. | ह्यांचा, यांचा. |

## (८) दर्शक सर्वनाम 'हें' नपुंसकलिंगी.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | हें | हीं. |
| द्वितीया | हें. | |

( आणखी रूपें पुल्लिंगाप्रमाणें. बाकीचीं सर्व रूपें पुल्लिंगी 'हा' याच्या रूपांप्रमाणें करावीं. )

## (९) संबंधी सर्वनाम 'जो' पुल्लिंगी.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | जो. | जे. |
| द्वितीया | जो, ज्यास, ज्याजला, ज्याला, ज्यातें. | जे, ज्यांस, ज्यांला, ज्यांजला, ज्यांतें, ज्यांना. |

टीप—याप्रमाणें सर्व रूपें हा या सर्वनामाप्रमाणें करावीं, मात्र ह्या याबद्दल ज्या असें घालून करावीं. 'याला' इत्यादि, अशीं दुसरीं रूपें होत नाहींत.

## (१०) संबंधी सर्वनाम 'जी' स्त्रीलिंगी.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | जी. | ज्या. |
| द्वितीया | जी, जीस, जिला, जिजला, जीतें. | ज्या, ज्यांस, ज्यांला, ज्यांजला, ज्यांतें, ज्यांना. |

टीप—याप्रमाणें सर्व रूपें 'ही' या सर्वनामाप्रमाणें करावीं, मात्र हा आणि ह्या यांबद्दल जी आणि ज्या असें घालून करावीं. 'ईस' इत्यादि दुसरीं रूपें होत नाहींत.

## (११) संबंधी सर्वनाम 'जें' नपुंसकलिंगी.

टीप—याचीं रूपें 'हें' व 'जो' या सर्वनामाप्रमाणें करावीं.

## (१२) प्रश्नार्थक सर्वनाम 'कोण' तिन्ही लिंगीं.

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | कोण. | कोण. |
| द्वितीया | कोण, कोणास, कोणाला, कोणातें. | कोण, कोणांस, कोणांला, कोणांतें. |
| तृतीया | कोणीं, कोणाशीं. | कोणीं, कोणांशीं. |

( याप्रमाणें पुढील रूपें करावीं. )

टीप—'कोण' याची प्रथमा व द्वितीया 'कोणी' अशीही करितात. तृतीयेचें रूपही 'कोणी' असें करितात; पण प्रथमा असतां अंतीं अनुस्वार नसतो, आणि तृतीया असतां अनुस्वार असतो. जसें,—'कोणी असें म्हणतात.' [ प्रथमा ], 'तुला असें कोणीं सांगितलें ?' [ तृतीया ].

**(१३)** प्रश्नार्थक सर्वनाम '**काय**' नपुंसकलिंगी, याचा उपयोग प्रथमा व द्वितीया या विभक्तींमध्यें जशाचा तसाच होतो. '**काय**' याला इतर विभक्तींचीं रूपें नाहींत. त्यांबद्दल '**कसा**' या विशेषणाचीं रूपें कशास, कशाला, कशानें, इत्यादि यांचा उपयोग करितात.

**६६. मी** याचें अनेकवचन **आम्ही** असें आहे. पण बोलणारा आणि दुसरे लोक असले म्हणजे **आम्ही** याचा अर्थ 'मी आणि दुसरे' असा आहे. त्याचप्रमाणें **तुम्ही** याचा अर्थही 'तूं आणि दुसरे' असाच होतो.

**६७.** ( अ ) ज्याप्रमाणें नामाचें **आदरार्थी अनेकवचन** असतें, त्याप्रमाणें सर्वनामाचेंही असतें; तसेंच बोलणारा राजा, सरदार, असा कोणी मोठा मनुष्य असला म्हणजे तो एकटा असतांही 'मी' बद्दल 'आम्ही' म्हणतो. ग्रंथकार आणि वर्तमानपत्रकर्तेही स्वतांबद्दल अनेकवचन योजितात. अशाच रितीनें 'तूं' बद्दल 'तुम्ही,' 'तो' बद्दल 'ते,' 'ती' बद्दल 'त्या,' 'हा' बद्दल 'हे' असें घालितात. उदा०:–'आमच्या पत्राच्या कालच्या अंकांत असा मजकूर आला आहे;' 'त्या किंवा या बाई सुशील आहेत;' 'तुम्ही आमचे व्याही झालेत;' 'ते आमचे भाचे आहेत;' इत्यादि.

( आ ) आपण पत्र वगैरे लिहितांना दुसऱ्याला, तो आपल्यापेक्षां मानानें अथवा वयानें लहान असला तरी, तुम्ही, ते, हे, असें अनेकवचनींच लिहितों. बोलतांना फार सलगी असली तर मात्र, अथवा मनुष्य आपल्यापेक्षां वयानें व मानानें लहान असल्यास आपण एकवचनीं बोलतों; पण इतरांच्या संबंधानें अनेकवचनींच बोलतों; आणि लिहिण्यामध्यें तर नेहमींच अनेकवचन योजितों. हेंही **आदरार्थी अनेकवचन** होय.

**६८.** ( अ ) मराठींत '**आपण**' असें एक सर्वनाम आहे. वस्तुतः हें मूळचें विशेषण आहे. बोलणारा स्वतांबद्दल 'आपण' म्हणतो. उदा०:— 'आपण ( मी ) उद्यां येणार नाहीं.' त्याचप्रमाणें मागें येऊन गेलेल्या नामाबद्दल अथवा सर्वनामाबद्दल लगेच दुसरें सर्वनाम घालणें झाल्यास 'आपण' घालितात. उदा०:–'तूं आपल्या ( तुझ्या ) घरीं जा.' 'तो आपल्या गांवीं रहातो.' इत्यादि. 'आमच्या' याबद्दलही 'आपल्या' घालितात; आणि द्वितीयपुरुषाबद्दलही 'आपण' घालितात. जसें,–'आपण उद्यां आमच्या

घरीं विद्याला यावें. ' या ठिकाणीं हें अनेकवचनीं असतें. याचीं रूपें अशीं होतातः—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | आपण. | आपण. |
| द्वितीया | आपणास, आपणाला. | आपणांस, आपणांला. |
| तृतीया | आपण, आपणाशीं. | आपण, आपणांशीं. |
| चतुर्थी | आपणास, आपणाला. | आपणांस, आपणांला. |
| पंचमी | आपणाहून. | आपणांहून. |
| षष्ठी | आपला, आपली, आपलें इ० | आपला, आपली, आपलें इ० |

टीप—आपण हें प्रथमपुरुषीं व द्वितीयपुरुषीं आहे. परंतु पुष्कळांची तें तृतीयपुरुषींही समजण्याची चाल आहे; जसें,—'आपण वारंवार पत्र पाठवितील.' इ०

( आ ) **कोण** आणि **काय**:—**कोण** याचा उपयोग फारकरून मनुष्य वगैरे उच्च प्राण्याच्या नांवासंबंधानें करितात; **काय** याचा उपयोग मनुष्येतर प्राणी व हलके लोक यांबद्दल आणि क्षुद्रत्व दाखविण्यास करितात; जसें,—' तो कोण मनुष्य आहे ? ' ' तें तिकडे काय पडलें आहे ? ' ' काय मूर्ख मनुष्य आहेस रे तूं ! ' इत्यादि.

( इ ) अज्ञात मनुष्याबद्दल **कोण** याचा नपुंसकलिंगी उपयोग करितात; जसें,—' कोण तें ? ' ' तें तिकडे कोण आहे ? '. ' तुला कोण दिसलें ? ' इत्यादि.

( ई ) **काय** याचा संबंधीसर्वनाम **जें** याबद्दलही उपयोग होतो; जसें,—' काय (म्ह० जें) देईल तें घे. '

( उ ) **काय** याच्या उपयोगापासून आश्चर्य वाटलें आहे असेंही दिसून येतें; जसें:—' काय हें धैर्य ! ' ' त्याच्या कृतीविषयीं काय काय ह्मणून सांगावें ! ' इत्यादि.

---

## अभ्यास

### १०

१ पुढील वाक्यांत जेथें नामांच्याबद्दल सर्वनामें घालावयास पाहिजे आहेत तेथें तीं घालून वाक्यें कराः—हरी हरीच्या शाळेंत हरीचीं पुस्तकें व

हरीची पाटी घेऊन गेला. हरी रामाच्या बापाकडे जाऊन हरीनें* 'रामाला घेऊन खेळावयास जावें काय?' असें रामाच्या बापास विचारिलें. रामा म्हणतो, रामानें विठूस म्हटलें, 'विठू रामाबरोबर अभ्यास करावयास येईल काय? रामा दाखवीत आहे हें पुस्तक विठूजवळ आहे काय?' विठू म्हणाला, 'विठूनें† काल घोडा पाहिला.' काल पाहिलेला घोडा विठू विकत घेणार.

२ पुढील वाक्यांत हरी विठूशीं बोलत आहे असें समजून सर्वनामें घाला:—हरीनें विठूस शाळेंत पाहिलें. हरीचे काका गांवाहून आले. आतां विठूनें हरीच्या काकांना विठूला हरीच्या घरीं येण्याची परवानगी विचारण्यास यावें. विठूचा घोडा उंच आहे; हरीचा लहान आहे. विठूचा बाप श्रीमंत आहे तसा हरीचा नाहीं; यामुळें हरीजवळ अभ्यासाचीं सर्व पुस्तकें नाहींत; म्हणून विठू हरीला कांहीं पुस्तकें देईल तर बरें. काल बागेंत भेटलेला हरीचा आणि विठूचा मित्र आज सकाळीं हरीच्या घरीं आला होता. हरी म्हणतो, तें पुस्तक रामाजवळ असेल असें विठूला वाटतें काय?

३ पुढील वाक्यांत हरी विठूशीं न बोलतां विठूबद्दल व दुसऱ्या गोष्टीविषयीं तिसऱ्याच माणसाजवळ बोलत आहे असें समजून सर्वनामें घाला:—हरी विठूला आवडतो, कारण विठू चांगला मुलगा आहे. हरी विठूला आज मुंबईस भेटेल; विठूनें वाट पाहावी. विठूनें एक पाखरूं धरिलें हें हरीनें पाहिलें. विठू पाखराचे हाल करणार नाहीं; विठू पाखरास सोडून देईल असें हरीला वाटतें. विठूनें विठूच्या घोड्यास विठूच्या नव्या चाबकानें मारिलें म्हणून विठूचा बाप विठूला रागें भरला, आणि म्हणाला, विठूला एक आठवडा बसावयास घोडा मिळणार नाहीं.

४ दुसऱ्या व तिसऱ्या प्रश्नांतील बोलणारा विठू आहे असें मानून वाक्यें करा.

५ वरील सर्व वाक्यांत बोलणारा तिसराच आहे असें समजून वाक्यें करा.

६ ज्या सर्वनामांचीं कांहीं विभक्तींचीं रूपें जुळतात, अशीं सर्वनामें व तीं रूपें कोणतीं तें सांगा.

---

* येथें प्रथम पुरुष-सर्वनाम, घालावें.

† येथें जो, तो, हीं सर्वनामें घालून वाक्यें करावीं.

७ 'हा' या सर्वनामाचीं तिन्ही लिंगीं दुसरीं म्हणजे जास्त रूपें कोणतीं होतात ?

८ बोलणारा एकटा असतां त्याबद्दल अनेकवचनीं सर्वनाम केव्हां घालितात ? अशा उपयोगास आदरार्थी अनेकवचन असें कां म्हणतात ?

---

## १२–विशेषण-विचार.

६९. विठू शाहणा आहे; कुशी हट्टी नाहीं; झाड उंच आहे; पांढरें स्वच्छ धोतर आण; द्वाड मुलगा पळाला; चार माणसें दिसतात; दोन दिवस पाऊस आहे; लेखण्या तीन आहेत; या वाक्यांत शाहणा, हट्टी, उंच, पांढरें, स्वच्छ, द्वाड, चार, दोन, तीन, या शब्दांनीं ते ज्या पदार्थांच्या नांवांबरोबर घातले आहेत, त्यांविषयीं जास्त किंवा **विशेष**, असें कांहीं सांगितलें आहे.

( अ ) असे शब्द नामांच्या अगोदर येत असतात व त्यांवरून पदार्थांच्या नुसत्या नांवानें जें कांहीं कळतें त्यापेक्षां **विशेष**, म्हणजे **कसा** किंवा **किती** असें कांहीं तरी जास्त कळतें. उदाहरणार्थ,– **घोडा** म्हटलें म्हणजे कोणताही एखादा घोडा. पण **पांढरा घोडा**, म्हटलें म्हणजे विशेष प्रकारचा घोडा, अशी अर्थाची मर्यादा झाली. '**चार गृहस्थ**' म्हणजे गृहस्थ किती हें सांगितलें. अशा प्रकारच्या शब्दांस **विशेषणें** असें म्हणतात.

**ज्या शब्दावरून पदार्थांबद्दल कसा, किती, असें विशेष कांहीं तरी समजतें, त्यांस विशेषण असें म्हणतात.**

उदाहरणें:—पुढील वाक्यांतील जाड शब्द विशेषणें आहेत:–**कडक** ऊन पडलें आहे. **फार** पाऊस पडला. आतांची **शांत** वेळ आहे. चेंडू **वाटोळा** असतो. **हुशार** मुलगे धडा **चांगला** करितात. **तिखट** पदार्थ खाऊं नये. पाटी **चौकोनी** असते. त्यास **चार** मुलगे व **तीन** मुली आहेत. माझे **दोन** भाऊ काशींत असतात. **तीन** आंबे व **चार** पेरू

असे **दोन** आण्यांस मिळाले. आमच्या वर्गांत **वीस** मुलें आहेत. **काळी** छत्री माझी आहे. विनायकाचा बाप **फार रागीट** आहे. इत्यादि.

७०. विशेषण ज्या पदार्थाबद्दल विशेष कांहीं सांगतें त्या पदार्थाच्या नांवास **विशेष्य** असें म्हणावें; उदा०:—'हट्टी **मुलगा**;' यांत **मुलगा** हें **विशेष्य** होय.

**७१. विशेषणाचे प्रकार**:—विशेषणापासून जसा पदार्थाचा कांहीं विशेष गुण समजतो, त्याचप्रमाणें त्याची एक, दोन, चार, दहा, अशी संख्याही समजते; जसें,—'गोड पदार्थ;' 'उंच झाड;' 'हुशार मुलगा;' 'सुंदर फूल;' या उदाहरणांतील विशेषणांपासून गुणाचा बोध झाला; आणि 'दोन बैल;' 'चार मुलगे;' इत्यादि, या उदाहरणांतील विशेषणांवरून संख्येचा बोध झाला.

७२. यावरून विशेषणें दोन प्रकारचीं आहेत:—

**( १ ) गुणविशेषणें आणि ( २ ) संख्याविशेषणें.**

**( १ ) जीं विशेषणें गुण दाखवितात, तीं गुणविशेषणें होत.**

**(२) जीं विशेषणें संख्या दाखवितात, तीं संख्याविशेषणें.**

टीप—( १ ) गुण म्हणजे पदार्थांमध्यें जें कांहीं विशेष असतें तें. याचें शिक्षकांनीं स्पष्टीकरण करावें. ( २ ) सर्वनामात्मक विशेषणें म्हणून एक विशेषणांचा प्रकार आहे. ह्या विशेषणांबद्दल पुढें क० ७७ यांत सांगितलें आहे.

७३. विशेषण ज्या नामास लागतें त्याचें जें लिंग, जें वचन, व जी विभक्ति तेंच लिंग, तेंच वचन व तीच विभक्ति विशेषणाची समजावयाची; उदा०:—'उंच मुलग्यानें,' यांत **मुलग्यानें** याची जी तृतीया विभक्ति तीच **उंच** याची आहे. तसेंच 'सरळ झाडें,' यांत **झाडें** याचें जें अनेकवचन तेंच **सरळ** याचें आहे. असें जरी आहे, तरी **उंच, सरळ,** हीं विशेषणें नामांस लिंग, वचन व विभक्ति हीं लागलीं तरी फिरलीं नाहींत. परंतु जीं आकारान्त विशेषणें आहेत

त्यांचीं रूपें लिंगांवरून व वचनांवरून फिरतात; व विशेष्यास विभक्ति लागली असतां त्यांचें सामान्यरूप होतें. उदाहरणें:—

| एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- |
| ‘ चांगला मुलगा, ’ | ‘ चांगले मुलगे; ’ |
| ‘ पांढरी टोपी, ’ | ‘ पांढऱ्या टोप्या; ’ |

त्याचप्रमाणें ‘ चांगल्या माणसानें; ’ ‘ बऱ्या बोलानें; ’ ‘ पांढऱ्या गाईचें दूध; ’ ‘ हिरव्या चाफ्यावर; ’ इ०

(अ) शुद्ध संख्याविशेषणें हीं आकारान्त असलीं तरी त्यांचीं रूपें फिरत नाहींत. पण क्रमवाचक संख्याविशेषणें फिरतात. उदा०:— ‘बारा मुलगे,’ ‘बारा मुली,’ ‘बारा मुलींस,’ ‘बाराव्या दिवशीं,’ ‘ पांचव्या पृष्ठांत; ’ इ०

७४. नामांस आणि सर्वनामांस चा, ची, चें, हे प्रत्यय लागून होणारीं रूपें, रामाचा, हरीचा, झाडाचें, त्याचा, माझा, तुमचें, इत्यादि, ज्यांना आपण षष्ठीचीं रूपें असें म्हणतों, तीं वास्तविक विशेषणें आहेत. यांना **संबंधी-विशेषणें** असें म्हणावें, हीं विशेषणें लिंगा-प्रमाणें व वचनाप्रमाणें फिरतात; आणि त्यांच्या विशेष्यास विभक्ति लागली असतां त्यांचें सामान्यरूप होतें; उदाहरणें:—विठूचा बाप; विठूचें पुस्तक; बरूच्या लेखण्या; त्याची आई; झाडाचीं पानें; डोकीची टोपी; हरीच्या घरीं; त्याच्या हातांत; रामाच्या भावाला; इ०.

७५. विशेष्यास विभक्ति लागली असतां विशेषणाचें सामान्यरूप होतें, तें एकवचनीं आणि अनेकवचनीं सारखेंच असतें; आणि तें याकारान्त आणि एकारान्त असें दोन प्रकारचें असतें; उदाहरणें:— चांगल्या किंवा चांगले माणसानें अथवा माणसांनीं; हरीच्या किंवा हरीचे भावानें अथवा भावांनीं; काळ्या अथवा काळे बैलानें अथवा बैलांनीं; आमच्या अथवा आमचे घरीं; इ०.

## ७६. संबंधी विशेषणांविषयीं कांहीं विशेष गोष्टी:—

( १ ) संबंधी विशेषणाचा प्रत्यय ' चा ' हा लावितांना शब्दाचें सामान्यरूप होतें. परंतु सकाळ, दुपार, संध्याकाळ, इत्यादि अकारान्त कालवाचक नामांचें सामान्यरूप होत नाहीं; उदा०:–वेळचा; सकाळचा; दुपारचा; इत्यादि.

( २ ) अकारान्त स्थलवाचक नामांसही हा प्रत्यय लागतांना पुष्कळ वेळां सामान्यरूप विकल्पेंकरून होतें; उदा०:–दारचा, दाराचा; घरचा, घराचा ; खेडचा, खेडाचा; इत्यादि. ( क० ४९, टीप ( २ ) पाहा ).

**७७. सर्वनामात्मक** विशेषणें–( अ ) सर्वनामापुढें नाम आलें असतां तेथें तें सर्वनाम विशेषणच असतें; उदाहरणें:–जो मनुष्य, तो मनुष्य, ह्या मुलानें, ती मुलगी, मला ब्राह्मणाला, तुम्हीं मुलांनीं, इत्यादि. हीं सर्वनामात्मक विशेषणें होत.

( आ ) कांहीं विशेषणें सर्वनामांपासून झालीं आहेत. तीं उपयोगांत सर्वनामासारखींच असतात; परंतु त्यांना अर्थ असतो, म्हणून त्यांना सर्वनामें न म्हणतां विशेषणेंच म्हणावें. उदा०:—असा, जसा, तसा, कसा, केवढा, तेवढा, कोणचा, कोणता, अमका, तमका, भलता, सर्व, फलाणा, कोणी, एक, इत्यादि. यांना **सामान्यसर्वनामें** असें म्हणून सर्वनामांचा एक पांचवा भेद मानण्याची कोणाची चाल आहे.

( इ ) सर्वनामें व विशेषणें यांतील भेद:—सर्वनामें व विशेषणें यांतला भेद असा आहे, कीं विशेषणांस स्वतांचा अर्थ असतो, सर्वनामांस तो नसतो. सर्वनामें ज्या नामांबद्दल घातलेलीं असतात, त्यांचा अर्थ त्यांना त्या ठिकाणीं, उपयोग असेल तेवढ्यापुरता येतो; उदाहरणार्थ, 'तो (मनुष्य);' येथें ' तो ' यास ' मनुष्य ' असा अर्थ आला. दुसऱ्या ठिकाणीं ' तो ( घोडा ), ' असें म्हटलें कीं, ' तो ' याचा अर्थ ' घोडा, ' असा झाला. परंतु ' चपळ घोडा ' आणि ' चपळ मुलगा, ' असें म्हटलें असतां ' चपळ ' याचा अर्थ ' जलद धांवणारा ' असा आहे तोच दोन्ही ठिकाणीं कायम आहे.

**७८. नाम आणि विशेषण यांतला भेद**:—गोल म्हणजे वाटोळें. ' पृथ्वी **गोल** आहे, ' यांत **गोल** हें विशेषण आहे; पण ' आकाशांत असंख्य **गोले** फिरतात, ' यांत तें नाम आहे. ' **श्रीमंत** मनुष्य,' यांत **श्रीमंत** हें विशेषण आहे; पण ' **श्रीमंतांस** हें शोभतें, ' यांत तें नाम आहे. तेव्हां

विशेषणाचा स्वतंत्र उपयोग झाला असतां तें नाम होतें. नामाचा स्वतंत्र उपयोग होतो आणि विशेषण नामाबरोबर म्हणजे विशेष्याबरोबर येतें; त्याचा स्वतंत्र उपयोग होत नाहीं. उदाहरणार्थ,—रामा **उंच** आहे; देव **थोर** आहे; **गरीब** माणसाची दया येते; **पहिल्या** मुलास दरमहा पगार मिळतो; **चार** शिपायांनीं त्यास धरून नेलें; या वाक्यांत उंच, थोर, गरीब, पहिला व चार हीं विशेषणें आहेत. पण, पुस्तक **उंचावर** ( उंच जागेवर ) होतें; **थोरांचें** ( थोर माणसांचें ) सर्वच थोर; **गरीबांस** ( गरीब मनुष्यांस ) धर्म करावा; **पहिल्यास** (पहिल्या मुलास) ऐशी गुण मिळाले. **चारांनीं** (चार लोकांनीं) सांगितलेलें मानावें; यांत तेच शब्द नामें आहेत. विशेषणाचा नामासारखा उपयोग केला असतां, त्याला विशेषण आणि नाम यांचा अर्थ एकदम येतो. हें वरील वाक्यांत कौंसांत घातलेल्या शब्दांवरून कळून येईल.

७९. **क्रियाविशेषणें** किंवा **विधिविशेषणें**:—विशेषणाचा संबंध नामाशीं असतो. परंतु केव्हां त्याचा नामाशीं संबंध असून शिवाय क्रियापदाशींही असतो. अशा विशेषणांस **क्रियाविशेषणें** अथवा **विधिविशेषणें** असें म्हणतात. उदाहरणार्थ, 'हरी **हुशार** आहे;' 'रामा औषध घेऊन **बरा** झाला;' 'खेकडे **उलटे** चालतात;' 'त्या दांड्या **तिरप्या** बसल्या;' या वाक्यांतलीं **क्रियाविशेषणें** अथवा **विधिविशेषणें** आहेत. हीं क्रियापदाजवळ असतात.

८०. जीं विशेषणें विकार पावतात, तीं विधिविशेषणें असतांनाही फिरतात. जसें,–'हरी **बरा** झाला;' 'भिमी **बरी** झाली;' 'त्या दांड्या **तिरप्या** बसल्या;' इ०.

( अ ) वाक्यांत सकर्मक क्रियापद असतां विधिविशेषणें कर्माप्रमाणें फिरतात; एरव्हीं कर्त्याप्रमाणें फिरतात; उदा०:—'हा विद्यार्थी आपले धडे नेहमीं चांगले करितो;' 'वैद्य रोग्याला बरा करील;' 'हा मुलगा मोठा हुशार आहे.' इत्यादि.

( आ ) क्रमवाचक विशेषणें आरंभीं पहिला, दुसरा, तिसरा, चौथा, अशीं होतात; व पांचपासून पुढें पांचवा, सहवा, सातवा, अशीं 'वा' प्रत्यय लागून होतात. दहापासून पुढें अन्त्य 'अ'चा 'आ' होतो; उदा०:—दहावा, पन्नासावा, इ०.

( इ ) दोन, तीन, चार, यांपासून पुढें दिल्याप्रमाणें संघवाचक विशेषणें होतात:—

| पुल्लिंगी | स्त्रीलिंगी | नपुंसकलिंगी |
|---|---|---|
| दोघे | दोघी | दोघें |
| तिघे | तिघी | तिघें |
| चौघे | चौघी | चौघें |

पांचांपासून पुढें 'जण' असा शब्द पुढें घेऊन पांचजण, सहाजण, इत्यादि रूपें होतात. 'जण' प्रत्यय लागून झालेलीं विशेषणें लिंगाप्रमाणें फिरतात, पण पुल्लिंगी रूप अकारान्तच असतें; जसें,—पांचजण, सहाजणी, सातजणें, इत्यादि.

( इ ) सर्व संख्यावाचक विशेषणांचा केव्हां नामांसारखा उपयोग होतो, आणि 'एक' याशिवाय बाकीचीं नेहमीं अनेकवचनीं असतात; उदा०:–'हें काम पांचांनीं ( पांचजणांनीं ) होणार नाहीं,' 'दहांनीं सांगितलेलें मानावें;' इत्यादि.

८१. फार, अति, पुष्कळ अशा कित्येक विशेषणांचा अन्य विशेषणांशीं आणि अव्ययांशींही संबंध असतो; तेव्हां त्यांस विशेषणें न म्हणतां **क्रिया-विशेषण अव्ययें** असें म्हणतात; उदा०:–'तूं **फार** चांगलें काम केलेंस,' 'पक्षी **अति** उंच उडाला,' 'मी **पुष्कळ** लांब फिरावयास गेलों होतों,' इत्यादि.

---

## अभ्यास

## ११

१ पुढील शब्दांतील निरनिराळ्या जातींचीं विशेषणें सांगा:—कुत्र्याचें आंखूड शेपूट. भित्रा मुलगा. हुशार पोर. आमचा गांव. ज्येष्ठ पुत्र. खालची पेटी. हरीचा भाऊ. फुटलेला आरसा. पहिला दिवस. आमचे अंगरखे. बाहेरील आंग. परवांचा मनुष्य. दहावा घोडा. चार बैल. आठवी तारीख. गार वारा. उंच घर. सुवासिक तेल. पदार्थांचा उपयोग. उच्च कूळ. पंधरा लाडू. निळा रंग. फुटकें ग्लास. अठरा वायू. मंद वायु.

२ पुढें नामें आणि विशेषणें दिलीं आहेत; त्यांत ज्या विशेषणांचीं रूपें फिरत असतील त्यांचीं रूपें नामांचीं लिंगें फिरवून तसेंच नामांना विभक्ति

लावून आणि त्यांचीं लिंगें बदलून फिरवून दाखवाः--करडें कोंकरूं. शहाणा मुलगा. आपला घोडा. रामाचा चाकर. मारकी गाय. स्नानाची जागा. तेथला जोडा. हाताखालील वस्तू. बसावयाचा घोडा. धाकटा मुलगा. बोलका राघू. थोरला भाऊ. हुशार विद्यार्थी. स्वच्छ धोतर. उंच शिखर. खासगी शाळा.

३ पुढील शब्दांचा नामें आणि विशेषणें असा दोन्ही प्रकारचा उपयोग करून दाखवाः-छोटा, खरा, शहाणा, लबाड, लुटारू, मूर्ख, कृष्ण, साधु, दोन, चार, उंच, भला, गुणवंत, खोटेंनाटें, बरेंवाईट.

४ लिंग, वचन आणि विभक्ति यांवरून ज्यांचीं रूपें फिरतात, अशीं दहा विशेषणें पाटीवर लिहून दाखवा.

५ पुढील विशेषणांचा पुल्लिंगी उपयोग कराः-बरें, शाहाणें, गोरें, कोरडें, निराळें, काळें.

६ पुढील विशेषणांचा स्त्रीलिंगी उपयोग कराः-जाडें, त्याचें, वरचा, पांढरें, करणारें, रांगतें, कोरडें.

७ पुढील विशेषणांचा साध्या विशेषणांसारखा आणि क्रियाविशेषणांसारखा उपयोग कराः-विलक्षण, शहाणा, उंच, हुशार, मेला, येणार, हातचा, पुढील, खोल, सोनेरी.

८ पांच सर्वनामात्मक विशेषणें लिहा.

९ नाम आणि विशेषण आणि सर्वनाम आणि विशेषण, यांतील भेद, त्यांचा वाक्यांत उपयोग करून स्पष्ट दाखवा.

१० विशेषणें अन्य विशेषणांबरोबर अथवा क्रियाविशेषणांबरोबर आलीं आहेत अशीं उदाहरणें लिहा.

---

## १३-क्रियापद-विचार.

८२. 'हरी पुस्तक वाचितो;' 'गडी काम करील;' 'मीं गांवाला गेलों;' 'मूल रडतें;' 'घोडा उभ्यानें झोंप घेतो;' 'परमेश्वर दयाळू आहे;' 'माझा भाऊ मुंबईस होता;' या वाक्यांत वाचितो, करील, गेलों, रडतें, घेतो, आहे, होता, या शब्दांनीं हरी,

गडी, मी, मूल, घोडा, परमेश्वर, भाऊ, यांचें **करणें** किंवा **असणें** यांचा बोध झाला. या प्रकारच्या शब्दांस **क्रियापदें** असें म्हणतात.

टीप—असणें किंवा करणें यांना क्रिया असें म्हणतात; तद्दर्शक जें पद म्हणजे शब्द तें क्रियापद.

८३. (१) क्रियार्थदर्शक असा जो मूळचा शब्द त्यास **धातु** असें म्हणतात; उदाहरणार्थ,—असेल यांत ' अस, ' होता यांत ' हो, ' केलें यांत ' कर, ' देतील यांत ' दे, ' बसला यांत ' बस; ' याप्रमाणें ऊठ, वाच, जा, ये, बोल, इ० हे धातु आहेत.

( २ ) या धातूंपासून दोन प्रकारचे क्रियावाचक शब्द होतात; जसें,—पहिल्या प्रकारचे म्हणजे क्रियेचें पूर्ण ज्ञान करून देणारे;—( मी ) असतों; ( तो ) येईल; ( ती ) जाते; ( हरी ) बसला; ( गोविंदा, तूं ) जा; ( मुलांनीं धडे पाठ ) करावे; इ०

( ३ ) दुसरे, ज्यांपासून क्रियेचें अपुरें ज्ञान होतें असे शब्द; जसें,—करणार, बसूं, जातांना, बोलून, वाचावयास, जावयाचें, इ०

टीप—या दोन प्रकारच्या क्रियार्थक शब्दांवरून दिसून येईल कीं, पहिल्या प्रकारच्या शब्दांवरून केव्हां असें वेळेचें ज्ञान पूर्ण होतें; पण दुसऱ्या प्रकारच्या शब्दांवरून तें ज्ञान होत नाहीं.

( ४ ) पहिल्या प्रकारच्या शब्दांस **क्रियापदें** असें म्हणतात; आणि दुसऱ्या प्रकारच्यांस **कृदन्तें** अथवा **धातुसाधित शब्द** असें म्हणतात.

**( ५ ) ज्या शब्दानें पदार्थाचें असणें किंवा करणें या गोष्टीचा काळाच्या संबंधानें पूर्ण बोध होतो, त्यास क्रियापद असें म्हणतात.**

**( ६ ) ज्या शब्दावरून क्रियेचा अपूर्ण बोध होतो, त्यास कृदन्त किंवा धातुसाधित शब्द असें म्हणतात.**

५

८४. मागें [ क्र० १४ यांत ] सांगितलेंच आहे, कीं कित्येक धातुशब्दांचा अर्थ त्यांच्यामध्यें पूर्ण असतो आणि कांहींचा अर्थ पूर्ण होण्यास काय असें कांहीं जास्त सांगावें लागतें; उदाहरणार्थ,– 'तो बसतो,' 'मी चालेन,' 'हरी गेला,' ह्यांत काय केलें तें पूर्ण सांगितलें आहे, पण 'विद्यार्थी.........वाचितो,' 'गवळी...... काढितो,' 'मुली......म्हणतील,' यांत वाचितो काय, काढितो काय, म्हणतील काय, हें सांगावें लागतें; म्हणून हीं वाक्यें 'विद्यार्थी पुस्तक वाचितो' 'गवळी दूध काढितो,' 'मुली गाणीं म्हणतील,' अशीं असलीं पाहिजेत. हें जें काय असें सांगावें लागतें, याला कर्म असें म्हणतात. हें ज्या धातूंबरोबर सांगावें लागतें, त्यांस सकर्मक म्हणजे 'ज्यांस कर्म आहे असे धातु' असें म्हणतात; आणि हें ज्यांबरोबर सांगावें लागत नाहीं त्यांस अकर्मक अथवा 'ज्यांस कर्म नको असे धातु' असें म्हणतात.

टीप–मूळचे धातु अर्थावरून सकर्मक आणि अकर्मक असतात आणि त्यांपासून झालेलीं क्रियापदें त्यांस सकर्मक आणि अकर्मक असें म्हणतात.

८५. तेव्हां धातुशब्द दोन प्रकारचे असतात:–

**( १ ) सकर्मक आणि ( २ ) अकर्मक.**

( १ ) ज्या धातुशब्दांचा अर्थ फक्त 'असणें' असा असतो, किंवा 'करणें' असा अर्थ असून, काय करणें तें सांगावें लागत नाहीं, ते अकर्मक धातु होत.

( २ ) ज्या धातुशब्दांचा अर्थ 'करणें' असा असून त्यांच्याबरोबर 'अमुक करणें' असें सांगावें लागतें, ते सकर्मक धातु होत.

८६. धातूंवरून असणें किंवा करणें असा बोध होतो तेव्हां अर्थात् असणारा किंवा करणारा कोणी तरी असतो; उदा०:— 'हरी हुशार आहे,' यांत असणारा हरी आहे. 'गडी काम करितो,' यांत काम करणारा गडी आहे 'मी चालतों,' यांत

चालणारा मी आहें. अशा रितीनें क्रिया करणारा अमुक असें दाख-विणारा जो शब्द, त्यास **कर्ता** असें म्हणतात.

(१) जो क्रिया करितो, त्यास दाखविणारा जो शब्द त्यास कर्ता असें म्हणतात.

(२) धातु सकर्मक असून, अमुक केलें किंवा अमक्यास अमुक कांहीं केलें असें दर्शविणारा जो शब्द, त्यास कर्म असें म्हणतात.

८७. धातु सकर्मक किंवा अकर्मक असतात, ते वाक्यांत त्यांचा अर्थ असेल, त्यावरून असतात. एकच धातु अर्थावरून सकर्मक अथवा अकर्मक असेल; उदाहरण,—'मी काम करितों,' सकर्मक; 'मला मळमळ करते,' अकर्मक; 'हरी दार उघडितो,' सकर्मक; 'वाऱ्यानें दार उघडतें,' अकर्मक; 'तो पाणी भरतो,' सकर्मक; 'त्याला हींव भरतें,' अकर्मक. तेव्हां कोणताही धातु **सकर्मक** आहे अथवा **अकर्मक** आहे हें अर्थावरून जाणावें.

८८. कित्येक धातु असे असतात, कीं त्यांचा सर्व अर्थ त्यांच्यांतच पूर्ण असतो. त्यांना कर्म नसतें. आणि कर्ताही नसतो. जसें,— कळमळणें, मळमळणें, सांजावणें, फावणें, उजाडणें, करमणें, गडगडणें, चकाकणें, इत्यादि. यांना **अकर्तृक धातु** असें ह्मणावें; उदाहरणें,—'गड्याला नदीजवळ सांजावलें;' 'हल्लीं सहा वाजतां उजाडतें;' 'मला या ठिकाणीं करमत नाहीं;' इत्यादि.

८९. 'तो आहे,' 'हरि घडा करितो,' 'तूं धांवतोस,' या वाक्यांतील क्रियापदांच्या रूपांवरून **आतां** असा वेळेचा बोध होतो; 'तो होता,' 'हरीनें घडा केला,' 'तूं धांवलास,' यांतील क्रियापदांवरून **पूर्वीं** असा वेळेचा बोध होतो आणि 'तो असेल,' 'हरी घडा करील,' 'तूं धांवशील,' यांतील क्रियापदांवरून **पुढें** असा वेळेचा

बोध होतो, अशा रितीनें क्रियापदांच्या रूपावरून जो **वेळेचा** बोध होतो, त्यास **काळ** असें म्हणतात.

**( अ ) क्रियापदाच्या रूपावरून एखादी गोष्ट पूर्वी झाली, आतां होत आहे, किंवा पुढें होईल, असा जो वेळेचा बोध होतो, त्यास काळ असें म्हणतात.**

**( आ ) जेव्हां क्रियापदावरून 'पूर्वी' असा बोध होतो, तेव्हां तो भूतकाळ; 'आतां' असा बोध होतो, तो वर्तमान-काळ; आणि 'पुढें' असा बोध होतो, तो भविष्यकाळ.**

**उदाहरणें—भूतकाळः—**'सूर्य मावळला,' 'मुलें घरीं गेलीं,' 'हरीनें मला पुस्तक दिलें.' **वर्तमानकाळः—**'देव सर्वांचें रक्षण करितो,' 'मी रोज घरीं असतों,' 'सूर्य तेजस्वी आहे,' 'पक्षी उडतात.' **भविष्यकाळः—**'उद्यां सुट्टी असेल,' 'तूं मला पुस्तक देशील,' 'आई रागें भरेल.'

९०. क्रियापदांचीं कांहीं रूपें अशीं होत असतात कीं, त्यांच्या-वरून आज्ञा, रीत, कर्तव्य, अजमास, संकेत असा कांहीं **विशेष अर्थ** होतो; अशा रूपांना **अर्थ** असें म्हणतात.

९१. 'मी घरीं जाऊं?,' 'हें काम आम्ही करूं काय?,' यांत बोलणारा **आज्ञा मागतो**; 'हरी, पुस्तक वाच,' 'मुलांनो, जाग्या-वर बसा,' यांत **आज्ञा केली** आहे; 'ईश्वर तुमचें कल्याण करो,' 'लोक हवें तें म्हणोत,' यांत **आशीर्वाद** आहे किंवा यांत **आज्ञा दिली** आहे; या रूपांना **आज्ञार्थ** असें म्हणतात.

९२. 'हा मुलगा त्याचा भाऊ असावा,' 'तूं यंदा परीक्षेंत पास व्हावास,' 'आपण देवाची आज्ञा पाळावी,' 'त्यानें लहानपणीं आईस नित्य त्रास द्यावा,' या वाक्यांत अजमास, कर्तव्य, रीत, इत्यादि गोष्टी सांगितल्या आहेत; यास **विध्यर्थ** असें म्हणतात.

९३. ' बाबा घरीं असते तर मी आलों असतों,' 'गुरूजी असते तर ते हा हिशेब सांगते,' यांत संकेताचा अर्थ आहे; यास **संकेतार्थ** असें म्हणतात.

**९४. जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून क्रियेच्या अर्थाहून निराळ्या अशा विशेष प्रकारच्या अर्थांचा बोध होतो, तेव्हां त्यास अर्थ असें म्हणावें.**

९५. हे अर्थ तीन आहेतः— **(१) आज्ञार्थ, (२) विध्यर्थ** आणि **(३) संकेतार्थ.**

**९६. जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून आज्ञा, उपदेश, प्रार्थना, आशीर्वाद, इत्यादिकांचा अर्थ निघतो, तेव्हां तो आज्ञार्थ.** उदा०:—हरी, तूं जा. मुलांनो, खरें बोला. देवा, आमचें बरें कर. मी जाऊं काय? तो जावो. इत्यादि.

**९७. जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून कर्तव्य, शक्यता, रीत, उपदेश, अजमास, इत्यादिकांचा बोध होतो, तेव्हां तो विध्यर्थ.** उदा०:—मुलांनीं गुरूची आज्ञा मानावी. तुम्हांस एवढा धडा व्हावा. त्यानें नित्य हट्ट करावा. सर्वांनीं खरें असेल तें सांगावें. तो आज परत यावा. इत्यादि.

**९८. जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून असुक केलें तर असुक होईल असा संकेताचा अर्थ निघतो तेव्हां तो संकेतार्थ.** उदा०:—तो जाता तर बरें होतें. तूं पत्र लिहितास तर काय झालें असतें? इत्यादि.

टीपः–( १ ) ह्या अर्थांवरून वेळेचा बोध होत नाहीं. म्हणून वास्तविक यांना काळ नाहीं. परंतु सोयीकरितां या तिहींचा पाहिजे तर वर्तमानकाळ मानावा, अथवा हे वर्तमानकाळाचे भेद आहेत असें म्हणावें.

टीपः—( २ ) जेव्हां एकाद्या वाक्यामध्यें हे तिन्ही अर्थ नसतात तेव्हां तसा भेद समजावा म्हणून त्या वाक्याचा स्वार्थ आहे असें म्हणतात. अशा रितीनें स्वार्थ हा एक चवथा अर्थ मानिला आहे.

९९. वर्तमानकाळ दोन प्रकारचा होतो:—एक आपण नेहमीं बोलण्यामध्यें उपयोग करितों तसा; जसें,—मी जातों, हरी बसतो, तुम्ही करितां, इत्यादि. परंतु कवितेंत निराळ्या तऱ्हेचीं रूपें येतात; जसें,—'तो बोलतो,' याबद्दल 'तो बोले;' 'हरी बसतो' याबद्दल 'हरी बसे;' 'लोक बोलतात,' याबद्दल 'लोक बोलती;' इत्यादि. अशाच प्रकारचीं रूपें जुन्या भाषेंतही येतात; जसें,—'लेंकी बोले सुने लागे,' 'मनीं वसे तें स्वप्नीं दिसे,' 'दाम करी काम,' इत्यादि. तेव्हां पहिला ह्मणजे आपल्या नेहमींच्या बोलण्यांतला जो वर्तमानकाळ त्यास **चालू वर्तमानकाळ** आणि कवितेंत व जुन्या भाषेंत येणारा जो वर्तमानकाळ त्यास **जुना वर्तमानकाळ** असें आपण ह्मणूं.

१००. याचप्रमाणें भूतकाळही दोन प्रकारचा होतो:—'तो खुर्चीवर बसला,' यांत **बसला** हा साधा भूतकाळ आहे; पण 'तो खुर्चीवर बसे,' यांत त्याची बसण्याची रीत होती असा अर्थ झाला; 'गुरूजी मला आपलें पुस्तक देत;' यांत **देत** हें रूप असेंच आहे. तेव्हां पहिल्या प्रकारच्या भूतकाळास **चालू भूतकाळ** किंवा **नुसता भूतकाळ** आणि दुसऱ्यास **रीतिभूतकाळ** असें आपण म्हणूं.

(अ) भविष्यकाळ एकच प्रकारचा आहे.

१०१. तेव्हां काळांचीं रूपें पांच प्रकारचीं होतात:—(१) जुना वर्तमानकाळ, (२) चालू वर्तमानकाळ, (३) भूतकाळ, (४) रीतिभूतकाळ, आणि (५) भविष्यकाळ; आणि अर्थांचीं रूपें तीन प्रकारचीं आहेत:—(१) आज्ञार्थ, (२) विध्यर्थ आणि (३) संकेतार्थ.

१०२. अशा रितीनें क्रियापदांचीं एकंदर आठ प्रकारचीं रूपें होतात. यांस '**काळ व अर्थ**' असें म्हणतात. क्रियापदास संस्कृतांत 'आख्यात' असें म्हणतात. म्हणून या आठ प्रकारच्या

रूपांस 'आख्यातरूपें' आणि त्या रूपांच्या प्रत्ययांस 'आख्यात-प्रत्यय' असें म्हणावें.

१०३. कोणत्याही वाक्यांत आपण उद्देश्याविषयीं बोलतों. (क्र. १० पाहा.) म्हणून जें बोललेलें तें, म्हणजे क्रियापद उद्देश्यास अनुसरून असलें पाहिजे; म्हणजे उद्देश्याचें एकवचन असलें तर क्रियापदाचें एकवचन आणि उद्देश्याचें अनेकवचन असलें तर क्रियापदाचेंही अनेकवचन होईल; जसें,—मुलगा चालतो, एकवचन; मुलगे चालतात, अनेकवचन.

१०४. तसेंच बोलणारा तो प्रथमपुरुष, ज्याच्याशीं बोलावयाचें तो द्वितीयपुरुष, आणि ज्याविषयीं बोलावयाचें तो तृतीयपुरुष; याप्रमाणें उद्देश्याचे जसे तीन पुरुष असतात, तसेच त्याच्याशीं संबंध असलेल्या क्रियापदाचेही असतात; जसें,—[ मी ] बसतों, प्र० पु०; [ तूं ] बसतोस, द्वि० पु०; आणि [ हरी ] बसतो, तृ० पु०; तेव्हां क्रियापदाच्या प्रत्येक काळाचीं व अर्थाचीं रूपें तिन्हीं पुरुषीं आणि दोन्हीं वचनीं अशीं सहा सहा होतील.

१०५. उद्देश्यास लिंगभेद असतो; हा लिंगभेद कांहीं आख्यात-रूपांस होतो. पांच काळ व तीन अर्थ या आठ प्रकारच्या रूपां-पैकीं चालू वर्तमानकाळ, व भूतकाळ आणि विध्यर्थ व संकेतार्थ या चोहोंमध्यें क्रियापदास लिंगभेद होतो; आणि बाकीचे चार, म्हणजे जुना वर्तमानकाळ, रीतिभूतकाळ, भविष्यकाळ आणि आज्ञार्थ यांमध्यें लिंगभेद होत नाहीं.

टीपः—चार काळ-व-अर्थ यांच्या रूपांत लिंगभेद होतो आणि बाकीच्या चोहों-मध्यें तो होत नाहीं, याचें कारण काय हें येथें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. संस्कृत भाषेंत आख्यातरूपांना लिंगभेद नाहीं. मराठी भाषेंतल्या आख्यातरूपांपैकीं चार प्रकारचीं रूपें संस्कृतांतील आख्यातरूपांवरून झालीं आहेत. म्हणून त्यांना लिंगभेद होत नाहीं. परंतु बाकीचीं चार प्रकारचीं आख्यातरूपें संस्कृतांतील धातुसाधित विशेषणांवरून झालीं आहेत. संस्कृत भाषेंत विशेषणांस लिंगाचा विकार होतो. यामुळें या चार प्रकारच्या आख्यातरूपांस मराठींत लिंगभेद होतो.

१०६. याप्रमाणें क्रियापदांस काळ व अर्थ यांच्यासंबंधानें आणि वचन व पुरुष यांच्यासंबंधानें विकार होतात. तसेंच चार प्रकारच्या आख्यातरूपांमध्यें लिंगाचाही विकार होतो. हे विकार उद्देश्यास अनुसरून होतात.

---

## अभ्यास
## १२.

१. क्रियापद, धातु, कर्ता, उद्देश्य, सकर्मक, अकर्मक, अकर्तृक, काळ, अर्थ, हीं काय आहेत हें शिक्षकांनीं मुलांस विचारून, वाचनाच्या पुस्तकांतील वाक्यांवरून उदाहरणें सांगावयास लावावें.

२. पुढें क्रियापदांचीं रूपें दिलीं आहेत, त्यांचीं लिंगें, वचनें आणि पुरुष सांगा; आणि नीट जुळतील अशीं नामें किंवा सर्वनामें घेऊन कर्ता, कर्म आणि उद्देश्य घालून वाक्यें करा:—येतो. शिकतो. आला. जाईल. बसतो. करिती. बोले. उठा. ऊठ. जावो. लिहिशी. मागतात. गातील. निजवील. पढविलें. गाइलें. गाती. जाल. ह्मणालों. ह्मणाल ह्मणो. वाचावें. बस. बैस. ह्मणोत. ह्मणूं. पाहूंन. लिहिलें. कळविलें. उठलें. जेवलांत. जेवे. असे. होई. बसत. ह्मलत. हालतील. हालाल. भाजेल. भाज. भजावें. विचारावेंस. पकडला. बसलास. होतास. होई. भरतें. भरील. फिरतात. फुटतील. फोडशील. फोडतील. उडे. पळे. ह्मणो. मागशील. पाठवाल. द्यावें. घ्यावा. भेटवीन. भेटाव्यात. गाव्या. असावें. करावी. लिहाव्या. हंसतो.

---

## १४—धातु किंवा क्रियापदें चालविणें.

१०७. धातु चालविणें ह्मणजे त्याला प्रत्यय लावून निरनिराळे काळ व अर्थ यांचीं आणि लिंग, पुरुष व वचनें यांचीं रूपें करणें. जो धातु असेल तो घेऊन त्यास प्रत्यय लावून रूपें करावयाचीं असतात.

१०८. धातु दोन तऱ्हेचे असतात; एकाक्षरी आणि अनेकाक्षरी. सर्व अनेकाक्षरी धातु अकारान्त असतात. त्यांच्या उपान्त्यामध्यें दीर्घ ' ई ' किंवा दीर्घ ' ऊ ' स्वर असल्यास प्रत्यय लावतांना तो ऱ्हस्व होतो; उदा०:—नीघ, निघतो; ऊठ, उठला; इत्यादि.

१०९. एकाक्षरी धातूच्या अंतीं ई, ऊ, ए किंवा ओ, स्वर असतो. यांतला ई, किंवा ऊ प्रत्यय लावतांना स्वर ऱ्हस्व होतो. उदा०:—भी, भितो; धू, धुतोस; इत्यादि.

टीप:—एकाक्षरी धातूंना आणखी कांहीं विकार होतात, ते येथें सांगितले नाहींत. तशा धातूंचीं रूपें आल्यास ते विकार शिक्षकांनीं समजून द्यावे.

११०. धातूंवरून निरनिराळे काळ व अर्थ यांचीं रूपें अशीं होतातः—

## ( १ ) जुना वर्तमानकाळ.

'कर' धातु, सकर्मक.

| एकवचन | | अनेकवचन | |
|---|---|---|---|
| मी | करीं. | आम्ही | करूं, करों. |
| तूं | करशीं,–सी.<br>करिशीं,–सी. | तुम्ही | करा. |
| तो<br>ती<br>तें | करी. | ते<br>त्या<br>तीं | करती,<br>करिती. |

'बस' धातु, अकर्मक.

| एकवचन | | अनेकवचन | |
|---|---|---|---|
| मी | बसें. | आम्ही | बसूं, बसों. |
| तूं | बसशी,–सी. | तुम्ही | बसा. |
| तो<br>ती<br>तें | बसे. | ते<br>त्या<br>तीं | बसती. |

( या रूपांना लिंगभेद नाहीं. )

टीप:–हीं जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें पाहिलीं असतां लक्षांत येईल, कीं हीं जुन्या म्हणींमध्येंही आढळतात. उदा०:—'लेंकी बोले सुने लागे' 'दाम करी काम,' 'आद्या-पेक्षां खर्च मोठा त्याचा होई सदा तोटा.' इत्यादि. त्याचप्रमाणें 'न' आणि 'ना' हीं नकाराच्या अर्थाचीं अव्ययें वाक्यांत आलीं असतां त्यांच्याबरोबर हींच रूपें घालितात; जसें,—'तो कांहींच बोले ना.' 'तो न येई त्याला मी काय करणार?' इत्यादि. हीं रूपें सकर्मक आणि अकर्मक या धातूंवरून थोडीं निरनिराळीं होतात, हें मुलांच्या ध्यानांत आणून द्यावें.

## (२) चालू वर्तमानकाळ.

### ‘ कर ’ धातु, सकर्मक.

#### पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करतों, करितों. | आम्ही | करतों, करितों. |
| तूं | करतोस, करितोस. | तुम्ही | करतां, करितां. |
| तो | करतो, करितो. | ते | करतात, करितात. |

#### स्त्रीलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करतें, करत्यें,<br>करितें, करित्यें. | आम्ही | करतों, करितों. |
| तूं | करतीस, करितीस,<br>करतेस, करितेस,<br>करत्येस, करित्येस. | तुम्ही | करतां, करितां. |
| ती | करती, करिती, करते,<br>करिते, करत्ये, करित्ये. | त्या | करतात, करितात. |

#### नपुंसकलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करतें करितें. | आम्ही | करतों, करितों. |
| तूं | करतेंस, करितेंस. | तुम्ही | करतां, करितां, |
| तें | करतें, करितें. | तीं | करतात, करितात. |

### ‘ बस ’ धातु, अकर्मक.

#### पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसतों. | आम्ही | बसतों. |
| तूं | बसतोस. | तुम्ही | बसतां. |
| तो | बसतो. | ते | बसतात. |

टीपः—१ हीं जीं दोन प्रकारचीं रूपें चालवून दाखविलीं, त्यांवरून दिसून येईल, कीं रूपें होतात तीं मूळ धातुस प्रत्यय लागून होतात; उदा०:—‘ कर + ’ ‘ ई ’ प्रत्यय करीं, हें छान्या वर्तमानकाळाचें प्रथमपुरुषीं एकवचनीं रूप झालें. त्याचप्रमाणें कर + शी = करिशी असें द्वितीय पुरुषाच्या एकवचनाचें रूप करावयाचें. येथें प्रत्ययाच्या पूर्वीं ‘इ’ असें अक्षर लागून ‘ करिशी ’ असें होतें. हें जें अक्षर मध्यें येतें त्यास आगम असें म्हणतात. हा

आगम करिशी, करित्ये, करितात, या रूपांमध्येंही झाला आहे, आणि या रूपांमध्यें, तो, त्यें, तात, तीस, इत्यादि हे प्रत्यय आहेत.

( २ ) ' इ ' आगम होतो तो व्यंजनादि प्रत्ययांच्या अगोदर मात्र लागतो, हा अकर्मक धातूंना, ' उमज ' गणाच्या धातूंना, [ हे ' उमज ' गणाचे धातु प्रयोगप्रकरणांत सांगितले आहेत ] एकाक्षरी धातूंना आणि ऐक, जाण, पुस, बच, माग, वाह, पाह, सांग, म्हण, हस, चाव, शीव, अशा कांहीं थोड्या धातूंमध्यें लागत नाहीं; जसें,—बसशी, बसतो, उमजतो, शिकतो, गातो, पाहतो, सांगतो, म्हणतो, बचतो, चावतो, शिवतो, मागतो, हसतो, इ०. हा आगम सकर्मक धातूंमध्यें विकल्पेंकरून लागतो; जसें,—करशी, करिशी; करतात, करितात; इ०. हा आगम सर्व व्यंजनादि आख्यातप्रत्ययांपूर्वीं होतो. या रूपांवरून दोन्ही काळांचे प्रत्यय दिसून येतात, ते असेः—

( १ ) जुना वर्तमानकाळः—

| | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र. पु. | ईं ( सकर्मक ).<br>एँ ( अकर्मक ). | ऊं, ओं. |
| द्वि. पु. | सी, शी. | आ. |
| तृ. पु. | ई ( सकर्मक<br>ए ( अकर्मक | तो. |

( २ ) चालू वर्तमानकाळः—

| | पुल्लिंग. | स्त्रीलिंग. | नपुंसकलिंग. |
|---|---|---|---|
| प्र. पु. | तों, तां. | त्यें, तें, तों. | तें, तां. |
| द्वि. पु. | तोस, तां. | तीस, त्येस, तां. | तेंस, तां. |
| तृ. पु. | तो, तात. | त्ये, तें, तात. | तें, तात. |

## ( ३ ) रीतिभूतकाळ.

ह्या काळाचीं रूपें जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांत थोडा फेरफार केल्यानें होतात. तो फेरफार असा, कीं द्वितीयपुरुषीं एकवचनीं आणि तृतीयपुरुषीं अनेकवचनीं प्रत्यय अनुक्रमें सी आणि ती आहेत, ते स आणि त असे होतात, आणि त्यांच्यापूर्वीं ' इ ' आगम होऊन तो दीर्घ असतो. या काळाच्या रूपांना लिंगभेद नाहीं. उदाहरणः—

| 'कर' धातु, सकर्मक. | | | | 'बस' धातु, अकर्मक. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मी | करीं. | आम्ही | करूं.* | मी | बसें. | आम्ही | बसूं. |
| तूं | करीस. | तुम्ही | करा. | तूं | बसस. | तुम्ही | बसा. |
| तो, ती, तें | करी. | ते, त्या, तीं | करीत. | तो, ती, तें | बसे. | ते, त्या, तीं | बसत. |

## (४) साधा भूतकाळ—'जेव' धातु, सकर्मक.

### पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | जेवलों.‡ | आम्ही | जेवलों. |
| तूं | जेवलास. | तुम्ही | जेवलां,–लांत,–लेत. |
| तो | जेवला. | ते | जेवले. |

### स्त्रीलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | जेवल्यें, जेवलें. | आम्ही | जेवलों. |
| तूं | जेवलीस. | तुम्ही | जेवलां, जेवलांत, जेवल्यात. |
| ती | जेवली. | त्या | जेवल्या. |

### नपुंसकलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | जेवलें. | आम्ही | जेवलों. |
| तूं | जेवलेंस. | तुम्ही | जेवलां, जेवलांत, जेवलांत. |
| तें | जेवलें. | तीं | जेवलीं. |

### 'बस' धातु, अकर्मक.

### पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसलों. | आम्ही | बसलों. |
| तूं | बसलास. | तुम्ही | बसलां, बसलांत, बसलेत. |
| तो | बसला. | ते | बसले. |

---

* येथें दुसरें रूप होत नाहीं.

‡ हा सकर्मक धातु असूनही 'इ' आगम झाला नाहीं; कारण हा उमजगणांतला आहे. दुसऱ्या सकर्मक धातूंस आगम विकल्पेंकरून होतो; उदा०:–धाडलें, धाडिलें पाठवलें, पाठविलें; कळवलें, कळविलें; इत्यादि.

## स्त्रीलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसल्यें, बसलें. | आम्ही | बसलों. |
| तूं | बसलीस. | तुह्मी | बसलां, बसलांत, बसल्यात. |
| ती | बसली. | त्या | बसल्या. |

## नपुंसकलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसलें. | आम्ही | बसलों. |
| तूं | बसलेंस. | तुम्ही | बसलां, बसलांत, बसलींत. |
| तें | बसलें. | तीं | बसलीं. |

टीपः—चालू भूतकाळीं तृतीयपुरुषीं प्रत्यय नाहींत. लिंगभेदाप्रमाणें 'तो जेवला,' 'ती जेवली,' 'तें जेवलें,' 'त्या जेवल्या,' 'तीं जेवलीं,' इत्यादि असे फेरफार होतात. प्रथम आणि द्वितीयपुरुषीं असे प्रत्यय होतातः—

| | पुंल्लिंग. | | स्त्रीलिंग. | | नपुंसकलिंग. | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. पु. | लों. | लों. | लें, ल्यें. | लों. | लें. | लों. |
| द्वि. पु. | लास. | लां, लात, लेत. | लीस. | लां, लांत, ल्यांत. | लेंस. | लां, लांत, लींत. |

टीपः—या भूतकाळाचीं कित्येक धातूंचीं रूपें अनियमित होतात. त्यांतलीं कांहीं पुढें सांगतोंः—

(१) कांहीं धातूंच्या अन्त्य 'अ' चा 'आ' होतो; जसें,—नीघ, निघाला; म्हण, म्हणाला; पळ, पळाला; इत्यादि.

(२) कांहीं धातूंमध्यें हा फेरफार विकल्पेंकरून होतो; उदा०:— ऊड, उडला, उडाला; याप्रमाणें दड, नीव, बूड, मीळ, वीझ, ऊब, गळ, जळ, झीज, बूज, लप, इ०.

(३) भी, पी, यांचीं रूपें भ्याला, प्याला, अशीं होतात.

(४) 'दे' याचें रूप 'दिला' असें होतें; कर, मर, यांचीं केला, मेला, इत्यादि अशीं होतात. सांग, माग, बघ, घे, धू, यांच्यापुढें प्रत्ययापूर्वीं 'त' येतो; जसें,—सांगितला, मागितलें, बघितलें, घेतला, धुतलें, इ०.

(५) धातूच्या शेवटीं 'ण' असल्यास त्याचा विकल्पें 'ट' होतो; उदा०:—खणलें, खटलें; हाणलें, हाटलें; म्हटलें, म्हणाला; इ०.

(६) जा, गेला; ये, आला; खा, खाल्लें; हो, झाला, जाहला; अशीं रूपें होतात.

## ( ५ ) भविष्यकाळ.

या काळाचीं रूपें जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांवरून करावीं; तीं अशीं कीं, जुन्या वर्तमानकाळाच्या प्रथमपुरुषीं एकवचनीं अंतींचा अनुस्वार काढून ‘न’ लावावा; अनेकवचनीं जुन्या वर्तमानकाळासारखेंच रूप करावें. इतर रूपांपुढें ‘ल’ हें अक्षर लावावें; उदा०:—

| ‘कर’ धातु, सकर्मक. | | | | ‘बस’ धातु, अकर्मक. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मी | करीन. | आम्ही | करूं. | मी | बसेन. | आम्ही | बसूं. |
| तूं | करशील, करिशील. | तुम्ही | कराल. | तूं | बसशील. | तुम्ही | बसाल. |
| तो, ती, तें | करील. | ते, त्या, तीं | करतील, करितील. | तो, ती, तें | बसेल. | ते, त्या, तीं | बसतील. |

टीपः—या रूपांना लिंगभेद नाहीं. प्रथमपुरुषीं देखील वास्तविक जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांना ‘ल’ अक्षर लावून हीं रूपें होतात. त्याच्या मागें जो अनुस्वार असतो, तो आणि ‘ल’ मिळून ‘न’ होतो; उदा०:—करीं+ल=करीन; अनेकवचनींही करूं+ल=करून; असें रूप जुन्या मराठींत आढळतें; जसें,—‘आम्ही तुम्हांस रुपये पाठवून’ असा उपयोग जुन्या लेखांत येतो. परंतु अलीकडे ‘ल’ चा लोप होऊन फक्त ‘पाठवूं’ असें रूप होतें.

## ( ६ ) आज्ञार्थ.

### ‘कर’ धातु, सकर्मक.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करूं. | आम्ही | करूं. |
| तूं | कर. | तुम्ही | करा. |
| तो, ती, तें | करू, करो. | ते, त्या, तीं | करूत, करोत. |

[ या रूपांला लिंगभेद नाहीं. ].

टीपः—आज्ञार्थाचे प्रत्यय असे आहेतः—

| | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० पु० | ऊं | ऊं. |
| द्वि० पु० | — | आ. |
| तृ० पु० | ऊ, ओ. | ऊत, ओत. |

टीपः–आज्ञार्थी द्वितीयपुरुषीं एकवचनीं रूप होतांना धातूंना प्रत्यय लागत नाहीं, व धातु जशाच्या तसाच असतो. म्हणून आज्ञार्थाच्या द्वितीयपुरुषाच्या एकवचनीं जें रूप असतें, त्यास मूळचा धातु असें समजण्याची चाल आहे; जसें,—कर, बस, ये, जा, धं, डेव, ऊठ, इत्यादि धातु. या नियमास हकारान्त धातु अपवादक आहेत. उदा०:–'राह' या धातूचें आज्ञार्थी द्वितीयपुरुषीं एकवचनीं रूप 'राहा' असें होतें; 'पाह' धातूचें 'पाहा,' 'लिह' धातूचें 'लिही,' इत्यादि.

## (७) विध्यर्थ.

### 'बस' धातु, अकर्मक.

#### पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसावा. | आम्ही | बसावे. |
| तूं | बसावास. | तुम्ही | बसावे. |
| तो | बसावा. | ते | बसावे, बसावेत. |

#### स्त्रीलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसावी. | आम्ही | बसाव्या. |
| तूं | बसावींस. | तुम्ही | बसाव्या. |
| ती | बसावी. | त्या | बसाव्या, बसाव्यात. |

#### नपुंसकलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | बसावें. | आम्ही | बसावीं. |
| तूं | बसावेंस. | तुम्ही | बसावीं. |
| तें | बसावें. | तीं | बसावीं, बसावींत. |

टीपः–विध्यर्थी लहान मुलांच्या लक्षांत येण्यासारखे प्रत्यय देतां येणार नाहींत. प्रथमतः विध्यर्थाचा 'व' प्रत्यय लागतो, आणि सर्वत्र लिंगाप्रमाणें फेरफार होतात. द्वितीयपुरुषीं एकवचनीं 'स' आणि अनेकवचनीं 'त' प्रत्यय होतो. हे प्रत्यय मुलांस रूपांवरून समजून द्यावे.

**(८) संकेतार्थ**—'मी जर तेथें असतों तर रामास जाऊं दिलें नसतें,' 'तो घरीं असता तर मला भेटता,' 'त्या मुली अभ्यास करित्या तर परीक्षेंत पास झाल्या असत्या,' 'जर मला पैसे देतास तर मीं तो जिन्नस आणिला असता' या वाक्यांतल्या क्रिया-पदांच्या रूपावरून 'अमुक असतें, तर अमु.. झालें असतें,'

' अमुक केलें तर अमुक होईल, ' असा संकेताचा अर्थ निघतो. या रूपांना **संकेतार्थ** असें म्हणतात; या अर्थाचीं रूपें चालू वर्तमान-काळाच्या रूपांत थोडा फेरफार होऊन अशीं होतात:—

' कर ' धातु, सकर्मक.

पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करतों, करितों. | आम्ही | करतों, करितों. |
| तूं | करतास, करितास. | तुम्ही | करतां, करितां. |
| तो | करता, करिता. | ते | करते, करिते. |

स्त्रीलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करत्यें, करित्यें, करतें, करितें. | आम्ही | करतों, करितों. |
| तूं | करतीस, करितीस. | तुम्ही | करतां, करितां. |
| ती | करती, करिती. | त्या | करत्या, करित्या. |

नपुंसकलिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | करतें, करितें. | आम्ही | करतों, करितों. |
| तूं | करतेंस, करितेंस. | तुम्ही | करतां, करितां. |
| तें | करतें, करितें. | तीं | करतीं, करितीं. |

या रूपांवरून दिसून येईल, कीं चालू वर्तमानकाळीं द्वितीयपुरुषीं एकवचनीं पुल्लिंगीं, 'तोस' या प्रत्ययाबद्दल 'तास' होतें; स्त्रीलिंगीं प्रत्यय एकच 'तीस' असा होतो; आणि तृतीयपुरुषीं अनेकवचनीं ' तात ' याबद्दल तिन्ही लिंगीं अनुक्रमें ' ते, ' ' त्या ' आणि ' तीं ' असे प्रत्यय होतात.

## कर्मणि आणि भावी रूपें.

१११. वाक्याच्या योगानें आपण बोलतों, त्या आपल्या बोलण्यांत तीन प्रकार असतात; एक, ' रामा पुस्तक वाचितो ' यांत आपण ' वाचितो ' असें ' रामा ' या कर्त्याबद्दल सांगितलें; दुसरें, ' रामानें पुस्तक वाचिलें ' यांत ' वाचिलें ' असें ' पुस्तक ' या कर्मा-विषयीं सांगितलें; तिसरें ' रामानें रावणास मारिलें ' यांत ' मारिलें '

हें ' रामा ' याबद्दल सांगितलें नाहीं आणि ' रावणास ' याबद्दलही सांगितलें नाहीं. तर ' रामानें रावणास मारिलें ( असें झालें ) ' असें क्रियेबद्दल आपण बोललों. पहिल्या वाक्यांत कर्ता उद्देश्य, दुसऱ्यांत कर्म उद्देश्य, आणि तिसऱ्यांत क्रियेचा भाव, म्हणजे येथें कर्म ' मारणें ' हें उद्देश्य, असा प्रकार आहे.

( अ ) या ज्या बोलण्यांतील तीन तऱ्हा, यांना **प्रयोग** असें म्हणतात; आणि या तीन प्रकारच्या वाक्यांस **कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग** आणि **भावेप्रयोग** अशीं नांवें देतात.

( आ ) असे हे वाक्यांचे **प्रयोग** असतात. क्रियापदाचें रूप ज्यावरून फिरत असेल त्यावरून त्या त्या वाक्यांतल्या क्रियापदास **कर्तरि क्रियापद, कर्मणि क्रियापद** आणि **भावी क्रियापद** असें म्हणतात; उदाहरणार्थ, वरील तीन वाक्यांत ' वाचितो ' हें क्रियापद कर्तरि, ' वाचिलें ' हें कर्मणि आणि ' रामानें रावणास मारिलें, ' यांत ' मारिलें ' हें भावी.

टीपः—मागें जीं क्रियापदरूपें चालवून दाखविलीं आहेत, तीं फक्त कर्तरि होत; कर्मणि व भावी रूपें यांची माहिती या प्रकरणांत दिली आहे.

( इ ) कर्मणि आणि भावी या दोन प्रकारच्या रूपांमध्यें दिसण्यांत फरक नसतो. अमुक क्रियापद कर्मणि किंवा अमुक भावी हें वाक्याच्या अर्थावरून जाणावें. मात्र भावेप्रयोग असतां क्रियापद निरंतर तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं असतें.

( ई ) संस्कृत भाषेंत प्रत्येक काळीं सकर्मक क्रियापदाचीं कर्तरि आणि कर्मणि अशीं दोन्ही प्रकारचीं रूपें होतात. परंतु हल्लींच्या मराठी भाषेंत तसा प्रकार नाहीं. जुन्या मराठींत हीं अशीं दोन्ही प्रकारचीं रूपें मागें होतीं. कर्मणि रूपें धातूस प्रत्ययाच्या पूर्वी 'ज' हें अक्षर लावून करीत असत; अशा प्रकारचीं रूपें जुन्या भाषेंत आणि कवितेंत आढळतात; जसें,—करिजे, लिहिजे, दीजे, कीजे, लिहिजेल, होईजेल, इत्यादि. परंतु पुढें या रूपांचा—म्हणजे कर्मणिप्रयोगाचाच—मराठींत लोप झाला.

टीपः—यासंबंधाची जास्त माहिती जरूर वाटल्यास शिक्षकांनीं सांगावी. ही गोष्ट कठिण असल्यामुळें येथें जास्त कांहीं सांगितलें नाहीं.

११२. तेव्हां वास्तविक मराठींत कर्मणि आणि भावी रूपें नाहींत; परंतु ल-प्रत्यय लागून होणारीं भूतकाळाचीं रूपें केलें, दिलें, घेतलें, लिहिलें इत्यादि आणि विध्यर्थाचीं रूपें द्यावें, करावें, इत्यादि हीं संस्कृतांतून कर्मणिविशेषणावरून झालीं आहेत; म्हणून तीं रूपें मूळचा धातु सकर्मक असतां निरंतर कर्मणि किंवा भावी असतात; आणि बाकीचीं आख्यातरूपें निरंतर कर्तरि असतात.* अशी तऱ्हा हल्लीं मराठींत झाली आहे.

११३. कांहीं सकर्मक धातु आहेत, त्यांचीं भूतकाळीं कर्तरि रूपें होतात, आणि त्यांवरून अकर्मक धातूंप्रमाणेंच कर्मणि रूपें होत नाहींत. मागें भूतकाळीं चालविलेला ‘जेव’ हा धातु असाच आहे. हे ‘उमज’ वगैरे धातु आहेत. त्यांविषयीं जास्त माहिती पुढें प्रयोगप्रकरणीं सांगितली आहे.

११४. भाषेची आणखी अशी रीत आहे, कीं कर्मणिप्रयोग असतां कर्मपद प्रथमपुरुषीं किंवा द्वितीयपुरुषीं असत नाहीं; तसें असल्यास भावेप्रयोग करावा लागतो; उदाहरणार्थ, ‘त्यानें मी बोलाविलों,’ ‘त्यानें तूं बोलाविलास,’ असें ह्मणतां येणार नाहीं, तर ‘त्यानें मला किंवा तुला बोलाविलें,’ असें ह्मणावें लागेल. ह्मणून भूतकाळीं आणि विध्यर्थीं सकर्मक धातूंचीं रूपें सांगावयाचीं, तीं फक्त तृतीयपुरुषीं सांगावीं; प्रथम आणि द्वितीयपुरुषीं सांगूं नयेत. याच कारणामुळें मागें ‘जेव’ हा अकर्मक धातुप्रमाणें चालणारा धातु घेऊन तो सर्व पुरुषीं चालवून दाखविला आहे.

टीपः—वर सांगितल्याप्रमाणें भाषेची रीत आहे, तरी प्रथम आणि द्वितीयपुरुषीं कर्मणि रूपें कवितेंत येतात; जसें,—‘मी मांहें कवळिलों;’ ‘केलासी तूं उभा आजवरी संतीं;’ इत्यादि. पण हा प्रकार मुलांना सांगण्याची गरज नाहीं; कविता वाचतांना तशीं रूपें असल्यास या गोष्टीची माहिती करून द्यावी.

---

* कर्मणि रूपें सकर्मक धातूंपासून व्हावयाचीं, हें लक्षांत ठेवावें.

११५. याप्रमाणें 'मुलानें घडा केला,' 'घडे केले;' 'मुलानें पाटी आणिली,' 'पाट्या आणल्या;' 'मुलानें पुस्तक वाचिलें,' 'पुस्तकें वाचलीं;' अशीं कर्मणिरूपें भूतकाळीं होतील; आणि 'घडा करावा,' 'घडे करावे;' 'पाटी आणावी,' 'पाट्या आणाव्या;' 'पुस्तक वाचावें,' 'पुस्तकें वाचावीं;' अशीं रूपें विध्यर्थीं होतात.

टीपः—हीं रूपें सकर्मक धातूंचीं आहेत. अकर्मक धातूंचीं कर्तरि रूपें होतील; उदा०:—रामा घरीं होता; रामा घरीं असावा किंवा पोंचावा; इत्यादि.

११६. क्रियापद भावी असतां त्याचें उद्देश्य क्रियार्थ असतें, म्हणून तें फक्त तृतीयपुरुषीं, एकवचनीं, नपुंसकलिंगीं असतें. यासाठीं क्रियापदाचें भावी रूप एकच असावयाचें; उदाहरणार्थ, पुढील वाक्यांत पाहा:—'रामानें राक्षसांस मारिलें,' 'रामानें रावणास अथवा ताटिकेस मारिलें,' 'मीं चाकरास अथवा चाकरांस गांवाला धाडलें,' इत्यादि.

---

## अभ्यास

### १३.

१ धातु चालवितांना एकाक्षरी आणि अनेकाक्षरी धातूंमध्यें असणाऱ्या स्वरास काय विकार होतो, हें उदाहरणें घेऊन सांगा.

२ जुन्या वर्तमानकाळाच्या रूपांचा उपयोग केव्हां करितात? त्याचीं सकर्मक आणि अकर्मक धातूंवरून होणारीं रूपें यांत फरक काय आहे?

३ रीतिभूतकाळ आणि भविष्यकाळ हे जुन्या वर्तमानकाळावरून कसे झाले आहेत, हें सांगा.

४ आगम म्हणजे काय? आख्यातरूपांस कोणता आगम होत असतो? तो केव्हां होतो आणि केव्हां होत नाहीं? हा 'इ' आगम दीर्घ केव्हां होतो?

५ क्रियापदाच्या कोणच्या रूपांस मूळधातु असें म्हणतात? याला अपवाद कोणते आहेत?

६ कर्तरि, कर्मणि आणि भावी रूपें म्हणजे काय? हीं रूपें मागें कशीं करीत आणि सध्यां कसा प्रकार आहे? भूतकाळ आणि विध्यर्थ यांचींच सकर्मक धातूंचीं रूपें फक्त कर्मणि आणि भावी कां असतात?

७ कर्मणि रूपें फक्त तृतीयपुरुषीं आणि भावी रूपें फक्त तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं कां असतात ?

८ पुढील धातु निरनिराळ्या काळीं व अर्थीं चालवून दाखवाः—कर. बस. दे. सोड. अस. हो. फीर. सांग. नाच. धर. ने. आण. जा. मर. गा. पळ. घाल. म्हण. माग. पी. भी. ऊड. राह. ठेव. टाक. पाह. लीह. लाग. शक. खेळ. हंस. धांव. समज. उमज. पाठीव. बूड. मिळव. नीघ. बघ. खण. जळ. लप. लाव. धू. पीळ. शोध. आचर. पसर. जग. मूक. बूज. भीज. वी. गळ. शीक.

९ पुढें क्रियापदांचीं रूपें दिलीं आहेत, त्या प्रत्येकांतला मूळ धातु, त्याचा काळ, पुरुष, वचन, आणि लिंग असल्यास सांगाः—सांगतों. सांगती. सांगितलें. बोलेल. बोलतील. झाल्या. होईल. होशील. फिरते. मेले. मागितलें. मागतील. मागशील. शिकतोस. शिकतीस. शिकली. शिकल्या. खेळतो. खेळता. खेळाल. पाठवितात. जात्येस. जातात. गेलास. गेली. गेला. हंसेल. हंसतील. आचरिलों. शिकलों. उमजला. धुतात. उडालीं. उडाल्या. गेल्यात. शकतील. बुडाल. असेल. असतें. होतों. होतें. न लगत. बोलती. निघशी. मिळे. उठें. पाहीं. पाहे. पाहा. जा. जळू. जळो. खेळोत. खेळती. खेळत. पिऊत. समजत. समजस. रिघतीत. धुतल्या. पाडलीं. पाडल्या. विचारलें. विचारतात. विचारतोस. विचारिशी. विचार. बघितलें. लिहितां. पाहिजे. म्हटलें. म्हणालीस. व्यालें. विईल. गळतील. रिघेल. इ०.

१० पुढील वाक्यांतलीं कर्तरि, कर्मणि आणि भावी क्रियापदें ओळखाः— विद्यार्थी पुस्तक वाचितो. त्यानें पुस्ती अगोदरच लिहिली. आम्ही आज शिपायाला गांवाला धाडूं. शिपाई धाडला ह्मणजे शोध लागेल. आम्हीं स्नान केलें, आणि मग थोडा भात जेवलों. तूं थोडें अन्न खा, ह्मणजे तुला बरें वाटेल. मनुष्यांनीं नित्य खरें बोलावें. गवळी म्हशी पाळितो आणि दूध विकतो. पाऊस पडेल आणि शेतकरी धान्य पेरतील. यंदा पीक चांगलें येईल. तो जे शब्द बोलला ते मीं ऐकिले. कुत्र्यानें कोंबडीचें पिलूं मारिलें. ह्या मांजराच्या पोराला कोणीं मारिलें ? त्याला कोणीं खडा मारिला ? हें मूल आईसाठीं रडत आहे. त्याला भूक लागली. त्याला दूध पाजा. त्याची आई त्याला दूध पाजील.

# १५–धातूंचीं अनियमित रूपें.*

११७. सर्व धातु मागें सांगितल्याप्रमाणें चालवावे. परंतु कित्येक धातु अनियमितपणें चालतात, ते पुढें चालवून दाखवितों:—

## ( १ ) ' हो ' धातु, अकर्मक.

### जुना वर्तमान.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होई. | आम्ही | होऊं,–वों,–ओं. |
| तूं | होसी,–शी. | तुम्ही | व्हा, होआ, होवा. |
| तो | होई. | ते | होती. |

अशा रितीनें हा धातु कवितेंत चालतो. पण चालू भाषेंतही याचीं जुन्या तऱ्हेचीं रूपें आहेत; तीं अशीं:—

### जुना वर्तमान.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होय. | आम्हीं | होय. |
| तूं | होस. | तुम्हीं | होय. |
| तो | होय. | ते | होत. |

### चालू वर्तमान, पुल्लिंगी.†

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होतों. | आम्ही | होतों. |
| तूं | होतोस. | तुम्ही | होतां. |
| तो | होतो. | ते | होतात. |

### रीतिभूत.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होई. | आम्ही | होऊं. |
| तूं | होस, होईस. | तुम्ही | व्हा. |
| तो | होई. | ते | होत, होईत. |

### भूतकाळ, पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होतों. | आम्हीं | होतों. |
| तूं | होतास. | तुम्ही | होतां, होतांत, होतेत. |
| तो | होता. | ते | होते. |

---

* हें संबंध प्रकरण सहाव्या इयत्तेमध्यें शिकवावें.

† ज्या काळाचीं लिंगाचीं रूपें होतात, त्याचीं फक्त पुल्लिंगी रूपें येथें सांगितलीं आहेत. बाकीचीं रूपें त्यांवरूनच सहज सांगतां येतील; तथापि शिक्षकांनीं तीं जेव्हांच्या तेव्हां चालवून घ्यावीं.

**दुसरा प्रकार.**

| | | | |
|---|---|---|---|
| मी | झालों. | आम्ही | झालों. |
| तूं | झालास. | तुम्ही | झालां, झालांत, झालेत. |
| तो | झाला. | ते | झाले.* |

**भविष्य काळ.**

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होईन. | आम्ही | होऊं. |
| तूं | होशील. | तुम्ही | व्हाल. |
| तो | होईल. | ते | होतील. |

## आज्ञार्थ.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होऊं. | आम्ही | होऊं. |
| तूं | हो. | तुम्ही | व्हा. |
| तो | होवो, होओं. | ते | होवोत, होओत. |

## विध्यर्थ, पुल्लिंग.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | व्हावों, हवों, व्हावा, हवा. | आम्ही | व्हावों, हवों. |
| तूं | व्हावास, हवास. | तुम्ही | व्हावां, व्हावांत, व्हावेत, हवांत, हवां, हवेत. |
| तो | व्हावा, हवा. | ते | व्हावे, व्हावेत, हवे, हवेत. † |

## संकेतार्थ (पुल्लिंग).

| | | | |
|---|---|---|---|
| मी | होतों. | आम्ही | होतों. |
| तूं | होतास. | तुम्ही | होतां. |
| तो | होता. | ते | होते. |

टीप—"होतों' आणि 'झालों' यांतील अर्थांचा भेदः – 'मी होतों' आणि 'मी झालों' आणि 'तो होता' व 'तो झाला,' इत्यादि या दोन प्रकारच्या रूपांतला भेद असा आहे कीं 'तो होता' म्हणजे पूर्वी-पासून होता किंवा नियमित वेळीं होता;

---

*कवितेंत 'हो' धातुच्या भूतकाळाचीं 'जाहला,' 'जाहलों' अशी रूपें आढळतात व जुन्या बखरींतून सुद्धां येतात. हीं रूपें प्रथम होऊन मग 'ज' आणि 'ह' एकत्र होऊन 'झ' होतो, व 'झाला,' 'झालों' अशीं रूपें झालीं. याबद्दलची जास्त माहिती शिक्षकानें योग्य वाटल्यास मोठ्या व्याकरणांतून सांगावी.

† या रूपाचा उपयोग 'पाहिजे,' 'गरज आहे,' असा अर्थ करितात.

आणि 'झाला' म्हणजे पूर्वी तसा नव्हता आणि त्या वेळीं तसा झाला. उदा०:— 'तो बरा होता' म्हणजे 'अगोदर-पासून किंवा त्या वेळीं बरा होता.' पण 'तो बरा झाला' म्हणजे ज्या वेळीं आपण बोलतों त्या वेळीं, असा अर्थ समजावा.

## (२) 'अस' धातु, अकर्मक.*

| जुना वर्तमान. | | चालू वर्तमान (पुल्लिंगी). | |
|---|---|---|---|
| मी असें. | आम्ही असूं, असों. | मी असतों. | आम्ही असतों. |
| तू असशी,-सी. | तुम्ही असा, असां. | तूं असतोस. | तुम्ही असतां. |
| तो असे. | ते असतां. | तो असतो. | ते असतात. |

| रीतिभूत. | | भविष्यकाळ. | |
|---|---|---|---|
| मी असें. | आम्ही असूं. | मी असेन. | आम्ही असूं. |
| तूं असस. | तुम्ही असा. | तूं असशील,-सील. | तुम्ही असाल. |
| तो असे. | ते असत. | तो असेल. | ते असतील. |

| आज्ञार्थ. | | विध्यर्थ (पुल्लिंग). | |
|---|---|---|---|
| मी असूं. | आम्ही असूं. | मी असावा, असावों. | आम्ही असावे, असावों. |
| तूं अस. | तुम्ही असा. | तूं असावास. | तुम्ही असावे,-त. |
| तो असो. | ते असोत. | तो असावा. | ते असावे. |

### संकेतार्थ (पुल्लिंग).

| | |
|---|---|
| मी असतों. | आम्ही असतों. |
| तूं असतास. | तुम्ही असतां. |
| तो असता. | ते असते. |

## (३) 'आहे' धातु, अकर्मक.

या धातूचीं फक्त वर्तमानकाळाचीं रूपें आहेत. इतर काळीं याचा उपयोग होत नाहीं. कोणी म्हणतात कीं हीं 'अस' या धातूचींच रूपें आहेत, पण तसें नाहीं. तर संस्कृतांतील 'अस्ति' आणि प्राकृतांतील व जुन्या मराठींतील 'आथि' आणि 'आहि' या तृतीय-पुरुषाच्या एकवचनी रूपांवरून हा निराळाच धातु झाला आहे.

---

* या धातूचीं भूतकाळीं रूपें होत नाहींत. त्यांबद्दल 'हो' धातूचीं भूतकाळाचीं रूपें जीं 'होतों,' 'होता,' इत्यादि, त्यांचा उपयोग करितात.

## वर्तमानकाळ, तिन्ही लिंगी.

| | | | |
|---|---|---|---|
| मी | आहे. | आम्ही | आहों, आहोंत. |
| तूं | आहेस. | तुम्ही | आहां, आहांत. |
| तो | आहे. | ते | आहेत. |

टीप—आहे आणि असतो यांच्या अर्थाविषयीं–आहे म्हणजे अमक्याच नियमित वेळीं; असतो म्हणजे बराच वेळ किंवा नेहमीं; अथवा असण्याची रीत आहे, असा अर्थ; उदा०:–' तो देवळांत आहे, ' म्हणजे आतां, या वेळीं आहे; ' तो देवळांत असतो, ' म्हणजे नेहमीं वारंवार असतो. ' तो देवळांत असतो, ' यांत आतां तो तेथें आहे असा अर्थ होईलच असें नाहीं. अशाच प्रकारचा फरक नाहीं आणि नसतो यांच्याही अर्थामध्यें आहे.

( ४ ) ' आहे ' ( याचें जुनें रूप ' आही ' ) याच्या मागें ' न ' येऊन ' **नाहीं** ' असें रूप झालें, व तोही एक धातु झाला आहे. याचीं फक्त वर्तमानकाळाचीं रूपें होतात, तीं अशीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | नाहीं. | आम्ही | नाहीं. |
| तूं | नाहींस. | तुम्ही | नाहीं. |
| तो | नाहीं. | ते | नाहींत. |

टीप—' नाहीं ' याच्या शेवटीं सर्व रूपांत अनुस्वार देतात; पण हा अनुस्वार प्रथम-पुरुषीं मात्र योग्य आहे. इतरत्र अनुस्वार देण्याचें योग्य कारण दिसत नाहीं. ( हीं रूपें तिन्ही लिंगी आहेत ).

( ५ ) ' हो ' या धातूच्या पूर्वी ' **न** ' येऊन ' **न्‍हो** ' असा धातु होतो; याचीं फक्त वर्तमान व भूत या काळांचीं रूपें होतात; तीं अशीं:—

| वर्तमानकाळ (तिन्ही लिंगी). | | | भूतकाळ ( पुल्लिंगी ). | | |
|---|---|---|---|---|---|
| मी नव्हे. | आम्ही | नव्हों, नहों. | मी नव्हतों. | आम्ही | नव्हतों. |
| तूं नव्हस, नव्हेस. | तुम्ही | नव्हां. | तूं नव्हतास. | तुम्ही | नव्हतात, नव्हता. |
| तो नव्हे. | ते | नव्हेत, नव्हत. | तो नव्हता. | ते | नव्हते. |

( ६ ) ' **नको** ' धातु अकर्मक, याचीं फक्त वर्तमानकाळाचीं रूपें आहेत; तीं अशीं:—

## ( तिन्ही लिंगी ).

| | | | |
|---|---|---|---|
| मी | नको. | आम्ही | नको. |
| तूं | नकोस. | तुम्ही | नका, नको. |
| तो | नको. | ते | नकोत. |

( ७ ) ' **जा** ' हा धातु इतर धातूंप्रमाणेंच चालतो, पण त्याचीं भूतकाळाचीं रूपें नाहींत. त्यांबद्दल गेलों, गेला, गेलास अशीं रूपें होतात.

( ८ ) ' **पाहिजे** ' असा एक धातु आहे. तो ' पाहा ' या धातूचें जुनें कर्मणि रूप होऊन त्यावरून झाला आहे. मूळचा अर्थ मात्र आतां पुष्कळ फिरला आहे. त्याचीं फक्त वर्तमानकाळाचीं रूपें होतात; तीं अशीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| मी | पाहिजे. | आम्ही | पाहिजे. |
| तूं | पाहिजेस. | तुम्ही | पाहिजे. |
| तो | पाहिजे. | ते | पाहिजेत. |

( हीं रूपें तिन्ही लिंगीं आहेत. )

( ९ ) ' **न–ये** ' आणि ' **न–लगे** ' असे दोन धातु कोणी समजतात. पण वास्तविक हे न ( अव्यय )+ये, व न+लगे, असे धातु आहेत. ' लागे ' याचें मग ' लगे ' असें रूप होतें. यांचीं फक्त जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें आहेत; तीं अशीं:—

| **न–ये.*** | | | | **न–लगे.†** | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मी | नये. | आम्ही | नये. | मी | नलगे. | आम्ही | नलगे. |
| तूं | नयेस. | तुम्ही | नये. | तूं | नलगस,–गेस. | तुम्ही | नलगे. |
| तो | नये. | ते | नयेत. | तो | नलगे. | ते | नलगत. |

---

## १६–साधित धातु.

११८. **करणें** यापासून दुसऱ्याकडून करून घेणें या अर्थी ' करविणें ' असा धातु होतो; याप्रमाणें बोलणें, बोलवणें; वांचणें, वांच-

---

*न–ये याचा स्वतंत्र उपयोग न होता ' अ: '–प्रत्ययान्त आणि ' ऊं '–प्रत्ययान्त कृदन्ताबरोबर होतो; जसें–' जाता नये, ' ' करूं नये, ' इ०.

† या प्रकरणांत चालविलेल्या धातूंना गौण अथवा सिद्ध धातु असें म्हणण्याची चाल आहे. परंतु यांस अनियमित धातु असें सोपें नाव बरें आहे.

विणें; जाणें, जाववणें; बसणें, बसविणें; लिहिणें, लिहविणें; इत्यादि. असे धातु **क्रिया दुसऱ्याकडून करविणें** अशा अर्थी होतात. यांना **प्रयोजक धातु** असें म्हणतात.

( अ ) हे धातु मूळ धातूस ' व ' असा प्रत्यय लागून होतात. हा प्रत्यय पुढें ' ई ' आगम होऊन ' वि ' असा होतो.

( आ ) कित्येक धातु नामें आणि विशेषणें यांपासून प्रत्यय लागून होतात. अथवा नामें आणि विशेषणें जशींच्या तशींच घेऊन तें धातुच आहेत असें समजतात; जसें:— हात, हाताळणें; डोकें, डोकावणें; फूल, फुलणें; इत्यादि. याप्रमाणें दुणावणें, कोळपणें, तळपणें, चिरंगटणें, लाथाडणें, वोरखाडणें, चुरमुटणें, पोंचलणें, फेंसाळणें, वेडावणें, रागावणें, पिसाळणें, खुणावणें, रोंगटणें, मोहोरणें, गांजणें, संतापणें, आनंदणें, लांचणें, हर्षणें, इत्यादि. अशा धातूंना **नाम-धातु** असें म्हणतात.

( इ ) असे हे दुसऱ्या शब्दांवरून साधलेले असे दोन प्रकारचे **साधित-धातु** आहेत:— ( १ ) **प्रयोजक-धातु** आणि ( २ ) **नाम-धातु**.

***( १ ) मूळ धातूंस प्रत्यय लावून दुसऱ्याकडून क्रिया करविणें अशा अर्थाचे जे धातु करितात, त्यांस प्रयोजक-धातु असें म्हणतात.***

***( २ ) कित्येक नामांस आणि विशेषणांस प्रत्यय लावून त्यांचे धातु बनवितात, अथवा प्रत्यय न लावितां त्यांसच धातु समजतात, त्यांस नाम-धातु असें म्हणतात.***

११९. प्रयोजक धातु करण्याची रीत अशी आहे, कीं मूळ-धातूस ' व ' ( आगम होऊन ' वि ' ) प्रत्यय लावावा. या ' व ' च्या पूर्वीं आणखी ' ई ' आगम विकल्पेंकरून होतो; उदा०:—करव, करीव; बसव, बसीव; म्हणव, म्हणीव; बोलाव, बोलीव; इत्यादि.

प्रयोजक धातु होतांना कित्येक विशेष प्रकार होतात, त्यांतले थोडे पुढें सांगतों:-

( अ ) कित्येक धातूच्या उपान्त्याच्या 'अ' चा 'आ' होऊन प्रयोजक धातु होतात; उदा०:-मरणें, मारणें; दबणें, दाबणें; टळणें, टाळणें; चरणें, चारणें; पडणें, पाडणें; इ०.

( आ ) ही प्रयोजक धातु बनविण्याची भाषेंतील जुनी रीत दिसते. असे झालेले जे प्रयोजक धातु तें मूळचेच आहेत असें समजून त्यांना आणखी 'व' प्रत्यय लावितात आणि प्रयोजक धातु करितात; जसें,- मारवणें, पाडवणें, इ०.

( इ ) 'जाणें' याचें प्रयोजना-अर्थी जाववणें, असें मूळचें रूप आहे, पण त्याचा आतां उपयोग होत नाहीं; त्या अर्थी घालवणें, पाठविणें, दवडणें, अशीं रूपें होतात. 'दिसणें' ( मूळचें 'देखणें' ) यापासून 'दाखविणें' असें होतें. अशीं आणखी कांहीं रूपें:-पिणें, पाजणें; येणें, आणणें; भिणें, भेडावणें, भिवविणें; इत्यादि.

( ई ) कित्येक मूळचे धातु नष्ट होऊन आतां त्यांचे प्रयोजक धातु मात्र उपयोगांत आहेत; जसें:-जेवणें, धाडणें, काढणें, पाठविणें, कालविणें, लोटणें, इ०.

( उ ) केव्हां प्रयोजक धातूचा उपयोग केल्यानें क्रियापदानें दाखविलेली क्रिया शक्तीचा विषय आहे असा अर्थ उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, 'माझ्यानें काम करवतें' म्हणजे काम करण्याची मला शक्ति आहे; 'माझ्यानें जाववतें,' म्हणजे मला जाण्याची शक्ति आहे; इत्यादि. असा उपयोग असतां यांना **शक्य क्रियापदें** म्हणण्याची चाल पडली आहे.

टीप—वास्तविक पाहातां ही केवळ प्रयोजक क्रियापदाच्या उपयोगाची गोष्ट आहे. प्रयोजक क्रियापदांचा विवक्षित तऱ्हेचा उपयोग झाला म्हणजे असा अर्थ उत्पन्न होतो. हा उपयोग अकर्मक धातूसारखा असल्यामुळें या येळीं धातूला 'इ' आगम होत नाहीं; उदाहरण:— 'माझ्यानें काम करवतें; ' 'त्याच्यानें धरवेल; ' इत्यादि.

( ऊ ) मूळ धातू सकर्मक असून, प्रयोजक केल्यावर त्याचा अकर्मक उपयोग केला असतां, अथवा मूळ धातु अकर्मक असून त्याचा भावी उपयोग केला असतां असा अर्थ उत्पन्न होतो; जसें:—'मी काम करितों;'

'मी काम करवितों' (प्रयोजक); 'माझ्यानें अथवा मला काम करवतें' (शक्य); 'मी जातों;' 'मी जाववितों' (प्रयोजक); 'माझ्यानें अथवा मला जाववतें' (भावी, शक्य).

१२०. प्रयोजक धातु अथवा नामधातु तयार केल्यावर तो इतर कोणत्याही धातूप्रमाणें हव्या त्या काळीं व अर्थी चालवावा; उदा०:—

(१) करीव, प्रयोजक धातु—

**जुना वर्तमानकाळ**—करवी, करविशी, करविती, इ०.

**भूतकाळ**—करविला, करविलें, इ०.

**भविष्यकाळ**—करवितील, इ०.

**आज्ञार्थ**— करीव, करव, इ०.

(२) हाताळणें, नामधातु—

**चालू वर्तमानकाळ**— तूं हाताळतोस, इत्यादि.

**भूतकाळ**— हाताळलें.

**भविष्यकाळ**— हाताळील.

**विध्यर्थ**— हाताळावें, हाताळाव्या, इत्यादि.

(३) लांबणें (नामधातु)—गोष्ट लांबली, लांबेल, इत्यादि.

**टीप**— प्रयोजक धातु निरंतर सकर्मक असतात. अकर्मक धातूवरूनही होणारा प्रयोजक धातु सकर्मक होतो.

---

## अभ्यास

### १४.

१ पुढील धातूंवरून प्रयोजक धातु तयार करून त्यांचीं निरनिराळ्या काळांचीं व अर्थांचीं रूपें कराः—चोळणें, देणें, फितणें, नमणें, बुडणें, पढणें, मरणें, बसणें, निजणें, उठणें, गुंतणें, ढळणें, पाजणें, ठेवणें, चरणें, श्रमणें, पाहणें, पोहणें, तोडणें, निळणें, दचणें, लागणें, फिटणें, रुपणें, सरणें, पळणें, लिहिणें, जाणें, येणें, लांबणें, फुलणें, दिपणें, देणें.

२ पुढील शब्दांवरून नामधातु तयार करून त्यांचीं निरनिराळ्या काळांचीं व अर्थांचीं रूपें करून सांगा:—हात, पोट, माणूस, रुंद, लांब, फूल, फेस, पिसा, हर्ष, जप, बोथट, कातरी, डाग, त्याग, संतोष, राग, कोप, रोष, उजेड, सांज, चोर, आंखूड, कानस, थोबाड, गढूळ, प्रकाश, खिळा, शेवाळ.

३ हीं दोन्हीं प्रकारचीं क्रियापदें वाक्यांत घालून मुलांकडून वाक्यें करून घ्यावीं.

---

## १७—धातुसाधित शब्द.

१२१. धातूंवरून काळांचीं व अर्थांचीं रूपें होतात त्यांना क्रियापदें असें म्हणतात; त्यांशिवाय त्यांवरून नामें, विशेषणें, आणि अव्ययें होतात; यांना **धातुसाधित शब्द** किंवा **कृदन्तें** असें म्हणतात. त्यांतलीं मुख्य मुख्य सांगतों:—

### (१) नामें.

(अ) धातूंना 'णें' हा प्रत्यय लागून धातूंचा भावार्थ म्हणजे ती ती क्रिया दाखविणारीं नपुंसकलिंगीं नामें होतात; जसें,— 'असें **करणें** मला आवडत नाहीं;' यांत 'करणें' म्हणजे करण्याची क्रिया; त्याचप्रमाणें, बसणें, उठणें, लिहिणें, बोलणें, चालणें, जाणें, येणें, वाचणें, सांगणें, म्हणणें, करविणें, बोलावणें, फेसाळणें, दुरावणें, फुलणें, इत्यादि.

(आ) यांनाच आणखी चा, ची, चें, हे प्रत्यय लागून नामें आणि विशेषणें होतात; उदा०:—खाणें, खाण्याचें = खाण्याचा पदार्थ; उदा०:— 'तूं आंबट **खाण्याचें** सोडून दे, म्हणजे खोकला येणार नाहीं' (नाम); '**छापण्याचें** यंत्र' (विशेषण); इत्यादि.

(इ) याच धातुसाधित नामांस आणखी स, ला, तें, हे प्रत्यय लागून नामें व अव्ययें होतात; जसें,— 'मला हिंदुस्थानी **बोल-**

ण्यास आणि लिहिण्यास येतें,' ( नामें ); 'वाटेंत खेळण्यास गुंतलास तर शाळेला जाण्यास उशीर होईल,' ( अव्ययें ); इ०.

## ( २ ) विशेषणें.

( अ ) वर्तमानकालवाचक— हीं धातु सकर्मक असल्यास 'ईत' व अकर्मक असल्यास 'अत' प्रत्यय लागून होतात. उदा०:—करीत, लिहीत, वाचीत, येत, जात, बसत, उठत, इत्यादि.

टीप—येथें वास्तविक 'त' हा प्रत्यय असून मागें सकर्मक धातूंमध्यें 'ई' आगम होतो; अकर्मक धातूंमध्यें मागें 'अ' असतो.

( आ ) भूतकालवाचक—हीं 'ला' व 'लेला' असे प्रत्यय लागून होतात, व तीं लिंगवचनांप्रमाणें फिरतात; जसें,—केला, केली, केलें; केलेला, केलेली, केलेलें; केलेल्या; इत्यादि. हीं विशेषणें कर्मणि असतात.

( इ ) दुसऱ्या प्रकारचीं 'ता' किंवा 'इता' प्रत्यय लागून होतात; जसें,—करिता, बोलता, लिहिता, जाता, येता, मारिता, इ०. उदाहरणः— 'तो जाता झाला, मारिता झाला;' 'बोलता चालता मनुष्य;' 'रांगतें मूल;' इ०. हीं विशेषणें कर्तरि असतात.

( ई ) भविष्यकालवाचक— हीं 'णार' असा प्रत्यय लागून होतात, व तीं लिंगवचनांप्रमाणें फिरतात; उदा०:—जाणार, येणार, बसणार, करणार, करणारा, करणारी, करणारें, इत्यादि; उदा०:—'चोरी करणारास शिक्षा होते;' 'हल्लीं वाचणाऱ्या मुली पुष्कळ आढळतात;' 'रडणारें मूल कोणास आवडेल?' इ०.

टीप— यांचा उपयोग विधिविशेषणांसारखा होतो, तेव्हां यांना लिंगवचनांचा विकार होत नाहीं; उदा०:—'तो आज मुंबईस जाणार ( म्ह० जाणारा असा ) आहे.' 'तूं तें पुस्तक मला कधीं देणार ( आहेस ) ?' इ०.

( उ ) विध्यर्थक— हीं 'वा' हा प्रत्यय लागून होतात, व तीं लिंगवचनांप्रमाणें फिरतात; जसें,—करावा, करावी, करावें,

कराव्या, करावीं, इत्यादि; उदा०:–'मला धडा करावा लागला,' 'त्यास लेखणी करावी लागली, लेखण्या कराव्या लागल्या, काम करावें लागलें,' इ०.

( ऊ ) विध्यर्थक विशेषणांस आणखी स, ला, तें, हे प्रत्यय लागून नामें आणि चा, ची, चें, असे प्रत्यय लागून नामें व विशेषणें होतात; उदा०:—'त्याला इंग्रजी बोलावयास येतें, पण लिहावयाला येत नाहीं,' ( नामें ); 'मला आज मुंबईस जावयाचें ( नाम ) आहे;' 'तुला करावयाचें ( विशेषण ) काम येथें कांहीं दिसत नाहीं;' इ०.

( ए ) धातूंस 'वें' प्रत्यय लागून विध्यर्थक नामें होतात; यांसच पुढें चतुर्थीचे स, ला, तें, हे प्रत्यय लागतात, आणि मग तीं हेत्वर्थक अव्ययें होतात; उदा०:–शिकावयास, जावयास, खेळावयास, इ०.

## ( ३ ) अव्ययें.

( अ ) **वर्तमानकालवाचक**—( १ ) एक प्रकारचीं 'तां' व 'तांना' हे प्रत्यय लागून होतात; उदा०:—जातां, येतां, येतांना, बसतां, बसतांना, इत्यादि.

टीप—या प्रत्ययांपूर्वीं सकर्मक धातूंस विकल्पेंकरून 'इ' आगम होतो; उदा०:—करितां, करतां; इ०.

( २ ) दुसऱ्या प्रकारचीं 'ऊं' किंवा 'वूं' प्रत्यय लागून होतात; उदा०:–करूं, बोलूं, चालूं, जाऊं, जावूं, पिवूं, पिऊं, इ०.

( आ ) या दोन्ही प्रकारच्या अव्ययांचा नामांप्रमाणें उपयोग होतो; उदा०:—'मला इंग्रजी बोलतां येतें पण लिहितां किंवा वाचतां येत नाहीं;' 'तुला गुजराथी लिहितां किंवा लिहितांना येतें काय?' 'आई मुलास जेऊं किंवा जेवूं ( म्ह० जेवण, अन्न ) घालितें;' इत्यादि.

( इ ) **भूतकालवाचक**—हीं ' ऊन ' किंवा ' वून ' प्रत्यय लागून होतात; उदा०:—करून, बोलून, चालून, जाऊन–जावून, येऊन-येवून, ऐकून, उठून, बसून, इ०.

( ई ) **विध्यर्थक**—हीं विध्यर्थाचा ' वा ' प्रत्यय लागून झालेल्या विशेषणांस स, ला, तें, हे प्रत्यय लागून होतात; उदा०:— करावयास, करावयाला, बोलावयाला, इत्यादि.

( उ ) या अव्ययांतलें ' व ' हें अक्षर गाळून, हीं करावयास, बोलावयास, यांबद्दल करायास, बोलायास, अशींही लिहितात. त्याच-प्रमाणें जावयाचें, बोलावयाचें, हे शब्दही जायाचें, बोलायाचें, असे लिहितात.

( ऊ ) या विध्यर्थक अव्ययांचा नामांप्रमाणें उपयोग करितात; उदा०:—'तुला इंग्रजी **बोलावयास** येतें काय? ' ' मला आज घरीं बसून **राहावयास** ( राहाणें ही गोष्ट करणें ) लागेल असें वाटतें; ' इ०.

१२२. धातुसाधित विशेषणें व अव्ययें यांचा नामांप्रमाणें उप-योग होतो; तेव्हां त्यांस **क्रियावाचक नामें** असें नांव देतात.

( १ ) हा जो त्यांचा नामांसारखा उपयोग होतो, तो क्रिया-पदांचा कर्ता किंवा कर्म अशा रितीनें, म्हणजे प्रथमा किंवा द्वितीया या विभक्तींमध्यें मात्र होतो, इतर विभक्तींमध्यें होत नाहीं, हें मागें उदाहरणें दिलीं आहेत त्यांवरून दिसून येईल.

१२३. धातुसाधित शब्द हे जेव्हां सकर्मक धातूंपासून झालेले असतात, तेव्हां त्यांचें कर्मपद त्यांबरोबर येतें; जसें,–' त्यानें **पत्र** लिहून टाकलें; ' ' तो **तुम्हांस** बोलवावयाला आला आहे; ' '**अभ्यास** करीत असतांना मला कोणीं गडबड केलेली सोसत नाहीं; ' ' हरी ती **गोष्ट** बोलून चुकला; ' '**असें** करणें चांगलें नव्हे; ' इत्यादि.

## अभ्यास

### १५.

१. कांहीं सकर्मक, कांहीं अकर्मक, कांहीं प्रयोजक आणि कांहीं नामधातु घेऊन त्यांपासून होणारीं सर्व प्रकारचीं धातुसाधितें लिहून दाखवा.

२. पुढील वाक्यांतले धातुसाधित शब्द सांगून ते कोणत्या प्रकारचे आहेत हें सांगाः—मुंबईंत कापड विणणें हें काम हल्लीं वाफेनें चालणाऱ्या यंत्रानें होत असतें. वाफेच्या यंत्रानें बहुतेक कामें होऊं लागलीं आहेत. भलत्याला हें करण्यास सांगूं नका. इतकें जलद वाचणें आमच्या गुरुजींस आवडणार नाहीं. जे सवड असून धर्म करीत नाहींत, ते मग धर्म करणार तरी केव्हां? तो प्रसंग फुकट जाऊं देत नसे. इतकी मेहनत घेऊन तयार केलेलें चित्र लोकांना आवडल्यास बरें. मला आज त्यानें जेवावयाला बोलाविलें आहे. तो सरदार नित्य दहा भिकाऱ्यांस जेवावयास घालितो. तो आम्हांस उठूंच देईना, त्याला काय करावयाचें? आम्हांस आज रात्रीच्या गाडीनें मुंबईस जावयाचें आहे. एवढीं उदाहरणें करून टाकलीं ह्मणजे सुटलों; मग आपण फिरावयास जाऊं. मुंबईस जाणारा कोणी भेटल्यास पाहा. तुम्हांस इतका वेळ वाट बघावयास पडल्याचें पाहून मला वाईट वाटलें. हें तुला कोणी करूं (किंवा करावयास) सांगितलें? तो जाऊं लागला तेव्हां मी उठून चालता झालों. आतां मूल मोठ्यानेंच रडूं लागलें. अजून उन्हाळा होत नाहीं; पंधरा दिवसांत जास्त होऊं लागेल. थंडी पडावयास लागली असतां हवा सुधारेल. आमच्या येथें रोज आले गेले दहा पाहुणे असतात. रडत खडत आम्हीं पांच कोस मजल मारली. उद्यां मागें झालेले सर्व धडे वाचून या. शिपाई त्याला तेथें बसूं देणार नाहीं. हें पत्र तुला कोणीं लिहून दिलें? मीं त्याला पत्र लिहूं दिलें म्हणून; पण तुला लिहूं न दिलें तर काय करशील? इतकें काम करावयाचें पडेल असा मला अजमास नव्हता.

३. एकेका धातूचें एकेक धातुसाधित घेऊन मुलांना त्याचा वाक्यांत निरनिराळ्या प्रकारचा उपयोग करावयास सांगावें.

४. धातुसाधितांस क्रियावाचक नामें केव्हां म्हणतात, आणि त्यांस कर्में केव्हां असतात, त्यांचीं उदाहरणें लिहा.

## १८—संयुक्त क्रियापदें.*

१२४. मागें क्रियापदांचीं आठ प्रकारचीं रूपें म्हणजे काळ व अर्थ सांगितले; त्यांशिवाय क्रियेचा अर्थ दाखविण्याचा आणखी एक प्रकार आहे. तो असा, कीं कोणत्याही धातूचें त्या आठ प्रकारच्या रूपांपैकीं एकादें रूप घेऊन, त्याच्या मागें एकादें नामाचें किंवा विशेषणाचें अथवा धातुसाधिताचें रूप घालावें. अशी रचना केली असतां क्रियापदाचें जें रूप असतें, तेवढ्यानेंच नीट अर्थ होत नाहीं; तर तें रूप व मागील शब्द मिळून अर्थ होतो; अशा रितीनें त्या शब्दांचा **संयोग** म्हणजे त्यांची जुळणी होऊन अर्थ होतो, म्हणून त्यांस **संयुक्त क्रियापदें** असें म्हणतात; उदाहरणार्थ, 'झोंप घेणें' असें म्हटलें तर 'घेणें' या क्रियापदाचा जो मूळचा अर्थ आहे तो येथें नसून 'झोंप' व 'घेणें' मिळून एक शब्द बनून त्याला नवा अर्थ येतो; 'त्रास देणें,' 'त्रागा करणें,' 'पायांत घालणें,' 'डोकीस घालणें,' 'पाठ करणें,' 'आंगांत येणें,' 'रागें भरणें,' 'मार खाणें,' 'जागें करणें,' 'बरें करणें,' या सर्व जोड क्रियापदांचा असाच अर्थ आहे. तसेंच 'करून टाकणें,' 'करूं जाणें,' 'जातां येणें,' 'वाचीत बसणें,' 'जाता झाला,' 'बसला आहे,' 'जाणार होता,' 'वाचीत बसला असेल,' 'चालत जात असेल,' या जोड क्रियापदांमध्यें एकाहून अधिक शब्द मिळून अर्थ झाला आहे; त्यांतल्या नुसत्या क्रियापदांस कांहीं अर्थ नाहीं.

१२५. हीं संयुक्त क्रियापदें चार प्रकारचीं होतातः—

---

* या प्रकरणांतील सोपा भाग नेवढा पांचव्या इयत्तेस शिकवावा व संबंध प्रकरण सहाव्या इयत्तेंत शिकवावें.

( अ ) नामाचें रूप अगोदर येऊन झालेलीं; ( आ ) विशेषणाचें रूप अगोदर येऊन झालेलीं; ( इ ) धातुसाधित नाम किंवा विशेषण मागें येऊन झालेलीं; व ( ई ) धातुसाधित अव्यय मागें येऊन झालेलीं. यांच्या रचनेचे निरनिराळे प्रकार सांगतों:—

( १ ) क्रियापदाच्या रूपाच्या मागें जें नामाचें रूप येतें तें त्यांचें कर्म असतें; उदा०:— 'तो झोंप घेतो;' 'चोरानें मार खाल्ला;' 'आपण विचार करूं;' 'तो मला भय घालितो;' इ०.

( २ ) एकाद्या नामाचें कोणत्या तरी विभक्तीचें रूप होऊन पुढें क्रियापद येतें; आणि तें रूप आणि क्रियापद मिळून कांहीं विशेष अर्थ होतो. अशा ठिकाणीं क्रियापद सकर्मक असल्यास त्याचें निराळेंच नाम कर्म असतें; उदा०:–'त्यानें आंगरखा आंगांत-घातला;' 'बाप हरीला रागें-भरला;' 'हें काम तो सिद्धीस-नेईल;' इ०.

( ३ ) क्रियापदाच्या मागें विशेषण येऊन, तें अर्थाला क्रियापदाचा अंश असें असतें; उदा:०– 'वैद्य रोग्याला बरें-करील;' 'मुलें आपले हात शाईनें काळे-करितात;' 'मी ही दोरी कापून आखूड-करीन;' इत्यादि.

( ४ ) 'करीत,' 'जात,' 'लिहीत,' या धातुसाधित विशेषणांपुढें 'आहे,' 'होता,' 'असेल,' हीं रूपें येऊन संयुक्त क्रियापदें होतात; यांवरून क्रिया अपूर्ण किंवा चालू आहे, असा अर्थ होतो; उदा०:–'करीत आहे,' 'जात आहे,' 'जात होता,' 'लिहित असेल,' इत्यादि.

( ५ ) 'केला,' 'लिहिलें,' 'धाडलें,' असल्या धातुसाधित विशेषणांपुढें 'आहे,' 'होता,' 'असेल,' हीं रूपें येऊन संयुक्त क्रियापदें होतात; यांवरून क्रिया पूर्ण झाली असा अर्थ होतो; उदा०:— 'केलें आहे,' 'लिहिलें होतें,' 'धाडलें असेल,' इ०.

(६) 'बसत,' 'वाचीत' या धातुसाधित विशेषणांच्या रूपांपुढें 'असतो' इत्यादि रूपें येऊन ज्यांपासून रितीचा बोध होतो अशीं क्रियापदें होतात; उदा०:— 'बसत असतो' म्हणजे त्याची बसण्याची रीत आहे; 'वाचीत असे' म्हणजे वाचण्याची रीत होती; इत्यादि.

(७) 'जाणार,' 'लिहिणार,' या विशेषणांपुढें 'आहे,' 'होता,' 'असेल,' हीं रूपें येऊन बोलणाराचा तसा उद्देश आहे असा अर्थ होतो; उदा०:—'जाणार आहे,' 'लिहिणार होता,' 'बसणार असेल,' इत्यादि.

१२६. अशा रितीचीं पुष्कळ प्रकारचीं संयुक्त क्रियापदें होतात. त्यांची लहान मुलांना तूर्त माहिती झाली म्हणजे पुरे आहे. यांतील मुख्य मुख्य पुढें देतों*:—

(अ) 'मला हें काम करितां[३] येतें.'
'मी हें काम करूं[३] शकतों.'

(आ) 'शिपायाकडून चोर धरिलो[२] जातो.'
'तो पकडलो गेला.'
'अखेरीस तो धरिलो[२] जाईल.'

(इ) 'तळ्यांतलें पाणी आटून[३] गेलें.'
'तो आपली दौलत खर्चून[३] बसला.'
'मीं त्यास रुपये देऊन[३] ठेवले आहेत.'
'तो त्यास असें सांगून[३] चुकला.'
'मी जेवून[३] घेतों, तोंपर्यंत तुम्ही या.'
'एवढे पांच श्लोक वाचून[३] ठेवा.' [किंवा 'या']

---

* या यादींत ज्या धातुसाधितांवर (१) असा आंकडा घातला आहे, तीं नामें आहेत, (२) असा आंकडा घातला आहे, तीं विधिविशेषणें आहेत, व (३) असा आंकडा घातला आहे तीं अव्ययें आहेत.

( ई ) ‘आमचेकडे नित्य येतें[2] जा.’
‘मुलगे गप्पा मारीतें[2] बसले.’
‘रामा नुसता पाहातें[2] राहिला.’

( उ ) ‘मी त्याच्याशीं बोलूं[1] इच्छितों,’ किंवा ‘बोलावयास[1] पाहातों.’
‘त्याला मुंबईस जावयाचें[1] आहे.’
‘त्यास मुंबईस गेलें[1] पाहिजे.’
‘मला हें पुस्तक वाचावयाचें[2] आहे.’
‘मला हें पुस्तक वाचिलें[3] पाहिजे.’
‘तुला आज गांवाला जावें[1] लागेल.’
‘बाजीरावास इंग्रजांना पुणें द्यावें[3] लागलें.’

( ऊ ) ‘तो बोलूं[3] लागला.’
‘मला मळमळावयास[2] लागलें;’ किंवा मळमळून[1] आलें.
‘मी तुला बोलूं[1] देईन.’
‘तुला त्याचेकडे उगाच खेपा घालावयास[3] पडल्या.’
‘तुला त्याचेकडे खेपा घालाव्या[2] लागल्या;’ इ०, इ०

टीप—हीं संयुक्त क्रियापदें करण्यासाठीं जे अस, हो, दे, बस, लाग, इत्यादि धातु उपयोगीं पडतात, आणि संयुक्त क्रियापदांमध्यें ज्याचें काळाचें किंवा अर्थाचें रूप झालेलें असतें, त्यांना सहाय–धातु असें म्हणण्याची चाल आहे; उदाहरणः—‘जात आहे,’ ‘बसत होता,’ ‘येऊं दे,’ ‘वाचीत बैस,’ ‘बोलूं लागला,’ या उदाहरणांत आहे, होता, दे, बैस, लागला, यांतील धातु हे सहाय-धातु होत.

---

## १९–संयुक्त काळ.*

१२७. मागें सांगितलेलीं जीं संयुक्त क्रियापदें, त्यांवरून पुढें लिहिल्याप्रमाणें संयुक्त काळ मानतां येतील:—

---

* हें समग्र प्रकरण सहाव्या इयत्तेस शिकवावें.

## ( १ ) वर्तमानकाळाचे भेद.

**वर्तमान**—तो करितो, तो शिकतो.
**अपूर्ण-वर्तमान**—तो करीत आहे, तो शिकत आहे.
**पूर्ण-वर्तमान**— तो शिकला आहे, त्यानें ( काम ) केलें आहे.
**रीति-वर्तमान**—तो करीत असतो, तो शिकत असतो.
**उद्देश-वर्तमान**—तो करणार आहे, तो शिकणार आहे.

## ( २ ) भूतकाळाचे भेद.

**भूतकाळ**—तो शिकला, त्यानें ( काम ) केलें.
**अपूर्ण-भूत**—तो शिकत होता, तो करीत होता.
**भूत-भूत**—तो शिकला होता, त्यानें ( काम ) केलें होतें.
**पूर्ण-भूत**—तो करिता झाला, तो शिकता झाला.
**रीति-भूत**—तों शिकत असे, तो करीत असे.
**उद्देश भूत**—तो करणार होता, तो शिकणार होता.

## ( ३ ) भविष्यकाळाचे भेद.

**भविष्यकाळ**—मी करीन, मी शिकेन.
**अपूर्ण-भविष्य**—मी करीत असेन, मी शिकत असेन.
**पूर्ण-भविष्य**—मी शिकलों असेन, म्यां ( काम ) केलें असेल.
**उद्देश-भविष्य**—तो शिकणार अथवा करणार असेल.

## ( ४ ) विध्यर्थाचे भेद.

**विध्यर्थ**—तो असावा.
**अपूर्ण-विध्यर्थ**—तो शिकत असावा, तो करीत असावा.
**पूर्ण-विध्यर्थ**—तो शिकला असावा, त्यानें ( काम ) केलें असावें.
**उद्देश-विध्यर्थ**—तो शिकणार अथवा करणार असावा.

## ( ५ ) संकेतार्थाचे भेद.

**संकेतार्थ**—तो असता ( तर, इ० )

**अपूर्ण-संकेतार्थ**—तो शिकत असता, इ०.
**पूर्ण-संकेतार्थ**—तो शिकला असता, इ०.
**उद्देश-संकेतार्थ**—तो शिकणार असता, इ०.

टीप—( १ ) हे संयुक्त काळ मानण्यापासून कांहीं विशेष सोय होते असें नाहीं. शिवाय ते जितके होतात, तितके सर्व मानितांही येत नाहींत.

( २ ) संयुक्त काळ मानण्यास मुख्य अडचण अशी आहे, कीं जेवढीं निर-निराळीं संयुक्त क्रियापदें होतात, तितके संयुक्त काळ मानिले पाहिजेत, आणि त्यांना नांवें दिलीं पाहिजेत. परंतु त्यांची संख्या फार असल्यामुळें तसें करतां येणें अशक्य आहे; म्हणून संयुक्त काळ मुळींच मानूं नयेत हें बरें. संयुक्त क्रियापदें हीं धातुसाधितांपुढें कांहीं नियमित क्रियापदांचीं रूपें येऊन झालेलीं असतात. धातुसाधितें हीं मूळचीं नामें, विशेषणें अथवा अव्ययें असतातच. तशींच तीं मानून व्याकरण करावें. उदाहरणार्थ, 'तो गेला आहे,' यांत '**गेला**' हें विधिविशेषण. 'रामा जाता झाला,' यांत '**जाता**' हें विधि-विशेषण. 'वक्ता बोलूं लागला,' यांत '**बोलूं**' हें अव्यय. 'आई मुलांस जवूं घालिते,' यांत '**जेवूं**' हें नाम. 'तो जात आहे,' यांत '**जात**' हें विधि-विशेषण. 'हरी पत्र लिहिणार आहे,' यांत '**लिहिणार**' हें विधिविशेषण; इ०.

---

## २०–अव्यय-विचार.

१२८. ज्या शब्दांवरून पदार्थ, लिंग, वचन, इत्यादि कांहीं कळत नाहीं, परंतु जे वाक्यांत अर्थ कमजास्त करण्यासाठीं उपयोगीं पडतात, त्यांस **अव्ययें** असें म्हणतात.

टीप—अ + व्यय; (व्यय म्हणजे विकार अथवा फेरबदल); ज्या शब्दांस लिंगादि-कांचे विकार होत नाहींत ते शब्द.

१२९. उपयोगावरून अव्ययांच्या मुख्य चार जाती झाल्या आहेत, त्या अशा:—(अ) 'मी रामाशीं बोलतों;' 'माझे वडील घरीं आहेत;' 'शंकराच्या माथां जटाभार आहे;' यांत 'रामाशीं' याबद्दल 'रामाजवळ,' 'घरीं' याबद्दल 'घरामध्यें'; [घरा+मध्यें]

किंवा ‘ घरांत, ’ [घर+आंत] ‘ माथां ’ याबद्दल ‘ माथ्यावर ’ असें म्हणतां येईल. याप्रमाणें ‘ जवळ, ’ ‘ आंत, ’ ‘ वर, ’ हीं अव्ययें विभक्तिप्रत्ययांचें काम करितात. ह्या अव्ययांच्या योगानें दोन शब्दांचा **योग** होतो, म्हणजे संबंध जुळून येतो, म्हणून यांस **शब्द-योगीं अव्ययें** असें म्हणतात.

( आ ) हीं अव्ययें नामांस लागतांना त्यांचे विभक्तिप्रत्यय लावण्याचे पूर्वीं जसें सामान्यरूप होतें, तसेंच सामान्यरूप होतें; उदा०:— झाडावर, घरामध्यें, रामाप्रत, मुनीलागीं, घोड्याकडे, वाघामागें, सास्वेजवळ, इत्यादि.

( इ ) पावेतों, पर्यंत, भर, यांपासून अवधीचा बोध होत असतां सामान्यरूप होत नाहीं; उदा०:—रविवार-पावेतों, शनिवार-पर्यंत, रात्र-भर, इत्यादि.

( ई ) पर्यंत, पावेतों, हीं अकारान्त स्थलवाचक नामांपुढें आलीं असतां विकल्पेंकरून सामान्यरूप होतें; उदा०:—सुरत-पावेतों, सुरते-पावेतों, कोल्हापूर-पर्यंत, कोल्हापुरा-पर्यंत, इत्यादि.

( उ ) तो **आतां** आला. मी **तेथें** नव्हतों. रामा **फार** बोलतो. पक्षी **उंच** उडाला. **उद्यां** पाऊस **खचीत** पडेल.— या वाक्यांतील अव्ययांनीं **क्रियेच्या संबंधानें** वेळ, जागा, गुण, प्रकार, निश्चय, असें **विशेष** कांहीं कळतें. यांस **क्रिया-विशेषण अव्ययें** असें म्हणतात.

( ऊ ) राम **आणि** लक्ष्मण. तो **अथवा** हा. हरी **जरी** एवढा मोठा झाला, **तरी** त्याला **कांहीं** कळत नाहीं. मी येणार नाहीं, **कां कीं** माझी ओळख नाहीं. तो होता **म्हणून** बरें झालें. तूं गेलास **म्हणजे** बरें. तो घरीं आहे, **परंतु** भेटणार नाहीं, **पण** त्याचा भाऊ भेटेल.— यांतील अव्ययें दोन अथवा अधिक शब्द अथवा वाक्यें यांचा **अन्वय** करितात म्हणजे **संबंध** जोडितात. यांस **उभयान्वयी अव्ययें** असें म्हणतात.

टीप— शब्दयोगी अव्ययें व उभयान्वयी अव्ययें हीं दोन्हींही वाक्यांत शब्दांचा संबंध जोडितात; परंतु त्यांमधील भेद असा आहे, कीं शब्दयोगी अव्यय एकाद्या नामाशीं विभक्तिप्रत्ययाप्रमाणें योग पावून त्याचा अन्य शब्दांशीं संबंध जोडितें, व उभयान्वयी अव्यय स्वतंत्र राहून संबंध जोडितें ही गोष्ट दोहींच्या उदाहरणांवरून स्पष्ट होईलच.

(ए) तसेंच **अहाहा, अरेरे, अबब, छे, शिव–शिव, चूप, चिप्, वाहवा, भले, शाबास,** इत्यादि अव्ययें एकाएकीं होणारे मनाचे उद्गार दाखवितात. यांस **केवलप्रयोगी** किंवा **उद्गारवाचक अव्ययें** असें म्हणतात.

टीप— या अव्ययांचा वाक्यांत इतर शब्दांशीं संबंध नसतां केवळ एकटींच अशीं तीं वाक्यांत येतात, म्हणून यांस केवलप्रयोगी असें नांव पडलें असावें. यांना उद्गारवाचक असें सोपें नांव दिलेलें बरें.

१३०. तेव्हां अव्ययाचे मुख्य चार प्रकार आहेत:—

**(१) शब्दयोगी, (२) क्रियाविशेषण, (३) उभयान्वयी,** आणि **(४) केवलप्रयोगी.**

(१) जीं अव्ययें नामें व नामवाचक शब्द यांपुढें योजिलीं असतां त्यांपासून विभक्तीचें काम होतें, तीं शब्दयोगी अव्ययें जाणावीं.

**(२) जीं अव्ययें क्रियेच्या संबंधानें वेळ, जागा, प्रकार इत्यादि दाखवितात, त्यांस क्रियाविशेषण–अव्ययें असें म्हणतात;** जसें,—वर, खालीं, पुढें, मागें, उंच, फार, उद्यां खचीत, निःसंशय, बहुधा, बहुतकरून, कदाचित्, क्वचित्, इ०.

**(३) जीं अव्ययें दोन शब्द अथवा दोन वाक्यें यांचा अन्वय म्हणजे संबंध जोडितात, त्यांस उभयान्वयी अव्ययें असें म्हणतात;** जसें,—आणि, व, अथवा, किंवा, जर, तर, जरी, तरी, म्हणून, म्हणजे, पण, परंतु, यद्यपि, तथापि, इ०.

**(४) जीं अव्ययें एकाएकीं होणारे मनाचे उद्गार दाखवितात, त्यांस केवलप्रयोगी अव्ययें असें म्हणतात;** उदा०:—अरेरे, अहाहा, अबब, छे, वाहवा, शाबास, भले, इत्यादि.

**१३१. अव्ययांचे रचनेवरून प्रकारः**—(अ) कित्येक अव्ययें मूळचींच आहेत; उदा०:-हळू, सटकन, वारंवार, वर, आणि, व, अथवा, किंवा, इ०.

(आ) कित्येक अव्ययें मूळचीं नामांचीं अथवा सर्वनामांचीं विभक्तिरूपें असून आतां अव्ययें झालीं आहेत; जसें,—दिवसा, रात्रौ, तशांत, तस्मात्, खालीं, पुढें, मागें, कडे, इत्यादि.

(इ) कित्येक अव्ययें सर्वनामांवरून झालीं आहेत; जसें,—जेव्हां, तेव्हां, कधीं, जेथें, कोठें, जेवीं, तेवीं, केवीं, एरवीं, इत्यादि.

(ई) कित्येक धातुसाधित अव्ययें आहेत; जसें,—करूं, करितां, करितांना, करून, इत्यादि.

(उ) कित्येक जोडीनें येणारीं अव्ययें आहेत, म्हणजे त्यांतलें एक आलें कीं, दुसरें यावयाचेंच; तीं अशीं:– जर, तर; जरी, तरी; यद्यपि, तथापि; इ०.

टीप—यांतलें एक अव्यय आलें असतां दुसरें वाक्यांत घातलेलें असतें अथवा अध्याहृत असतें.

**१३२. शब्दयोगी अव्ययें**:—प्रत्येक विभक्तीच्या मुख्य मुख्य शब्दयोगी अव्ययांची याद मागें दिलीच आहे. विभक्तिप्रत्यय आणि शब्दयोगी अव्ययें यांतला भेद असा आहे, कीं प्रत्ययांस स्वतंत्र अर्थ नसतो; ते शब्दांस लाविल्यावर त्यांस अर्थ येतो. शब्दयोगी अव्ययांस मूळचा स्वतांचा अर्थ असतो. तथापि कित्येक शब्दयोगी अव्ययांस आतां स्वतांचा अर्थ नसून तीं प्रत्ययासारखींच झालीं आहेत; जसें,—प्रत, लागीं, साठीं, मुळें, करून, कडून, खव, पेक्षां, इत्यादि. तेव्हां वास्तविक पाहिलें तर यांस आतां विभक्तिप्रत्यय असें म्हणावयास चिंता नाहीं.

**१३३.** कित्येक शब्दयोगी आणि क्रियाविशेषण अव्ययें वास्तविक एकच आहेत. त्यांची जात केवळ उपयोगावरून समजते; जसें,–घरा-**वर**, झाडा-**खालीं**, बापा-**मागें**, बागे-**मध्यें**; यांतलीं अव्ययें शब्दयोगी अव्ययें आहेत. पण 'तो **वर** आहे.' 'माझें नांव **खालीं** गेलें.' '**मागें** आगगाडी नव्हती.' 'उगाच **मध्यें** बोलूं नको.' या वाक्यांत तींच अव्ययें क्रियाविशेषण अव्ययें आहेत.

**१३४. क्रियाविशेषण अव्ययें**:—यांच्या निरनिराळ्या जाती मानितात, त्या अशाः—**स्थलवाचक**—वर, खालीं, पुढें, मागें, मध्यें, आंत, बाहेर, उंच, सखल, कोठें, येथें, जेथें, तेथें, इत्यादि.

**कालवाचक**—काल, आज, उद्यां, परवां, तेरवां, केव्हां, केधवां, एव्हां, जेव्हां, तेव्हां, पूर्वी, यंदां, दरसाल, मग, मागें, शेवटीं, लगेच, इत्यादि.

**गुणवाचक**—बरें, चांगलें, हळू, मोठ्यानें, इत्यादि.

**क्रमवाचक**—प्रथम, प्रथमतः, पहिल्यानें, पहिल्यानदां, दुसऱ्यानें, तिसऱ्यानें, इत्यादि.

**संख्यावाचक**—पुष्कळ, बहुत, कमी, जास्त, इ०.

**आवृत्तिवाचक**—एकदां, दोनदां, तीनदां, शंभरदां, हजारदां, पुनःपुन्हां, वारंवार, इ०.

**निश्चयार्थक**—खचीत, खरोखर, खास, निःसंशय, खरेंच, इ०.

**संशयार्थक**—क्वचित्, बहुशा, बहुधा, बहुनकरून, बहुतांशीं, इ०.

**अनुकरणार्थक**—झटकन, चटकन, झटदिशीं, हळूहळू, इ०.

**निषेधार्थक**—न, ना, नाहीं.

**१३५. उभयान्वयी अव्ययें**:—यांचे भेद असे करितातः—

**समुच्चयवाचक**—आणि, व, अनी, नी, अन, आणखी, आणिक, अणीक, इ०.

**संकेतबोधक**—जर, तर, इ०.

**विकल्पबोधक**—किंवा, अथवा, अगर, इ०.

**विपक्षबोधक**—अथवा, किंवा, नाहींतर, पक्षीं, इ०.

**विरोधबोधक**—पण, परंतु, नाहींतर, जरी, तरी, यद्यपि, तथापि, इ०.

**कारणबोधक**—म्हणून, म्हणजे, तर-मग, इ०.

**स्वरूपबोधक**—कीं, जे, ऐसाजे, इ०.

**अवधारणाबोधक***—च, ही, ना, मात्र, पण, देखील, सुद्धां, इ०.

**१३६. अव्ययांपासून विशेषणें**:—संबंधी विशेषणाचे प्रत्यय चा, ची, चें, तसेंच ला, ली, लें, हे प्रत्यय आणि 'ईल' हा प्रत्यय स्थलवाचक आणि

---

* या अव्ययांना 'शुद्धशब्दयोगी' अव्ययें असें म्हणण्याची चाल होती. पण तीं शब्दयोगी अव्ययें नव्हत हें तर उघडच आहे. यांना उभयान्वयी म्हणावें किंवा क्रियाविशेषण म्हणावें याविषयीं मतभेद आहे. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मतें यांना उभयान्वयी अव्ययें म्हणावें हें बरें. अवधारणाबोधक म्हणजे निश्चितार्थ दाखविणारीं.

कालवाचक क्रियाविशेषणांस आणि तशा तऱ्हेच्या शब्दयोगी अव्ययांस लागून विशेषणें होतात; जसें,—वरचा, खालचा, कालचा, परवांचा, खालला, वरील, इकडचा, तिकडला, इकडला, इंकडील, तिकडील, पुढील, मागील, कोठचा, कोठला, कोठील, इ०.

(अ) हीं विशेषणें शब्दयोगी अव्ययांपासून झालीं असतां त्यांच्या अगोदर नाम असतें आणि तें नाम व शब्दयोगी, आणि हा प्रत्यय मिळून विशेषण बनतें; उदा०:—घरावरचीं कौलें; डोक्यावरील पागोटें; सांबापुढला नंदी; देवळासमोरचें घर; नदीपलीकडला बाग; इत्यादि. हे शब्द वास्तविक कर्मधारय समास होत.

**१३७.** सप्तमी विभक्तीचीं रूपें हीं स्थलवाचक आणि कालवाचक अव्ययांसारखींच असतात, म्हणून त्यांना हे प्रत्यय लागून विशेषणें होतात; उदा०:—हातींचा, घरींचा, दारींचा, इ०.

**१३८.** स्थलदर्शक आणि कालदर्शक अव्ययांचा तशा अर्थाच्या नामांच्या रूपांशीं संबंध असतो; उदा०:— 'तुम्ही **पुण्यांत** कोठें राहतां?' 'तो **सकाळीं** केव्हां तुला भेटला?' 'काल **जेव्हां** तो आला, तेव्हांच त्याला भेटावयास पाहिजे होतें.' इत्यादि.

---

## अभ्यास

### १६.

१ पुढील वाक्यांतील अव्ययें सांगून त्यांच्या निरानिराळ्या जाती सांगा:— राम आणि लक्ष्मण हे दशरथाचे पुत्र होते. तूं व मी मिळून जाऊं. रामा जेव्हां असें बोलला तेव्हां तूं होतास काय? फार चांगलें बोलतां महाराज! अहाहा, चांदणें कसें स्वच्छ पडलें आहे! ईश्वर माणसाकडून वाईट वर्तन कसें करवील? हें त्यानें पोटासाठीं ढोंग केलें आहे. पूर्वी माणसाचा बळी देत, एवढेंच मला ठाऊक आहे. तूं मात्र ये. तूं पण ये. त्याला देखील येऊं द्या. तो एकटाच गेला; मी बापाबरोबर जाईन. तूं सुद्धां असेंच का म्हणतोस? मुंबईहून रत्नागिरी फार तर पन्नास कोस असेल. माझ्या संबंधानें देखील तुम्हीं त्याच्याशीं मुळींच बोलूं नका. अशी एक म्हण आहे, कीं शितावरून भाताची

परीक्षा. बिन्हाड माडीवर आहे. जेवणाची जागा खालींच आहे. कायरे, तुझें नांव फार खालीं गेलें ! अरे देवा, कोण हें संकट ! मी आज बहुधा गांवाला जाणार आहे. तुम्ही पुण्यांत कोठें राहतां हें सांगून ठेवा; बहुशा तुम्हांस भेटल्यावांचून मी जाणार नाहीं. ही गोष्ट तुम्हीं लगेच मला कशी कळविली नाहीं बरें! पागोटें किंवा टोपी चालेल; किंवा तूं रुमालच घाल कसा! मला धोतर व उपरणें दोन्हीं हवीं आहेत. असा इकडून जा. रामाकडून असलें काम कदाचित् होणार नाहीं. खात्री असूं द्या, कीं या कामांत मी यश खास मिळविणार. येऊन जाऊन तूं हें मास्तरांस सांगणार, एवढेंच कीं नाहीं ! दिवाळीची सुटी लौकरच व्हावयाची आहे. आतां लगेच जावें हें उत्तम.

२ पुढील वाक्यांतलीं शब्दयोगी अव्ययें कोणत्या विभक्तींबद्दल घातलीं आहेत हें सांगाः—विद्यासंपादनार्थ झटावें. सुखालागीं अरण्यवास पतकरला. यंदा गव्हांमध्यें आम्हांला तोटा आला. अकलेवांचून व्यर्थ. गरीबीपेक्षां मृत्यु बरा, असे उद्गार कित्येकांच्या तोंडांतून निघतात. कालपासून त्याला ताप येत आहे. हरीविषयीं माझ्याजवळ कधीं शब्द काढीत जाऊं नको. देवाठायीं भक्ति ठेवा. आमच्या आळींत प्रत्येक घरांत चोर शिरला. दशरथानें पुत्रप्राप्त्यर्थ यज्ञ केला.

३ पुढील वाक्यांतले विभक्ति-प्रत्यय काढून त्यांच्या जागीं शब्दयोगी अव्ययें घालाः—हा आपला घरीं दारीं सारखाच. मनीं वसे तें स्वप्नीं दिसे. श्रमानें मला झोंप आली नाहीं. दुष्टांची संगत करूं नये. दारिद्र्याहून मरण बरें. सुरतेहून बडोदें किती दूर आहे ! त्यानें ती कथा मुलांना कथन केली. घरीं सर्व कांहीं यथास्थित आहे. सुजेनें पाय दुखतो. सोनें वीस रुपयांनीं तोळा होतें. त्या शेतकऱ्यानें एकेक पासोडीला एक एक मण धान्य दिलें. प्रत्येक ब्राह्मणाला एकेक मोहोर देण्यास राखून ठेविली आहे.

---

## २१—वाक्य-विचार.

### १३९. वाक्यांच्या जाती व प्रकार.

(अ) पहिली जातः—'आज सारा दिवस आम्हांस सुट्टी आहे;' या वाक्यांत एकच क्रियापद आहे.

( आ ) दुसरी जातः—‘ हरी म्हणतो, कीं मी उद्यां येईन; ’ ‘ जो मनुष्य काल आला होता तो हाच आहे; ’ ‘ ज्यापेक्षां तूं खरें सांगत नाहींस, त्यापेक्षां तुझ्यावर विश्वास ठेवितां येत नाहीं. ’ या तिन्ही वाक्यांपैकीं प्रत्येकांत दोन दोन क्रियापदें आहेत. म्हणजे प्रत्येकीं दोन निराळीं वाक्येंच आहेत.

( इ ) तिसरी जातः—‘ हरीनें असें सांगितलें आणि लागलाच तो घरीं गेला; व आपलें पुस्तक उघडून अभ्यास करीत बसला. ’ ‘ देह जावो अथवा राहो, आम्हां पांडुरंगीं भावो [ आहे ]. ’ या दोन वाक्यांपैकीं पहिल्यांत तीन आणि दुसऱ्यांत दोन क्रियापदें आहेत; म्हणजे तितकीं निरनिराळीं वाक्येंच आहेत.

१४०. दुसऱ्या जातीच्या प्रत्येक वाक्यामध्यें तीन निरनिराळीं वाक्यें आहेत व त्यांमध्यें एका वाक्याचा अर्थ दुसऱ्या वाक्यांतील अर्थावर अवलंबून आहे; जसें:—‘ हरी म्हणतो; ’—काय? तर ‘ मी उद्यां जाईन; ’ इत्यादि. म्हणून यांत प्रत्येकीं एक मुख्य आणि एक गौण वाक्य आहे.

१४१. तिसऱ्या जातीच्या वाक्यांमध्यें एका वाक्याच्या पोटीं दुसरीं वाक्यें आहेत. परंतु प्रत्येक वाक्याचा अर्थ स्वतंत्र आहे. तीं एकमेकांवर अवलंबून नाहींत.

१४२. तेव्हां याप्रमाणें वाक्यें तीन जातींचीं असतात. त्यांना ( १ ) शुद्ध, ( २ ) मिश्र आणि ( ३ ) संयुक्त असें म्हणावें.

( १ ) ज्या वाक्यांत एकच उद्देश्य आणि एकच विधेय म्हणजे क्रियापद असतें, त्यास शुद्ध-वाक्य असें म्हणतात.

( २ ) ज्या वाक्यांत अनेक उद्देश्यें आणि क्रियापदें असतात, म्हणजे अनेक वाक्यें असतात, परंतु एकांत मुख्य अर्थ असून दुसरीं वाक्यें त्यावर अवलंबून असतात, त्यास मिश्र-वाक्य असें म्हणतात.

(३) ज्या वाक्यांत अनेक वाक्यें असतात; परंतु तीं परस्परांवर अवलंबून नसून त्यांतलें प्रत्येक स्वतंत्र असतें, आणि सर्व वाक्यें आणि, व, अथवा, अशा उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं असतात, त्यास संयुक्त-वाक्य असें म्हणतात.

१४३. मिश्र-वाक्यांमध्यें ज्यांत मुख्य अर्थ असतो, त्यास प्रधान-वाक्य, आणि त्यावर अवलंबून असणाऱ्या वाक्यांस **गौणवाक्यें** असें म्हणतात. उदाहरणार्थ:—'तो म्हणाला, कीं मी उद्यां येईन;' 'जो मनुष्य काल भेटला तो हाच आहे.' यांत 'तो म्हणाला' आणि 'तो हाच आहे,' हीं प्रधानवाक्यें असून, 'मी उद्यां येईन' आणि 'जो मनुष्य काल भेटला,' हीं गौणवाक्यें आहेत.

१४४. गौणवाक्यांवरून केव्हां नामाचें, केव्हां विशेषणाचें आणि केव्हां क्रियाविशेषण अव्ययाचें काम होतें; त्याप्रमाणें त्याचे (१) **नामवाक्य**, (२) **विशेषणवाक्य** आणि (३) **क्रियाविशेषणवाक्य** असे तीन प्रकार होतात. यांचीं उदाहरणें:—**नामवाक्य**—'हरी म्हणाला, कीं **मी उद्यां येईन.**' '**विद्यार्थ्यांनीं सर्वदां खेळत रहावें,** हें चांगलें नाहीं.' यांतलीं जाड अक्षरांतलीं वाक्यें **नामवाक्यें** आहेत.

टीप—हीं वाक्यें नामांसारखीं असतात; तेव्हां अर्थात् त्यांना प्रथमा व द्वितीया या विभक्तिही असतात. पहिल्या वाक्याची द्वितीया व दुसऱ्याची प्रथमा आहे, हें सहज कळेल.

**विशेषणवाक्य**—'**जो मनुष्य मला काल भेटला,** तो हाच आहे.' '**जें पुस्तक मीं तुला दिलें होतें,** तें आतां मला हवें आहे.' यांतलीं जाड अक्षरांतलीं वाक्यें **विशेषणवाक्यें** आहेत.

**क्रियाविशेषणवाक्य**—'**ज्यापेक्षां तूं खरें सांगत नाहींस,** त्यापेक्षां तुझ्यावर विश्वास ठेवितां येत नाहीं.' यांमधील जाड अक्षरांतलें वाक्य **क्रियाविशेषणवाक्य** आहे.

१४५. संयुक्तवाक्यांत असणारीं जीं निरनिराळीं स्वतंत्र वाक्यें त्यांस **सामान्यवाक्यें** असें म्हणावें.

टीप—कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग आणि भावेप्रयोग यांतील वाक्यें अनुक्रमें कर्तरि, कर्मणि आणि भावी असतात. वास्तविक पाहिलें तर या वाक्यांच्या निराळ्या प्रकारच्या जातीच आहेत. यांचा विचार पुढील प्रकरणांत केला आहे.

१४६. केव्हां पूर्णवाक्य न करितां क्रियापदाबद्दल कृदन्त घालून अर्थ आणितात. असा प्रकार गौणवाक्यांच्या संबंधानें करितात. अशा अपूर्ण वाक्यांस **वाक्यांश** असें म्हणावें. उदा०:— ' मी घरीं नसतां, तो आला; ' यांत ' मी घरीं नसतां ' हा वाक्यांश. या ठिकाणीं ' मी घरीं नव्हतों, तेव्हां तो आला; ' असें म्हणतां येईल.

( अ ) वाक्यांशानें नामाचें, विशेषणाचें अथवा क्रियाविशेषणाचें काम होतें; त्याप्रमाणें त्यास **नामवाक्यांश, विशेषणवाक्यांश** अथवा **क्रियाविशेषणवाक्यांश** असें म्हणावें; उदाहरणें:— **नामवाक्यांश**—' **बापाचें गांवाला जाणें** त्याच्या पथ्यावर पडलें.' '**असें बोलणें** तुला शोभत नाहीं.'

**विशेषणवाक्यांश**— ' **वारंवार चोरींत सांपडलेल्या** मनुष्यास काळेपाण्याची शिक्षा होते. '

**क्रियाविशेषणवाक्यांश**— ' **मी घरीं नसतां** तो आला. ' ' **अशा प्रकारचें वर्तन करून** त्यानें आपली नाचक्की करून घेतली. '

( अ ) कांहीं ठिकाणीं वाक्यामध्यें सहज समजण्यासारखे किंवा जवळच्या वाक्यांत येऊन गेलेले शब्द पुनः न घालतां अध्याहृत ठेवितात; अशा वाक्यांला **संक्षिप्तवाक्य** असें म्हणतात; जसें:—' माझे वडील घरीं आले आणि लगेच पुनः बाहेर गेले. ' यांतील दुसरें वाक्य ' माझे वडील लगेच पुनः बाहेर गेले. ' यांत ' माझे वडील, ' हे शब्द अध्याहृत असून हें वाक्य **संक्षिप्तवाक्य** आहे. आणखी उदाहरणें—' मीं फळें विकत घेतलीं आणि मुलांना वांटून दिलीं; ' ' विद्यार्थी शाळेंत जातात आणि तेथें आपले धडे करितात; ' इ०.

---

## अभ्यास

### १७.

( १ ) पुढें वाक्यें दिलीं आहेत, यांत पूर्णविरामापर्यंत एकेक वाक्य समजून शुद्ध, मिश्र, संयुक्त अशा जाती सांगा:— गरुड हा एक फार बळकट, चपळ आणि दिसण्यांत सुंदर व भव्य असा मांसाहारी पक्षी आहे. तूं जेव्हां येशील त्यावेळीं मी अगदीं तयार असेन. मांजर उंचावर चढून गेलें तरी तेथून आपल्या पुढल्या पायांवर शरीराचा तोल धरून चटदिशीं खालीं उडी मारितें.

जगांतला व्यवहार चालविण्यास विश्वास मोठा उपयोगाचा असतो. जर विश्वास नसेल, तर मोठमोठ्या व्यापाऱ्यांचा धंदा चालावयाचाच नाहीं. हा काळाकुट्ट ढग मोठा होत चालला आहे, यावरून पाऊस खास पडणार असें दिसतें. रामा घरीं आला आणि लगेच जेव्हां चालता झाला, तेव्हां कांहीं तरी महत्वाचें काम असलें पाहिजे. शाळेंतल्या प्रत्येक मुलाजवळ एक कापडी पिशवी असते, तींत तो आपली पाटी, वह्या, पुस्तकें वगैरे ठेवितो, आणि ती पिशवी गळ्यांत अडकवून शाळेस जातो. विंचू चावला असतां औषध काय करावें हें तुम्हांस ठाऊक आहे काय ? जर तें मला ठाऊक असेल तर मी तें तुला खात्रीनें सांगेन. दिल्ली हें शहर मोंगल बादशहांची राजधानी होतें. बाप जिवंत असतां त्या उधळ्या मुलाचें कांहीं चाललें नाहीं; पण बाप मेला तेव्हां त्या मुलानें आपले उनाड स्नेही जमविले आणि सर्व संपत्ति उधळून टाकिली. सूर्य उगवला कीं सर्वत्र प्रकाश पडतो; चंद्राचा प्रकाश तितका चकचकीत नसतो.

(२) वरील वाक्यांत जीं मिश्रवाक्यें असतील त्यांमधील प्रधानवाक्यें सांगा; आणि त्यांमधील गौणवाक्यें सांगून त्यांची जात सांगा.

(३) पुढील वाक्यांमधले वाक्यांश सांगून त्यांची जात सांगाः—मुलानें निरंतर खेळणें चांगलें नाहीं. उनाड मुलांना खेळणें आवडतें. गुरुजींनीं आम्हास कविता म्हणावयास सांगितलें. बापाचें गांवास जाणें त्याच्या पथ्यावर पडलें. काल टपालांतून आलेलें पत्र कोठें आहे ? गेल्या महिन्यांत पुण्यामध्यें जन्मलेल्या मुलांची संख्या तीनशें आहे. पूर्वी छापलेलीं पुस्तकें नसत, लिहिलेलीं असत. सारी रात्र जागून मीं तो धडा सर्व लिहून काढिला. पुष्कळ बोलून कार्य व्हावयाचें नाहीं. बापाची परवानगी घेऊन तो मित्राबरोबर फिरावयास गेला. मुलांना विद्या शिकविण्याचें काम करणारास पंतोजी असें म्हणतात. वाईट अक्षर लिहिणारा कारकून काय कामाचा ? पुष्कळ चालल्यानें पाय दमले. आगगाडीनें गेल्यानें खर्च कमी येईल, असें समजून मीं बैलगाडीनें जाणें पसंत केलें नाहीं. काल बोलाविलेला ब्राह्मण न आला तर आज दुसरा कोणी तरी चांगला वेद म्हणणारा ब्राह्मण बोलाव. नवीन विकत घेतलेलें पुस्तक मला फार आवडतें.

## २२—प्रयोग-विचार.

१४७. मागें सांगितलेंच आहे, कीं आपल्या बोलण्याच्या म्हणजे वाक्यांच्या तीन तऱ्हा असतात. त्या अशाः—

( १ ) आपण केव्हां **कर्ता** म्हणजे **क्रिया करणारा** यास उद्देशून बोलतों; म्हणजे वाक्यांत कर्ता हाच उद्देश असतो; अर्थात् क्रियापद कर्त्याशीं जुळेल असें असतें; म्हणजे कर्त्याचे जे लिंग, वचन, पुरुष तेच क्रियापदाचे असतात; उदाहरणार्थ,— 'विद्यार्थी पुस्तक वाचितो;' यांत क्रियापद **विद्यार्थी** याप्रमाणें आहे. **विद्यार्थी** याचें अनेकवचन केल्यास **वाचितात** असें क्रियापदाचें अनेकवचन होईल; **विद्यार्थी** याबद्दल **मी** किंवा **तूं** घातलें तर **वाचितों** अथवा **वाचितोस** असें, क्रियापदाचीं रूपें पुरुषाप्रमाणेंच बदलून, म्हणावें लागेल; आणि **विद्यार्थी** याबद्दल **मुलगी** असें घातलें तर क्रियापदाचें रूप **वाचिते** असें स्त्रीलिंगी करावें लागेल.

( २ ) आपण केव्हां **कर्माला** उद्देशून बोलतों; म्हणजे वाक्यांत **कर्मपद हें उद्देश्य** असतें; उदाहरणार्थ,— 'विद्यार्थ्यानें पुस्तक वाचिलें;' यांत आपण **पुस्तक** यास उद्देशून बोललों, व त्याप्रमाणें क्रियापद घातलें आहे. **पुस्तकें** असें घातल्यास **वाचिलीं** असें होईल. तसेंच कर्माचें लिंग बदलल्यास क्रियापदाचेंही बदलेल; उदा०:— 'विद्यार्थ्यानें **धडा केला**,' '**पुस्त्या लिहिल्या**,' इत्यादि.

( ३ ) आपण केव्हां कर्ता आणि कर्म या दोहोंसही उद्देशून न बोलतां केवळ **क्रियार्थ** म्हणजे **क्रियेचा भाव** यांस उद्देशून बोलतों; उदा०:— 'रामानें रावणास मारिलें.' या वाक्याची वास्तविक पाहिलें तर 'रामानें रावणास **मारिलेलें** आहे' म्हणजे मारण्याची क्रिया झाली आहे, अशी रचना आहे. तसेंच 'त्यां जावें,' याची रचना 'त्यां जावें [ असें आहे ].' अशी आहे.

१४८. अशा रितीनें अर्थावरून वाक्यांची रचना तीन प्रकारची होत असते. या तीन प्रकारांस प्रयोग असें म्हणतात.

(१) वाक्यांत कर्ता आणि कर्म यांचें लिंग, वचन व पुरुष यांच्या अनुरोधानें क्रियापदाची जी व्यवस्था असते, तिला प्रयोग असें म्हणतात.

(२) वाक्यांत ज्या पदार्थास उद्देशून आपण बोलतों त्याला दाखविणारा जो शब्द त्यास उद्देश्य असें म्हणावें. या उद्देश्याच्या लिंग, वचन आणि पुरुष यांप्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन आणि पुरुष असतात. उद्देश्य हें निरंतर प्रथमा विभक्तींतच असलें पाहिजे.

(३) जेव्हां वाक्यांत कर्ता उद्देश्य असतो म्हणजे कर्त्याचें लिंग, वचन आणि पुरुष यांप्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन आणि पुरुष हीं असतात, तेव्हां त्या वाक्याचा कर्तरि-प्रयोग जाणावा.

(४) जेव्हां वाक्यांत कर्म उद्देश्य असतें, म्हणजे कर्माचें लिंग, वचन आणि पुरुष यांप्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन आणि पुरुष हीं असतात, तेव्हां त्या वाक्याचा कर्मणि-प्रयोग जाणावा.

(५) जेव्हां वाक्यांत कर्त्याचें किंवा कर्माचें लिंग, वचन आणि पुरुष यांप्रमाणें क्रियापदाचें लिंग, वचन आणि पुरुष हीं नसतात, आणि क्रियापद तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं असतें, तेव्हां त्या वाक्याचा भावे-प्रयोग जाणावा.

टीप—कर्तरि-प्रयोग म्हणजे कर्त्याला जुळून क्रियापदाची रचना; कर्मणि-प्रयोग म्हणजे कर्माला जुळून क्रियापदाची रचना; भावे-प्रयोग म्हणजे क्रियापद स्वावलंबी असणें. कर्तरि, कर्मणि आणि भावे हीं संस्कृतांतलीं सप्तमीचीं रूपें आहेत. मराठींत क्रियापद अथवा प्रयोग कर्तरि, कर्मणि किंवा भावे [ भावी ] आहे असें म्हटलें असतां ते शब्द विशेषण असतात.

१४९. प्रयोगांच्या संबंधानें पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्या:—

( १ ) कर्मणिप्रयोग क्रियापद सकर्मक असेल तर मात्र होईल. कर्तरि आणि भावे-प्रयोग दोन्ही प्रकारच्या क्रियापदांवरून होतील

(२) आठ काळ व अर्थ यांपैकीं दोन्ही प्रकारचे वर्तमान-काळ, रीतिभूत, भविष्य, आज्ञार्थ आणि संकेतार्थ ह्या सहांचीं रूपें वाक्यांत असतां फक्त कर्तरिप्रयोग होतो. बाकीच्या दोहोंचीं म्हणजे भूतकाळ आणि विध्यर्थ यांचीं रूपें असतां सकर्मक क्रियापदावरून कर्मणिप्रयोग होईल किंवा भावेप्रयोग होईल.

(३) भूतकाळीं आणि विध्यर्थी सकर्मक धातूवरून कर्मणिप्रयोग केव्हां करावा आणि भावेप्रयोग केव्हां करावा, या संबंधाचे नियम असे आहेतः—

(अ) निर्जीव पदार्थवाचक नाम किंवा त्याचें सर्वनाम कर्माचे जागीं असतां कर्मणिप्रयोग होतो; जसें:—'हरीनें हें पुस्तक वाचिलें व त्यानेंच तें मला शिकविलें;' 'त्या द्वाड मुलानें एक दगड उचलला व तो पक्ष्याकडे फेंकिला;' इ०.

(आ) मनुष्यवाचक सामान्यनामें व इतर प्राणिवाचक नामें किंवा त्यांचीं सर्वनामें कर्माचे जागीं असतां कर्मणिप्रयोग किंवा भावेप्रयोग करावा; उदा०:— 'त्यानें ब्राह्मण बोलाविला किंवा ब्राह्मणास बोलाविलें;' 'रामानें पोपट पाळिला किंवा पोपटास पाळिलें; 'हरी जो मनुष्य सांगतो, तो मीं पाहिला, किंवा त्याला मीं पाहिलें;' इत्यादि.

(इ) मनुष्यवाचक विशेषनामें किंवा त्यांचीं सर्वनामें कर्माचे जागीं असतां भावेप्रयोग करावा; उदा०:—'रामानें रावणास मारिलें;' 'विठूनें हरीला बोलाविलें व त्यास गांवाला धाडिलें;' इत्यादि.

(४) अकर्मक धातूवरून भूतकाळीं कर्तरिप्रयोगच होतो; विध्यर्थी अकर्मक धातूवरून कर्तरिप्रयोग होतो, अथवा भावेप्रयोग होतो; विध्यर्थी अकर्मक धातूवरून कर्तरिप्रयोग किंवा भावेप्रयोग केव्हां करावा, याविषयींचे नियम असे आहेतः—

(अ) मूळचा कर्तृदर्शक शब्द जेव्हां मनुष्यवाचक नाम किंवा सर्वनाम असेल, तेव्हां कोणताही प्रयोग होतो; उदा०:—'हरी आज मुंबईहून यावा, किंवा त्यानें यावें;' 'माझा भाऊ आज पुण्यास असावा, किंवा त्यानें पुण्यास असावें;' इत्यादि.

टीप— या संबंधाचा भाषेचा प्रघात असा दिसतो, कीं तर्क किंवा अजमास करावयाचा असतां कर्तरिप्रयोग करितात, व कर्तव्य आहे असा अर्थ होत असतां किंवा

आज्ञा असतां भावेप्रयोग होतो; जसें:—'हरी आज मुंबईहून यावा;' 'आज पाऊस पडावा;' 'ते आज घरीं जावे किंवा असावे' (तर्क, अजमास); 'हरीनें आज मुंबईहून यावें;' मुलानें वडिलांच्या आज्ञेंत असावें' (कर्तव्य); 'त्यानें आतां घरीं जावें हें बरें' (आज्ञा); इत्यादि.

(आ) अन्य प्रकारचे शब्द कर्त्याच्या जागीं असतां कर्तरिप्रयोग होतो, उदा०:—'घोडा उधळून जावा;' 'आतां हें फळ पिकावें,' इत्यादि.

(५) संयुक्त काळांमध्यें पूर्णवर्तमान, भूतभूत, पूर्णविध्यर्थ व पूर्णभविष्य असतां त्यांमध्यें भूतकाळाचें रूप असल्यामुळें धातु सकर्मक असतां वाक्याचा प्रयोग नियमाप्रमाणें **कर्मणि** किंवा **भावे** होईल; उदा०:—'मीं ब्राह्मण बोलाविला आहे,' अथवा 'ब्राह्मणास बोलाविलें आहे,' 'मीं ब्राह्मण बोलाविला होता,' अथवा 'त्यास बोलाविलें होतें;' 'मीं ब्राह्मण बोलाविला असेल,' अथवा 'त्यास बोलाविलें असेल;' 'त्यानें ब्राह्मण बोलाविला असावा,' अथवा, 'त्यास बोलाविलें असावें;' इत्यादि.

(६) कित्येक सकर्मक धातु असे आहेत, कीं यांवरून (१) भूतकाळींही कर्तरिप्रयोगच होतो, कर्मणि होत नाहीं; किंवा (२) कर्तरि आणि कर्मणि असे दोन्ही प्रयोग विकल्पेंकरून होतात. ते धातु मुख्यतः असे आहेत:—

(अ) **पहिल्या प्रकारचे**— उमज, आंचव, ओक, खेळ, चढ, चूक, तर, पसव, प्रसव, पढ, पाव, पी, पोंच, बोल, भज, भूल, मूक, समज, लाग, वद, विसर, शीक, स्मर, म्हण (भूतकाळीं 'म्हणालों,' असें होतें तेव्हां), इत्यादि. यांस **उमज धातूचा** गण असें म्हणावें.

(आ) **दुसऱ्या प्रकारचे**— आचर, जप, जेव, थुंक, नेस, पांघर, हर, इत्यादि. यांस **आचर धातूचा** गण असें म्हणावें.

(इ) विध्यर्थ असतां हे दोन्ही प्रकारचे धातु मुख्य नियमाप्रमाणें चालतात; म्हणजे यांवरून कर्मणिप्रयोग किंवा भावेप्रयोग होतो.

(ई) **या नियमांचीं उदाहरणें-पहिल्या प्रकारचीं**— 'तूं जें सांगितलें तें मी समजलों, (किंवा) उमजलों;' 'तो डोंगर चढला;' 'हरी उदाहरण चुकला,' 'चाकर रस्ता विसरला, (किंवा) चुकला, (किंवा) भुलला;' 'मी व्याकरण शिकलों,' 'तो त्याला असें म्हणाला;' इ०.

दुसऱ्या प्रकारचीं— 'मी धर्म आचरलों' किंवा 'म्यां धर्म आच-रिला;' 'तो धोतर पांघरला' किंवा 'त्यानें धोतर पांघरलें;' 'मी द्यूतांत हजार रुपये हरलों' किंवा 'म्यां हरले;' इत्यादि.

विध्यर्थाचीं— 'लोकांनीं धर्म आचरावा;' 'मुलांनीं व्याकरण पढावें,' 'तूं ही गोष्ट कधींही न विसरावी;' 'ब्राह्मणांनीं वेद म्हणावा;' 'आपण आतां धोतर नेसावें किंवा पितांबर नेसावा आणि शाल पांघरावी;' 'तुम्हीं आपल्या मित्रांस विसरावें ना!' इत्यादि.

(उ) 'कर' धातूचीं स्नान, आंघोळ, भोजन, फराळ, हीं आणि 'धू' धातूचीं तोंड, हात, पाय, इत्यादि कर्मे असतां त्या धातूंवरून भूतकाळीं विकल्पें कर्तरि अथवा कर्मणि-प्रयोग करितात; उदा०:—'मी स्नान, आंघोळ, भोजन किंवा फराळ केलों.' अथवा 'म्यां स्नान केलें, आंघोळ केली अथवा फराळ केला;' मी तोंड (हात, पाय, इ०) धुतलों;' अथवा 'म्यां...धुतलें;' इत्यादि.

(७) कर्तरिप्रयोगांत क्रियापद सकर्मक असल्यास त्याचा भूत-काळ किंवा विध्यर्थ असणार नाहीं. तें अकर्मक असतां त्याचा भूतकाळ किंवा विध्यर्थ असूं शकेल; उदा०:— 'तो गेला;' 'हरी बसला;' 'माझा भाऊ आज गांवाहून यावा;' 'चाकर आज त्याला भेटावा;' इ०.

*टीप*—भूतकाळीं किंवा विध्यर्थीं कर्मणिप्रयोग होतो, तेव्हां चालू भाषेंत कर्मपद प्रथम पुरुषीं किंवा द्वितीय पुरुषीं नसतें. यासाठीं कर्मणिप्रयोगाचीं रूपें लहान मुलांनीं फक्त तृतीय पुरुषींच सांगावीं, हें मागें सांगितलेंच आहे. प्रथम आणि द्वितीय पुरुषीं कर्मपद आहे असे कर्मणिप्रयोग कवितेंत येतात. त्यांचीं उदाहरणें मुलांच्या योग्यतेप्रमाणें शिक्ष-कांनीं व्याकरणाच्या मोठ्या पुस्तकावरून किंवा कविता वाचतांना येतील तेव्हां सांगावीं.

(८) निरनिराळ्या प्रयोगांमध्यें वाक्यरचना कशी असावी, याविषयीं;—कर्तरिप्रयोगांत कर्तृपद प्रथमा विभक्तीमध्यें असतें आणि तेंच उद्देश्यही असतें. क्रियापद सकर्मक असल्यास वाक्यांत कर्मपद असतें, त्याची द्वितीया विभक्ति असते. कर्माची द्वितीया विभक्ति प्रथमेसारखी होईल, अथवा चतुर्थीसारखी स, ला, तें, असे प्रत्यय लागून होईल. द्वितीया प्रथमेसारखी असतां तिला 'अ-प्रत्यय

द्वितीया' आणि प्रत्यय लागून होते तेव्हां तिला 'स-प्रत्यय द्वितीया' असें म्हणावें; उदा०:—'विद्यार्थी पुस्तक वाचितो;' 'तो विठूस बोलावितो;' 'गुराखी गाई राखतो, किंवा गाईंस राखतो;' इत्यादि.

( ९ ) द्वितीया सप्रत्यय केव्हां करावी, आणि अप्रत्यय केव्हां करावी, यांविषयींचे नियम असे आहेत:—

( अ ) निर्जीव-पदार्थ-वाचक नाम किंवा त्याचें सर्वनाम कर्माचे जागीं असतां अप्रत्यय द्वितीया करावी; उदा०:—'हरी पुस्तक वाचितो;' 'गडी काम करितो;' इत्यादि.

( आ ) मनुष्यवाचक सामान्यनाम किंवा इतर प्राणिवाचक नाम किंवा त्याचें सर्वनाम कर्म असतां कोणत्याही प्रकारची द्वितीया करितां येईल; उदा०:—'तो आपला मुलगा किंवा आपल्या मुलास शाळेंत पाठवितो;' 'काल जो शिंपी बोलावीन म्हणालास, तोच किंवा त्यासच बोलाव;' 'धनगर शेळ्या किंवा शेळ्यांना राखतो;' 'यमुना मैना किंवा मैनेस पाळिते;' इत्यादि.

( इ ) मनुष्यवाचक विशेषनाम किंवा त्याबद्दल आलेलें सर्वनाम कर्म असतां द्वितीया प्रत्यय लावूनच करावी; उदा०:—'मी उद्यां विष्णूस भेटेन व त्यास बोलावीन;'

( ई ) मी व तूं हीं सर्वनामें कोणत्याही प्रकारच्या नामाबद्दल येऊन कर्माच्या जागीं घातलीं असतां सप्रत्यय द्वितीयाच करावी; उदा०:—'तो शिंपी म्हणतो कीं मलाच बोलवा;' 'हे मुला, मी तुलाच बोलावीन;' इत्यादि.

टीप—कवितेंत अशा ठिकाणीं अप्राणिवाचक नाम कर्म असतां सप्रत्यय द्वितीयाही करितात. याचीं उदाहरणें कविता वाचतांना आल्यास तीं स्पष्ट करून सांगावीं.

( १० ) कर्मणिप्रयोगांत कर्ता तृतीयान्त असतो; आणि कर्मपद उद्देश्य होतें, त्याची प्रथमा विभक्ति असतें; उदा०:—'त्यानें वडिलांची आज्ञा मानिली, त्यांही तशीच मानावी;' 'गुराख्यानें गाई राखिल्या;' 'विद्यार्थ्यानें आपले धडे केले;' 'मनुष्यांनीं देवाची भक्ति करावी;' इ०.

( ११ ) भावेप्रयोगांत कर्ता तृतीयान्त असतो, कर्मपदाची सप्रत्यय द्वितीया असते, आणि क्रियापद निरंतर तृतीय पुरुषीं,

नपुंसकलिंगीं, एकवचनीं असतें; उदा०:–'आईनें मुलीस निजविलें;' 'हरीनें आपल्या चाकरास गांवाला पाठविलें;' इत्यादि.

(१२.) 'त्वां हें काम केलें;' 'तूं पुस्तक त्याला दिलें;' 'तुम्हीं तीं पत्रें टपालांत टाकलीं काय?' हीं कर्मणिप्रयोगाचीं वाक्यें अगदीं बरोबर आहेत; परंतु भाषेंत हीं वाक्यें पुढें लिहिल्याप्रमाणेंही करण्याची चाल आहेः–'तू हें काम केलेंस;' 'तूं त्याला पुस्तक दिलेंस;' 'तुम्ही पुस्तकें दिलींत;' 'तुम्ही तीं पत्रें टपालांत टाकलींत काय?' इत्यादि.

(अ) या ठिकाणीं अशी रचना आहे, कीं क्रियापद कर्माशीं जुळून शिवाय त्याला कर्त्यांचे पुरुष आणि वचन यांचे प्रत्ययही लाविले आहेत. अशी दुहेरी रचना आहे.

(आ) आजपर्यंतची अशी चाल आहे, कीं असलीं वाक्यें चूक समजून तीं फिरवावीं आणि नीट रचना करावी. पण अशीं वाक्यें जर भाषेंत आहेत, तर त्यांना चुकीचीं ठरविणें हें योग्य नाहीं. तीं मान्य करणें हेंच रास्त आहे.

(इ) अशा वाक्यांत वास्तविक कर्मणिप्रयोग करावयाचा असून बोलणाराचा उद्देश असा असतो, कीं कर्त्याला प्राधान्य देऊन कर्तरिप्रयोगच करावा. तथापि ल-प्रत्ययान्त रूप मूळचें कर्मणि विशेषण असल्यामुळें तें लिंगाच्या व वचनाच्या संबंधानें कर्माशीं जुळतें; परंतु पुरुषाच्या संबंधानें तें कर्त्याशीं जुळून, कर्त्यांच्या वचनाप्रमाणेंही फेरफार होतात; जसें,—'तूं पत्र लिहिलेंस;' 'तुम्ही पत्र लिहिलेंत;' 'तूं पत्रें लिहिलींस;' 'तुम्ही पत्रें लिहिलींत;' इत्यादि.

(ई) अशा रचनेमध्यें कर्त्याला प्राधान्य देण्याचा बोलणाराचा उद्देश असतो, यासाठीं ह्या वाक्यांचा **कर्तरिप्रयोगच** मानावा. अशीं वाक्यें द्वितीय-पुरुषीं कर्ता असतां मात्र होतात; आणि त्यांत **तूं** आणि **तुम्ही** यांची प्रथमा विभक्तीच असते; कारण, '**त्वां** पुस्तक **दिलेंस**' असा प्रयोग होणार नांहीं. तर हें वाक्य '**त्वां** पुस्तक **दिलें**' असें, अथवा '**तूं** पुस्तक **दिलेंस**' असें करावें लागेल.

(उ) अशी रचना क्रियापद विध्यर्थीं असतांही होते; उदा०:–'तूं हें काम करावेंस;' 'तुम्ही हीं कामें करावींत;' 'तूं हें पुस्तक द्यावेंस;' तुम्ही पुस्तक द्यावेंत–पुस्तकें द्यावींत;' इत्यादि.

( ऊ ) ही रचना भाषेंत नवीन आलेली नसून जुन्या काळापासून आहे; कारण असलीं वाक्यें कवितेंत आढळतात; जसें,—'विप्रें कथिलें मज कीं वत्से लिहिलेस उत्तम श्लोक;'—मोरोपंत. 'दैन्यवेष कासयास घेतलात सांगिजे;'—कचेश्वर.

( १३ ) त्याचप्रमाणें 'आईनें मुलीला निजविलें;' हा भावेप्रयोग आहे. परंतु केव्हां यांतील क्रियापद कर्माशीं जुळेल असें घालितात, आणि 'आईनें मुलीला निजविली;' असें म्हणतात. वास्तविक रितीप्रमाणें 'मुलीला निजविलें' असें म्हणावें अथवा 'मुलगी निजविली' असें म्हणून कर्मणिप्रयोग करावा. परंतु अशीं वाक्यें बोलतांना व क्वचित् लिहितांनाही करण्याची चाल आहे, यासाठीं तीं मान्य केलीं पाहिजेत. अशा वाक्यांचा **कर्मणिप्रयोग** मानावा; मात्र यांत कर्मपदाची प्रथमा नसून द्वितीया आहे. याचीं उदाहरणें:— 'हरीनें आपल्या **चाकरास** गांवाला **धाडला**;' 'बापानें **रामाला** शाळेंत **घातला** आहे;' 'तुम्हीं आपल्या **मुलाला** कोणत्या धंद्यांत **घातलात**?' 'आम्हीं **मुलीला** कालच सासरीं **पाठविली**;' 'काय **दिनकरा, केला** कोंबड्यानें खरा;'—तुकाराम. 'चोहों भुजांनीं **आलिंगिला हरिश्चंद्रास** भगवंतें;'—श्रीधर.

टीपः—१. कळमळणें, सांजावणें, फावणें इत्यादि जीं अकर्तृक क्रियापदें त्यांचा कोणी भावकर्तरि प्रयोग समजतात. परंतु हा आणखी एक प्रयोग मानण्याची गरज नाहीं. कारण या क्रियापदांमध्येंच सर्व वाक्यांचा अर्थ पूर्ण असतो; उदाहरणार्थ, 'सांजावलें' म्हणजे 'सांज झाली,' 'सूर्य मावळला,' असा पूर्ण अर्थ झाला. यांना कर्ता नको असतो आणि कर्मही नको असतें, म्हणून हीं क्रियापदें प्रयोगव्यवस्थेंत येत नाहींत असें समजावें.

टीप—२. जुन्या व्याकरणांत कर्मकर्तरि म्हणजे ज्यांत कर्मपद कर्ता झालें आहे असा एक प्रयोग मानिला आहे, आणि 'शिपायानें अथवा शिपायाकडून चोर धरिला जातो' असें त्याचें उदाहरण देतात; परंतु कर्मकर्तरि म्हणजे कर्मणिप्रयोगच होय; यांत 'धरिला जातो' एवढें संयुक्त क्रियापद मानून कर्मणिप्रयोग करावा. अथवा 'धरिला जातो' हें संयुक्त क्रियापद मानावयाचें नसल्यास 'धरिला' हें कर्मणि विशेषण मानून 'जातो' एवढेंच क्रियापद मानावें. मग या वाक्याचा कर्तरिप्रयोग होईल.

**१५०. प्रयोजक क्रियापदांचे प्रयोग**—कर्मणिप्रयोग आणि भावेप्रयोग हे भूतकाळीं आणि विध्यर्थी होतात, असें सर्व धातूंच्या संबंधानें सांगितलें. परंतु प्रयोजक धातु असतां वर्तमान आणि भविष्यकाळींही कर्मणि आणि भावेप्रयोग होतात; यांचीं उदाहरणें:—

### वर्तमान.

| कर्तरिप्रयोग. | कर्मणिप्रयोग. |
| --- | --- |
| मी काम करवितों. | माझ्यानें अथवा मला काम करवतें. |

### भविष्य.

| | |
| --- | --- |
| मी काम करवीन. | माझ्यानें अथवा मला काम करवेल. |

**भावेप्रयोगाचीं उदाहरणें:**—माझ्यानें अथवा मला जाववतें, जाववेल, वसवतें, वसवेल, इत्यादि.

**१५१. शक्यक्रियापदें**—(अ) मूळ सकर्मक धातूचा प्रयोजक केल्यावर अकर्मक उपयोग केला असतां, अथवा मूळ अकर्मक धातू असून त्याचा प्रयोजक उपयोग भावेप्रयोग करून केला असतां विवक्षित क्रिया शक्तीचा विषय आहे असा अर्थ उत्पन्न होतो. अशा क्रियापदांस **शक्यक्रियापदें** असें म्हणण्याची चाल पडली आहे. (क० ११९, उ, ऊ, पाहा). जसें,—'माझ्यानें काम करवतें;' 'रामाच्यानें अथवा रामाला हें काम कसें करवेल?' 'माझ्यानें जाववलें तर पाहातों;' 'त्यांच्यानें तेथें उभें राहावेना;' इ०.

(आ) शक्य उपयोग असतां मूळ कर्त्याची प्रथमतः षष्ठी करून त्या रूपास तृतीयेचा प्रत्यय लावितात, अथवा मूळ कर्त्याची चतुर्थी करितात; जसें,—'**रामाच्यानें** अथवा **रामाला** हें काम करवेल;' '**त्याच्यानें** अथवा **त्याला** जाववेल तर बरें;' इत्यादि.

---

## अभ्यास

## १८.

१ पुढील वाक्यांचे प्रयोग सांगा व सर्व शब्दांचें व्याकरण कराः—

हरी बापानें सांगितलेलें काम करितो. तूं तें पुस्तक वाचिलें आहे काय? माझ्यानें त्याच्याकडे जाववलें तर मी तुझें पत्र त्यास देईन. विचारी लोक कोणतेंही काम जपून करितात. आम्हीं त्यास गांवाला धाडिला आणि आपल्या बापास घेऊन येण्यास सांगितलें. सूर्य साऱ्या सृष्टीला प्रकाशतो. आम्ही हीं पत्रें वाचूं, त्यांचीं उत्तरें लिहूं, आणि मग बाहेर जाऊं. 'करूं ये समाधान जो मूर्ख त्यांचें.' आमच्या मामानें काल आम्हांस जेवावयास बोलाविलें होतें.

तो आपल्या मित्राकडे वाचावयास गेला असेल. मीं हीं पत्रें लिहिलीं असें कशावरून समजतोस? आई मुलास जेऊं घालिते आणि थोडें पाणी पाजून पाळण्यांत निजविते. आम्हीं फराळ केला आणि मग बागेंत पुष्कळ हिंडलों. येथें पक्षी सुंदर गाणीं गात आहेत. आमच्या घरीं आज कोण मंडळी आली होती, हें तुला ठाऊक आहे काय? मला वाटतें तुला खेळायाला फार आवडतें. भात पाहिजे तर भात घ्या, परंतु यांना एकेक लाडूच वाढला पाहिजे. रामानें रावणास मारिलें. कर्ण अर्जुनानें मारिला. धृतराष्ट्राचा मुलगा दुःशासन यास भीमानें मारिलें. पूर्वीं ब्राह्मण लोक मोठाले यज्ञ करीत. मुंबई इलाख्यांत मुख्य जिल्हे एकवीस आहेत. मीं गरीबांस चार आणे दिले. मुंबईचे बिचारे मजूर, यांना पोट भरण्यासाठीं रोज पुष्कळ काम करावें लागतें. गोपाळा गुरें हांकितो पण तो घोड्याला कसा हांकील? ही शालजोडी चांगली आहे; ती तो खुशीनें घेईल. 'समयीं वीर पराक्रमातें करिती.' हरीनें धडा पाठ करावा आणि मग तो रामाला शिकवावा. आज आमचेकडे तेहेतीस ब्राह्मण जेवावयास बोलाविले आहेत. हरीं आज मुंबईहून यावा, आणि त्यानें उद्यां नगरास जावें. आज पाऊस पडावा असा अजमास आहे. 'इंद्रियांचीं दीनें, आम्ही केलों नारायणें.' हे विठोबा, तूं आजवरी संतीं विटेवरी उभा केलास. हें पत्र तूं कां लिहिलेंस? आम्हीं फराळ केला आणि तसेच गाडींतून बसून निघालों. मूल बोटाला धरून चालतें. मीं सकाळींच तोंड धुतलें आणि त्याच्याकडे गेलों. मानवानें हरीभजन कधींही न सोडावें. मला आज मुंबईस जावयाचें आहे. शिवाजी इ० सन १६८० त मरण पावला. त्याच्या पोटांत भडभडून आलें. तुम्हीं (किंवा तुम्हीं) तेथें जातां कामा नये. तो तेथें जाऊन उपयोगीं [किंवा उपयोगाचें] नाहीं. तुम्ही त्या पोराला उगाच झोडपलात. तुम्ही आज आपल्या भावास आमचेकडे धाडाल काय?

२ उमजगणांतील धातूंच्या प्रयोगाच्या संबंधानें विशेष गोष्ट कोणची आहे?

३ प्रयोजक धातूंचे वर्तमान आणि भविष्यकाळीं कर्मणिप्रयोग झाल्याचीं उदाहरणें पाटीवर लिहा.

४ सकर्मक क्रियापदांचीं वाक्यें घेऊन कर्तरिप्रयोगाचा कर्मणि अथवा भावे, कर्मणीचा कर्तरि आणि भावे, भावेचा कर्मणि, असे प्रयोग करून दाखविण्यास शिक्षकांनीं मुलांस सांगावें.

५ प्रयोजक धातूंवरून शक्य क्रियापदें कशीं होतात? यांना शक्य क्रियापदें असें कां म्हणतात?

---

## २३-कारक-विचार.

१५२. विभक्तींचीं मुख्य कारकें मागें सांगितलीं आहेत. यांच्या अनुरोधानें प्रत्येक विभक्तीचे आणखी कित्येक किरकोळ अर्थ होत असतात. हे पुष्कळच आहेत, त्यांतले मुख्य मुख्य पुढें सांगतों:—

### प्रथमा.

(१) प्रथमा विभक्तींत असणारा शब्द क्रियापदाचें उद्देश्य असतो; उदा०:—'**रामा** घरीं आहे;' '**हरी** पत्र लिहितो;' 'गोवाऱ्यानें **गाई** बांधिल्या;' '**मुलें** खेळतात;' '**विद्यार्थी** धडे करितात;' '**पक्षी** उडाले;' इत्यादि. या वाक्यांत रामा, हरी, गाई, मुलें, विद्यार्थी, पक्षी, या शब्दांची प्रथमा विभक्ति आहे.

टीप— कर्तरिप्रयोगांत कर्ता प्रथमान्त असतो. कर्मणिप्रयोगांत कर्मपद उद्देश्य म्हणजे वाक्यातलें प्रथम पद होतें. त्याची प्रथमा विभक्ति होते. हें यावरून दिसून येईलच; उदा०:— 'हरीनें पुस्तक वाचिलें;' 'म्यां पत्र लिहिलें;' 'आजाऱ्यानें थोडा भात खाल्ला;' इत्यादि.

(२) वाक्यांत कर्त्याच्याबद्दल विशेष कांहीं सांगण्यासाठीं दुसरीं नामें, सर्वनामें अथवा विशेषणें प्रथमा विभक्तीमध्यें असतात. या प्रथमेचा अर्थ उद्देश किंवा **विशेषण**; या प्रथमेला **विधानार्थी प्रथमा** असेंही म्हणण्यास चिंता नाहीं; उदा०:— 'रावण हा लंकेचा **राजा** होता;' 'तो रुपया **खोटा** निघाला;' 'गोपाळराव **कारकून** होणार;' 'तो मुलगा **हुषार** आहे;' 'माझा मित्र **रामा** हा आज गांवाहून येईल;' 'गोदी गुणी **मुलगी** निपजली;' 'ही मसलत **योग्य** वाटते;' 'दिल्लीचा बादशाहा अकबर मोठा **सुज्ञ** असे;' 'हा चांगला **शिपाई** दिसतो;' 'कोल्हा मोठा **ठक** असतो;' इत्यादि.

( ३ ) उद्देशार्थी अथवा विधानार्थी प्रथमा घालून व **अस** किंवा **हो** या क्रियापदांचा उपयोग करून ‘ असुक पदार्थ किंवा व्यक्ति असुक आहे ’ असें सांगतात; उदा०:— ‘ रामा माझा भाऊ आहे; ’ ‘ कर्ण हा अर्जुनाचा **शत्रु** होता; ’ ‘ मुंबई हें उत्तम बंदर आहे; ’ इत्यादि.

( ४ ) वजन, माप, अंतर, लांबी, रुंदी, उंची, कालमान, इत्यादिकांचें परिणाम दाखवावयाचें असतां अमुक पदार्थ **असुक** आहे, अशाच अर्थानें प्रथमेचा प्रयोग करितात; उदाहरणें०:— ‘ साखर रुपयाला चार **शेर** आहे; ’ ‘ गहूं दोन **पायली** मिळतात; ’ ‘ हें कापड वीस **वार** आहे; ’ ‘ या विहिरीची खोली दहा **वांव** असेल; ’ ‘ येथून मुंबई साठ **कोस** आहे; ’ ‘ मला आल्याला आठ **दिवस** झाले; ’ ‘ हरीचें वय एकोणीस **वर्षें** आहे; ’ इत्यादि. ही **परिमाणार्थी** प्रथमा. ही वास्तविक उद्देशार्थी प्रथमेप्रमाणेंच आहे, हें उदाहरणांवरून दिसून येईल.

टीप— क्वचित् माप वगैरे दाखविणाऱ्या शब्दापुढें भर असा शब्द घालितात. उदा०:— ‘ पुण्याह्न पर्वती मैलभर असेल; ’ ‘ वारभर कापड आणा; ’ ‘ साप वांवभर लांब होता; ’ ‘ हल्लीं लोणी रुपयास शेरभर मिळतें; ’ इत्यादि. यांत भर याचा ‘ भरेल इतकें ’ असा अर्थ असून मैलभर, शेरभर, वांवभर, इत्यादि हीं विशेषणें होत; आणि या उद्देशार्थी प्रथमाच जाणाव्या. हे कर्मधारय समास होत.

( ५ ) केव्हां प्रथमेचा संबंध ज्या क्रियावाचक शब्दाशीं असतो, तो शब्द पूर्ण क्रियापद नसून, केवळ धातुसाधित शब्द असतो. अशा वेळीं वाक्यांत पूर्ण क्रियापद नसल्यामुळें प्रथमा विभक्तींतल्या शब्दास खरोखरी कर्ता म्हणतां येत नाहीं. अशा प्रथमेस **भावीप्रथमा** असें म्हणावें; उदा०:— ‘ **मी** घरीं नसतां तो आला; ’ ‘ रामाचा **बाप** परत येऊन त्यानें रामाला परवानगी दिली; ’ ‘ अशी **स्थिति** असतां त्याला सुख कसें होईल? ’ इत्यादि.

## द्वितीया.

( १ ) क्रियापदाचें कर्मपद द्वितीया विभक्तींत असतें. द्वितीया प्रथमेसारखी असते, म्हणजे शब्दास प्रत्यय लागलेला नसतो; अथवा स, ला, ते, प्रत्यय लागून ती विभक्ति होते; उदा०:—' मी पुस्तक वाचितों; ' ' रामानें हरीस मारिलें; ' इत्यादि. या दोन प्रकारच्या विभक्तींस अनुक्रमें **अप्रत्यय** द्वितीया व **सप्रत्यय** द्वितीया अशीं नांवें द्यावीं, हें मागें सांगितलेंच आहे.

टीप—अप्रत्यय द्वितीयेचा व सप्रत्यय द्वितीयेचा उपयोग केव्हां करावा याविषयींचे नियम प्रयोगविचारांत दिले आहेत. कर्मणि प्रयोग असतां कर्मपद क्रियापदाचें उद्देश्य होतें, तें प्रथमान्त असतें हेंही मागें सांगितलेंच आहे.

( २ ) उद्देशार्थी किंवा विशेषणार्थी प्रथमेप्रमाणेंच द्वितीयाही असते; उदा०:— ' त्याला **लबाडाला** ठोकलें पाहिजे; ' ' मला **गरिबाला** बोलावाल तर पुण्य लागेल; ' ' ईश्वराचें नाम सकल **पातक** भस्म करितें; ' इत्यादि.

( ३ ) काळाचा अवधि किंवा अंतराची मर्यादा दाखविणें असतां परिमाणार्थी द्वितीया होते; उदा०:—' तो पुण्यास **एक दिवस** होता; ' ' मी चार **घटका** घरीं नव्हतों; ' ' येथून पुढें दहा **कोस** सारखें रान लागलें आहे; ' इत्यादि.

टीप—परिमाणार्थी प्रथमा आणि द्वितीया यांच्या अर्थांची तुलना करून पाहावी. साधारणतः असें म्हणतां येईल, कीं जेथें माप इत्यादि दाखविणाऱ्या शब्दांपुढें भर हा शब्द घालतां येतो, ती प्रथमा, आणि पर्यंत हें शब्दयोगी अव्यय घालतां येतें, ती द्वितीया.

( ४ ) करणें, बनविणें, नेमणें, मानणें, म्हणणें, म्हणविणें, समजणें, या आणि अशा अर्थांच्या क्रियापदांना दोन कर्मे असतात. जें काय ' नेमणें ' किंवा ' मानणें ' इत्यादि, तद्दर्शक नामाची अप्रत्यय द्वितीया असून तें क्रियापदाजवळ त्याचा भाग असें येतें, आणि ज्याला ' नेमायाचें ' इत्यादि, त्याची सप्रत्यय द्वितीया होऊन तें वाक्यांत कर्म असतें. उदा०:—' शाहूराजानें **बाजीरावास** पेशवा केलें किंवा नेमिलें; ' ' मी **रामाला** आपला मित्र समजतों किंवा मानितों; ' जर्मनीच्या रा[illegible]स बादशाहा म्हणतात; ' ' हरी

**आपल्यास** मोठा शाहाणा-म्हणवितो;' इत्यादि. यांतलीं क्रियापदाबरोबरचीं कर्मपदें यांची **उद्देशार्थी** किंवा **विधेयार्थी द्वितीया समजावी.**

टीप—कचित् अशा वाक्यांतील कर्मपदांची अप्रत्यय द्वितीया करून हीं वाक्यें करितात; जसें,—'शाहूराजा बाजीराव हा आपला पेशवा करील असें सर्वांस वाटलें;' 'मी रामा आपला मित्र समजतों;' इत्यादि.

## तृतीया.

( १ ) तृतीयेचा अर्थ करण, म्हणजे साधन; कारण या विभक्तीच्या योगानें क्रियेचें किंवा क्रिया करण्याचें किंवा होण्याचें साधन, याचा बोध होतो; उदा०:—'ईश्वर **भक्तीनें** वश होतो;' '**द्रव्यानें** सर्व मिळतें;' 'मीं **चाबुकानें** घोड्याला मारिलें;' इत्यादि. ही **करणी तृतीया.**

( २ ) कर्मणि व भावे प्रयोगांत कर्तृपद तृतीया विभक्तींत असतें; उदा०:—'**हरीनें** पुस्तक वाचिलें;' '**रामानें** रावणास मारिलें;' '**मीं** येथें बसावें हें बरें;' '**त्वां** नित्य नवा धडा शिकावा;' '**मुलांनीं** गुरूस वंदन करावें;' इत्यादि. ही **कर्तृपदार्थी तृतीया.**

( ३ ) 'शीं' हा प्रत्यय लागला असतां तृतीयेवरून सान्निध्याचा अर्थ होतो; उदा०:—'**घराशीं** घर भिडलें आहे;' 'तो **त्याच्याशीं** बोलत बसला होता;' इत्यादि.

( ४ ) परिणाम, उणेपणा, सारखेपणा किंवा तुलना दाखविण्यास तृतीया घालितात; जसें,—'साधूच्या **संगतीनें** फायदा होईल;' 'हरीण एका **डोळ्यानें** आंधळें होतें;' 'तो **पैशानें** श्रीमंत आहे, पण **गुणांनीं** चांगला नाहीं;' 'लंडन **शहराशीं** तुलना करण्यासारखें शहर पृथ्वीवर सांपडणार नाहीं;' इ०.

( ५ ) कोणाबरोबर असलेली वस्तु दाखविणें असतां 'नीं' आणि 'शीं' या दोन्ही प्रत्ययांचा एकदम उपयोग होतो; उदा०:—

'तो केवळ एका **धोतरानीशीं** बाहेर पडला;' 'राजा मोठ्या **सैन्यानीशीं** शत्रूवर चालून गेला;' इत्यादि.

टीप—'शीं' हा प्रत्यय पुढें लागल्यावर 'नी' या अक्षरावर अनुस्वार देऊं नये. कोणी 'नी' हें अक्षर 'निशीं' असें ऱ्हस्वही लिहितात.

(६) तृतीयेवरून स्थलाचा व कालाचाही बोध होतो; उदा०:—'तो कोणत्या **रस्त्यानें** गेला?' 'मी चार **घटकांनीं** तुला भेटेन;' इ०.

(७) क्रिया करण्याची रीत किंवा पद्धत दर्शविण्यास तृतीयेचा उपयोग करितात; जसें,—'तो **काटकसरीनें** खर्च करितो;' 'त्यांनीं मोठ्या **ममतेनें** आमचें रक्षण केलें;' इ०. ही **रीतिदर्शक तृतीया.**

(८) क्रियेचा हेतु, कारण अथवा प्रसंग दर्शविण्यास तृतीया घालितात; जसें,—'आपल्या **कृपेनें** माझा संभाळ झाला;' 'त्या **बातमीनें** त्यास हुषारी आली;' 'अशा **वर्तनानें** तुला मी हांकून देईन;' 'ती स्त्री **लज्जनें** जीव देईल;' '**दुष्काळानें** शेतकरी मरण्यास आले;' इत्यादि. ही **हेत्वर्थक तृतीया.**

(९) माप, प्रमाण किंवा कालावधि यांचा बोध तृतीया विभक्तीनें होतो; जसें,—'**पांचांनीं** उणें;' '**तिहींनीं** जास्त' 'तो **शेरानें** विकतो;' 'हरी माझ्यापेक्षां सहा **महिन्यांनीं** वडील आहे;' '**थेंबें थेंबें** तळें साचे;' 'हा हौद चार **घटकांनीं** भरेल;' 'तुमची परीक्षा किती **दिवसांनीं** होईल?' इ०.

## चतुर्थी.

(१) ज्याकरितां किंवा ज्याला उद्देशून क्रिया झाली असते, तद्दर्शक शब्दाची चतुर्थी असते; उदा०:—'हरीनें **रामास** पुस्तक दिलें;' 'मुलानें **बापाला** पत्र लिहिलें;' इ०. ही **संप्रदानार्थी चतुर्थी.**

(२) चतुर्थी स्थलार्थी व कालार्थी योजितात; उदा०:—'तो **गांवाला** गेला;' '**डोक्याला** पागोटें घाला;' '**पाठीला** हात लाव;' 'तो **रात्रीस** जागतो, व **दिवसास** निजतो;' इ०.

( ३ ) तुलना अथवा प्रमाण दाखविण्यास किंवा पदार्थांच्या विक्रीचा दर सांगण्यास चतुर्थी योजितात; जसें,—'**दोहोंस** जसे चार, तसे **दहांस** वीस;' 'आंबे **पैशास** आठ मिळतात;' 'बाजरीचा दर **पल्ल्यास** बारा रुपये आहे;' '**तो जशास** तसा आहे;' 'हें घर तुम्हीं केवढ्या **रकमेला** खरेदी घेतलें?' '**नळाला** जशी दमयन्ती तशी **कृष्णाला** रुक्मिणी शोभते;' इ०. ही **तुलनादर्शक चतुर्थी.**

( ४ ) शक्यक्रियापदाचें कर्तृपद जसें तृतीया विभक्तींत असतें, तसेंच तें चतुर्थी विभक्तींतही असतें; व करावयाचें, बोलावयाचें, बसतां, उठतां, इत्यादि धातुसाधितांचें कर्तृपदही चतुर्थी विभक्तींत घालितात; उदा०:— 'माझ्यानें अथवा **मला** बोलवत नाहीं;' '**त्यास** जावयाचें आहे;' '**हरीला** गुजराथी बोलतां येतें;' इ०.

( ५ ) हेतु, कारण, इत्यादि दर्शविण्यासाठीं चतुर्थी योजितात; जसें,— 'मनुष्य **कीर्तीला** जपतो;' 'रोगी **औषधास** दवाखान्यांत येतात;' '**उपासाला** दाणे आणा;' '**भुकेला** कोंडा, **निजेला** धोंडा;' '**भाजीला** एक रुपया द्या;' '**वाटखर्चीला** पांच रुपये पुरेत, पण **फराळाला** बरेंचसें द्या म्हणजे झालें!' ही **हेत्वर्थी चतुर्थी.**

( ६ ) रुचणें, वाटणें, भासणें, आवडणें, दिसणें, समजणें, येणें, शोभणें, साधणें, साजणें, सपणें, लागणें, इत्यादि इंद्रियांचेंच ज्ञान दर्शविणारे धातु, हे अकर्मक असतात; जें काय 'रुचतें' वगैरे, तद्दर्शक नाम कर्तृस्थानीं असतें, आणि ज्यास 'रुचतें' इत्यादि, त्याची चतुर्थी होते. उदा०:—'**मला** असलें बोलणें रुचत (किंवा) सपत नाहीं;' '**विष्णूला** भक्ति आवडते;' '**देवाला** सर्व दिसतें;' '**तुला** व्याकरण येतें काय?' '**विद्यार्थ्याला** आळस शोभत नाहीं;' '**तुला** हें साधलें तर पाहा;' इत्यादि. ही **कर्तृपदार्थी चतुर्थी.**

## पंचमी.

( १ ) पंचमीवरून अमक्या स्थलापासून, वस्तूपासून किंवा मनुष्यापासून अमकीकडे असा वियोगाचा बोध होतो; त्याला

**अपादान** असें म्हणतात; उदा०:— 'मी आज **मुंबईहून** आलों;' '**झाडावरून** पान पडलें;' 'तें पुस्तक त्यानें **मजपासून** घेतलें;' इ०.

( २ ) कचित् कर्तृपदार्थी पंचमी होते; उदाहरण:—'**माझ्याकडून** अथवा **माझ्यापासून** हातांतली आंगठी हरवली.' म्हणजें 'म्यां आंगठी हरवली;' इ०.

( ३ ) तुलना करण्यास अथवा भिन्नपणा दाखविण्यास पंचमी घालितात; जसें,—'रामा **हरीहून** हुषार आहे;' '**दगडाहून** वीट मऊ;' '**तापीनदीपेक्षां** गंगानदी फार मोठी आहे;' इ०.

टीप १—अशा ठिकाणीं हुषार, श्रेष्ठ, मऊ, कठीण, उंच, ठेंगणा, अन्य, वेगळा, निराळा, भिन्न, दुसरा, मोठा, लहान, इत्यादि विशेषणांचा उपयोग असतो.

टीप २—तुलना करितांना दोन वस्तूंची स्पष्ट तुलना असतां पंचमी घालावी. परंतु पुष्कळ वस्तूंतून एकीचाच अधिक–उणेपणा दाखविण्यास सप्तमी घालावी; जसें,—'रामा आपल्या वर्गांतील बाकीच्या मुलांहून हुषार आहे;' अथवा 'रामा आपल्या वर्गांतील सर्व मुलांत हुषार आहे;' पण 'रामा आपल्या वर्गांतील सर्व मुलांहून उंच आहे,' हें वाक्य बरोबर नाहीं; कारण सर्व मुलांमध्यें रामाही येतोच.

( ४ ) कालाची मर्यादा किंवा स्थलाचें अंतर दाखविणें असतां जेथून मोजावयाचें त्याची पंचमी होते; जसें–,'**मुंबईहून** काशी चारशें कोस आहे;' '**कालपासून** मला बरें वाटत नाहीं;' 'गेल्या **वर्षापासून** त्याची प्रकृति सुधारली;' इ०

## षष्ठी.

( १ ) षष्ठी विभक्तीवरून स्वामित्वाचा बोध होतो; उदा०:—'**माझें** घर;' '**त्याचा** मुलगा;' '**हरीचा** चाकर;' इ०. षष्ठीचा अर्थ संबंध असतो, व तो **अमक्या वस्तूकडे**, असें सांगण्याची चाल आहे.

( २ ) या विभक्तीवरून पदार्थ अमक्या द्रव्याचा केला आहे, किंवा त्याचा अमुक उपयोग आहे, असा बोध होतो; उदा०:—

'लोखंडाची कांब;' 'बरूची लेखणी;' 'खाण्याचा पदार्थ;' 'विक्रीचा जिन्नस;' इत्यादि.

(३) केव्हां षष्ठीचा उपयोग कालार्थी करितात; उदा०:— 'तो रात्रीचा जागतो, आणि दिवसाचा निजतो;' इ०.

(४) केव्हां षष्ठीवरून आंगच्या गुणाचा बोध होतो; उदा०:— 'मनाचा मोकळा;' 'झाडाचा गरीब;' इ०.

टीप—इतर विभक्तींप्रमाणें षष्ठी विभक्तीचा संबंध क्रियापदाशीं नसतो; अन्य शब्दाशीं असतो. तथापि क्वचित् क्रियापदाशीं संबंध असतो; उदा०:—('तो रात्रीचा जागतो.') पण तेथें त्या शब्दाचा उपयोग क्रियाविशेषणासारखा असतो, यामुळें तो संबंध केवळ क्रियापदाशीं नव्हे असेंच म्हणावें लागेल.

## सप्तमी.

(१) सप्तमी विभक्तीवरून स्थलाचा बोध होतो; म्हणून तिचा अर्थ अधिकरण; उदा०:— 'माझा बाप घरीं आहे;' 'चाकर गांवीं गेला;' 'झाडाखालीं गुरें विश्रांति घेतात;' 'झाडावर पक्षी गातात;' इ०.

(२) कोठें सप्तमीवरून कालाचा बोध होतो; उदा०:— 'तो रात्रीं आला;' 'या वर्षी पाऊस चांगला पडला;' 'एके दिवशीं;' 'आज रोजीं;' 'रविवारीं सुटी असते;' इ०.

(३) हुषार, निपुण, चपळ, अशा प्रकारचे गुण दाखविणें असतां ज्या गोष्टीच्या संबंधानें गुण दाखवावयाचे तद्दर्शक नामाची सप्तमी घालितात; जसें,—'विद्येंत हुषार;' 'युद्धकलेंत निपुण;' 'धांवण्यांत चपळ;' इ०.

टीप—विभक्ति प्रत्यय लागून होतात व शब्दयोगी अव्ययें लागूनही होतात. कोणत्याही रितीनें विभक्ति झाली असली तरी अर्थाच्या संबंधानें दोन्ही प्रकारच्या विभक्ति सारख्याच जाणाव्या; उदा०:—घरीं, घरांत, घरामध्यें, यांत घरीं येथें प्रत्यय लागला आहे; व पुढील दोन उदाहरणांत 'आंत' व 'मध्यें' हीं अव्ययें लागलीं आहेत. तसेंच 'भुकेनें प्राण व्याकुळ झाले' व 'भुकेमुळें प्राण व्याकुळ झाले,' या दोन वाक्यांत 'भुकेनें' आणि 'भुकेमुळें' यांचा अर्थ एकच.

## अभ्यास

### १९.

( १ ) पुढील वाक्यांतल्या विभक्ति व त्यांचे अर्थ सांगाः– रामा आणि हरी गांवाला जातात. तो तापट ब्राह्मण आहे. पंतोजी वर्गांत असून मुलांनीं दंगा चालविला आहे. दोन तोळे सोन्यास पांच हात जमीन मिळेल. पांच मिनिटें गाडी थांबते. खंडाळ्याहून कर्जतपर्यंत पांच सात कोस सारखे बोगदे आहेत. द्रव्यानें सर्व कांहीं मिळतें. हरीण एका डोळ्यानें आंधळें होतें. परमेश्वराच्या कृपेनें सर्वांचा सांभाळ होईल. माझ्या मतें त्वां आज न जावें. तो एका वस्त्रानें ( किंवा ) वस्त्रानिशीं बाहेर पडला. आपल्या वाटेनें जा कसा ! माझ्यानें हें काम होत नाहीं. तो ब्राह्मणास गाय देतो. पांचांस जसे चार तसे दहांस आठ. भाषांतर शब्दास शब्द पाहिजे. दिवसास खेळावें. डोकीस टोपी घाल. मुलांना खाऊ आण. भुकेला कोंडा व निजेला धोंडा. विष्णूस पन्नास रुपये मिळतात. मला दोन भाऊ व एक बहीण आहे. तूं जिवास मुकशील. भाकर म्हणून जो पिठाचा पदार्थ करितात, तो खावयास चांगला असतो. देवाला सर्व दिसतें. मला व्याकरण येतें. हिमालयांतून गंगा नदी निघते. दगडाहून वीट मऊ. माझें पुण्याला एक घर आहे, व कोंकणांत एक झोंपडें आहे. तो रात्रीस जागतो व दिवसाचा निजतो. तोंडीं नको, लेखी पाहिजे. भाऊ पायीं चालत आला. हरी सुतारकामांत हुषार आहे. प्राण्यांत मनुष्य श्रेष्ठ आहे. 'सुखालागीं आरण्य सेवीत जावें.' द्रव्य हें पुरुषार्थाचें साधन आहे. रामाला मी आपला वारस समजतों. हा भिकारी पायानें लंगडा आहे. आई ममतेनें मुलांस खाऊं घालिते. या बातमीनें मला आनंद झाला. सुरतेस धान्यें वजनानें विकतात. हा घोडा तुम्हीं केवढ्यास घेतला ? मला मुलांना पुस्तकें बक्षीस द्यावयाचीं आहेत. दुष्टाचें मन दगडाहून कठीण असतें. पुणें येथें रामराव म्हणून एक गृहस्थ राहात असे; त्याला हरी नांवाचा मुलगा होता, व त्याचा विठ्ठलपंत या नांवानें एक प्रख्यात असा भाऊ होता. त्यास बापानें एकदां चार रुपयें दिले, ते त्यानें गरिबांस देऊन टाकिले. त्यामुळें त्यास पुण्याची प्राप्ति होऊन तो ईश्वराच्या कृपेस पात्र झाला. पण त्याचा बाप त्याचेवर रागें भरला. 'नेला असेल जरि बाळ महीतळीं तो, ओढून काढिन बळें स्वकरें गडी तो.' 'भूगोल हा उलथितां मज नाहिं वेळू.'

( २ ) पुढें लिहिल्याप्रमाणें विभक्तींचे अर्थ सांगाः—

उद्देशार्थी प्रथमा. भावी प्रथमा. परिमाणार्थी द्वितीया. कालार्थी तृतीया, चतुर्थी, षष्ठी, सप्तमी. स्थलार्थी तृतीया, चतुर्थी, षष्ठी, सप्तमी. कर्तृपदार्थी प्रथमा, तृतीया, चतुर्थी आणि पंचमी. हेत्वर्थी तृतीया व चतुर्थी इत्यादि.

---

## २४-वाक्यांतील शब्दरचना.

१५३. प्रत्येक वाक्यांत उद्देश्य आणि विधेय किंवा क्रियापद, हीं असलीं पाहिजेत. क्रियापद सकर्मक असल्यास कर्म पाहिजे. त्याचप्रमाणें कर्ताही वाक्यांत असला पाहिजे. तथापि हे शब्द वाक्याच्या अर्थावरून जेव्हां सहज समजण्यासारखे असतात तेव्हां ते पुष्कळदां गुप्त म्हणजे अध्याहृत असतात. यांचीं उदाहरणें:—

( अ ) क्रियापद अध्याहृत—'स्नान, संध्या, टिळे, माळा,' पोटीं क्रोधाचा उमाळा;' 'नेहमीं खरें बोलणें हें चांगलें, खोटें बोलणें फार वाईट;' इ०.

( आ ) कर्ता अध्याहृत—'असें म्हणतात, कीं पूर्वी पर्वतांस पंख होते;' येथें म्हणतात कोण, तर 'लोक.'

( इ ) संबंधीसर्वनाम येऊन पुढें दर्शकसर्वनाम यावयाचें असतां संबंधीसर्वनाम गुप्त असतें; जसें,—'गर्जेल तो पडेल काय!' 'करील तो भरील;' इत्यादि.

१५४. कर्मणिप्रयोगांत कर्तृदर्शक पद पुष्कळदां गुप्त असतें; जसें,—'पानें वाढलीं, आतां मंडळीनें जेवावयास चलावें;' 'आर्जव केलें असतां कोणीही वळेल;' इत्यादि.

टीप—कर्मपद कधीं अध्याहृत नसतें.

१५५. विधेयामध्यें विशेषण किंवा नाम असून 'अस' धातूचें क्रियापद असलें म्हणजे क्रियापद अध्याहृत असतें; जसें,—'सर्वांत

रामा जास्त बुद्धिवान्; हरी सुद्धां हुशार खरा, पण त्याच्यामध्यें उद्योगीपणा कमी;' इत्यादि.

१५६. वाक्यांत उद्देश्य, विधेय आणि कर्मपद यांच्याबरोबर निरनिराळे शब्द येऊन त्यांचा **विस्तार** होतो. **उद्देश्य** आणि **कर्मपद** यांचा विस्तार विशेषण, दुसरें नाम अथवा त्याबरोबर येणारा विभक्तियुक्त शब्द, विशेषणवाक्य अथवा वाक्यांश, यांच्या योगानें होतो. याचीं उदाहरणें:—

**उद्देश्य**—'ज्याविषयीं मीं तुला काल सांगितलें, तो गृहस्थ आज मजकडे येईल;' 'दुखण्यांतून उठलेला मनुष्य जपून वागतो;' इत्यादि. **कर्म**—'हरी तुला आपलें बक्षीस मिळालेलें पुस्तक देईल;' 'ज्याची माझी गट्टी जमली आहे तो माझा नवा मित्र मी तुला दाखवीन;' इ०.

(अ) **विधेयाचा** विस्तार क्रियाविशेषण अव्यय आणि विभक्तियुक्त शब्द यांच्या योगानें होतो; उदा०:—'हरी **घर** आहे.' 'मी **घरांत** वाचीत बसलों होतों;' 'पक्षी **आकाशांत फार उंच** उडतात;' इ०.

*टीप—१. अशा प्रकारच्या विस्तारांना अनुक्रमें. उद्देश्य-विस्तार, कर्मपद-विस्तार आणि विधेय-विस्तार, अशीं नांवें द्यावीं.*

टीप—२. प्रथमा आणि द्वितीया या विभक्तींच्या रूपांखेरीज सर्व विभक्तिरूपें अव्ययांसारखीं आहेत, म्हणून तीं विधेयविस्तार होत. तसेंच कर्मणि आणि भावे प्रयोगांत कर्तृदर्शक शब्दांची तृतीया विभक्ति असते, आणि क्रियापद त्याच्याशीं जुळून नसतें, तेव्हां कर्तृपदही विधेयविस्तारामध्येंच गणावें.

(आ) 'अस' धातूचें क्रियापद असून त्याबरोबर विधिविशेषण किंवा नाम वगैरे आलें असतां त्यास **विधेय—विस्तार** म्हणतां येणार नाहीं. तीं विधेयाचा भाग असतात. कारण केवळ 'अस' धातूचें क्रियापद विधेय होणार नाहीं; उदा०:— 'रामा त्याचा **भाऊ** आहे;' 'मनी अभ्यासांत **हुषार** आहे;' इ०.

( इ ) णार-प्रत्ययान्त धातुसाधित विशेषण हें विधेयाबरोबर असून विधेय अध्याहृत असतें, तेव्हां क्रिया खचीत होणार असा अर्थ असतो; उदा०:—‘ मी उद्यां मुंबईस जाणार; ’ ‘ तो यंदां परीक्षेंत पास होणार; ’ इ०.

१५७. वाक्यांत येणारे जे निरनिराळे शब्द, ते अमुक अनुक्रमानें योजावे असा कांहीं ठरींव नियम नाहीं; तथापि शब्द विभक्तींच्या अनुक्रमानें योजावे आणि कोणत्याही शब्दाशीं निकट संबंध ठेवणारे शब्द त्याच्याजवळ असावे; कर्ता [ अथवा उद्देश्य ] त्याच्या परिवारासह वाक्याच्या आरंभीं यावा व कर्मपद त्याच्या परिवारासह वाक्याच्या मध्यभागीं, आणि क्रियापद परिवारासह शेवटीं, अशी व्यवस्था साधारणपणें ठेवावी, म्हणजे वाक्य व्यवस्थित होईल; उदा०:— ‘ हरीचा थोरला आणि पुष्कळ पगार मिळविणारा भाऊ गोविंदराव हा हरीला दरमहा खर्चासाठीं कांहीं रुपये पोस्टांतून मनीआर्डर करून पाठवितो; ’ ‘ माझा धाकटा भाऊ व्यंकटेश हा पुण्यास इंग्रजी शाळेंत शिकावयास असतो; ’ ‘ माझा परम मित्र गोविंदा हा माझें पत्र पाहतांच गांवाहून तावडतोब निघून मला भेटण्यासाठीं आला; ’ इ०.

१५८. वाक्यांत शब्द अमुकच ठिकाणीं असावे अशी ठरींव व्यवस्था राहात नाहीं; अर्थाच्या धोरणानें शब्द मागें पुढें योजितात. वाक्यांत ज्या शब्दांस महत्व देणें असेल, ते वाक्याचे आरंभीं अथवा क्रियापदाच्या जवळ येतात; उदा०:– ‘ **त्याला** हें पुस्तक मीं काल दिलें;’ ‘मीं हें पुस्तक काल **त्याला** दिलें;’ इ०.

१५९. ( अ ) वाक्यांत क्रियापदाचीं एकापेक्षां जास्त उद्देश्यें ‘ आणि ’ या अन्ययानें जोडलेलीं असतां क्रियापद अनेकवचनी असतें; उदा०:–‘राम आणि लक्ष्मण वनास गेले;’ ‘धर्म, भीम आणि अर्जुन कुंतीचे पुत्र होते; ’ इ०.

(आ) उद्देश्यपदें **अथवा, किंवा**, यांनीं जोडलेलीं असतां क्रियापद एकवचनीच असावें; उदा०:–'हरी किंवा विष्णू येईल;' 'मीं पाटी किंवा वही घेतली;' इ०.

(इ) वाक्यांत क्रियापदाचीं निरनिराळ्या लिंगांचीं उद्देश्यें '**आणि**' या अन्ययानें जोडिलीं असतां क्रियापद नपुंसकलिंगी अनेकवचनी असावें; जसें,— 'मुलगे आणि मुली वर्गांत एकत्र बसलीं;' 'हरी, मनी आणि तें पोर सकाळीं आलीं;' 'त्याच्यापासून मीं पाटी, कागद आणि पुस्तकें घेतलीं;' इत्यादि.

(ई) क्रियापदाचीं अनेक उद्देश्यें असतां क्रियापद पुष्कळदां त्याच्याजवळ असलेल्या उद्देश्याशीं जुळेल असें असतें; उदा०:— 'हरी, माधव आणि मनी आली;' 'तेथें विष्णु, सदाशिव किंवा त्याची बहीण बसली आहे;' 'मीं त्यास लेखण्या किंवा पुस्तक दिलें;' इ०.

(उ) केव्हां क्रियापदाचीं अनेक उद्देश्यें असून, वाक्यार्थाच्या स्पष्टपणासाठीं बोलणारा प्रत्येक उद्देश्य व क्रियापद निरनिराळें घेतलें आहे असें समजतो; अशा स्थळीं क्रियापद एकवचनीच घातलेलें असतें; उदा०:—'उद्यां शाई, पुस्त्यांची वही व लेखणी प्रत्येकानें आणावी;' 'तुला मीं तुझी वही, पाटी आणि पुस्तक दिलें ना?' इ०.

(ऊ) क्रियापदाचीं अनेक उद्देश्यें 'आणि' यानें जोडलेलीं असतां त्या सर्वांपुढें 'हा' किंवा 'असा' याचें रूप घालितात. हें रूप लिंग आणि वचन यांसंबंधानें क्रियापदाचें रूप उद्देश्याशीं जुळण्याचे जे नियम मागें सांगितले आहेत, त्याप्रमाणेंच असतें; आणि मग क्रियापद त्याच्याशीं जुळतें; उदा०:— 'रामा, हरी आणि विष्णु हे (किंवा असे) येतील;' 'मुलगे आणि मुली अशीं वर्गांत एकत्र बसलीं होतीं;' 'हरी, मनी आणि तें पोर हीं (किंवा अशीं) सकाळीं आलीं;' इत्यादि.

१६०. वाक्यांत उद्देश्यपद आणि कर्मपद पुढील जातींचे शब्द असतात;—नामें, सर्वनामें, विशेषणें, नामवाक्य आणि नामवाक्यांश; उदाहरणें:—

(१) उद्देश्य—विद्यार्थी अभ्यास करितात. —नाम.
शहाणा उद्योगी असतो. —विशेषण.
तो नित्य शाळेस जातो. —सर्वनाम.
मुलांनीं नित्य फिरावयास जावें (हें) चांगलें आहे. तुमचे मुलगे मन लावून अभ्यास करितात हें त्यांस भूषण आहे. —नामवाक्यें.
फिरावयास जाणें आरोग्यास चांगलें आहे. —नामवाक्यांश.

टीप—उद्देश्य हें नामवाक्य अथवा नामवाक्यांश असतां त्याच्या पुढें बहुधा 'हें' असें सर्वनाम घालितात.

(२) कर्मपद—तो काम करितो. —नाम.
एकाद्या शहाण्यास बोलाव. —विशेषण.
तो त्यास बोलावील. —सर्वनाम.
तो लबाड आहे हें मी जाणतों. —नामवाक्य.
त्यांचें मुंबईस जाणें मी पसंत करितों. —नामवाक्यांश.

---

## अभ्यास

## २०.

१ पुढील वाक्यें नीट जुळलेलीं नसल्यास जुळवून लिहा:—

आपल्या मुलगा तो हुषार असतो पहिला वर्गांत. रात्रीं गेल्यावर काल गांवाला माझा बाप मीं धडा केला आपला. गृहस्थ दिसतो तो श्रीमंत फार, मुलाला पाठविलें आपल्या गांवाला त्यानें. देऊं तुला हें चूक काय मी रे! बोलून तूं करशील असें घेशील बापाचें तर बरें. सत्य आवडतें परमेश्वराला; पाप खोटें बोलणें मोठें आहे. करावा पुस्तकावर देऊन लक्ष अभ्यास. मग दाखवावा धडा म्हणून पाठ शिक्षकास वर्गांत. शब्द जेथच्या घालून तेथें. लिहा हीं जुळवून वाक्यें पुन्हां पाटीवर.

२ पुढील वाक्यांतील उद्देश्यपदें व क्रियापदें हीं परस्परांशीं नीट जुळलीं नसल्यास जुळवून लिहाः—रामा व विठू गांवाहून आला. गोविंदा अथवा विठू आले तरी चालेल. कृष्णी, मनी आणि वामन हे भावंडें आहेत. रामा व कृष्णी आले; पण सदू व भाऊ अशीं यावयाचे आहेत. तांदूळ आणि डाळी हे येथें मिळतात; पण तूप आणि गूळ असें मिळत नाहींत. हिमालय, सह्याद्रि व पर्वती हे डोंगराचीं नांवें आहेत. राम आणि सीता वनवासास गेली. सुरी, चाकू, खिळा, कातरी अशीं त्या मुलांनीं खेळावयास घेतल्या. पाट आणि खुर्ची बसावयास उपयोगी पडते. आपण आजच मुंबईस जातील काय ?

३ पुढें लिहिल्याप्रमाणें वाक्यें तयार करून पाटीवर लिहाः—

( अ ) विशेषण उद्देश्य;—कर्म.

( आ ) नामवाक्य उद्देश्य;—कर्म.

( इ ) नामवाक्यांश उद्देश्य;—कर्म.

४ सांगणें, समजणें, नेमणें, देणें आणि शिकविणें या क्रियापदांचा द्वितीयेमध्यें आणि चतुर्थीमध्यें अशीं कर्में घालून उपयोग करा.

५ पुढील वाक्यांतील विशेषणात्मक आणि साधीं कर्मपदें सांगाः—

वैद्य औषध देऊन रोग्यास बरा करील. बापानें मुलास शहाणा करून त्यास व्यापारांत घातलें. त्या गुराख्यास मीं पुष्कळदां गुरांना मारतांना पाहिलें आहे. कोणाला उगाच मूर्ख म्हणूं नये. मी उद्यां रामास जेवावयास बोलावीन आणि त्याला त्या कामासाठीं मुंबईस जावयास सांगेन. तो आपल्याला मोठा शहाणा म्हणवितो [ अथवा समजतो ].

---

## २५—वाक्य-परिच्छेद.*

**१६१. वाक्यपरिच्छेद** म्हणजे एकादें वाक्य घेऊन त्याचे निरनिराळे भाग आणि त्यांचा परस्परसंबंध व्यवस्थित रितीनें सांगणें.

टीपः—वाक्यपरिच्छेदाच्या संबंधाच्या सर्व गोष्टी मागें ठिकठिकाणीं सांगितल्याच आहेत. त्यांची एकवार उजळणी करून मग हा भाग शिकवावा. त्या मुख्य गोष्टी अशा आहेतः—

---

* वाक्यपरिच्छेदाच्या संबंधाची माहिती मागें ठिकठिकाणीं आली आहे. पांचव्या इयत्तेतील मुलांस सोप्या आणि लहान लहान वाक्यांचा वाक्यपरिच्छेद शिकवावा. हें त्या विषयावरचें स्वतंत्र प्रकरण सहाव्या इयत्तेस शिकवावें.

( १ ) वाक्यांच्या तीन जाती--शुद्धवाक्य,मिश्रवाक्य,संयुक्तवाक्य.

( २ ) दोन प्रकारचीं वाक्यें--प्रधानवाक्य, गौणवाक्य.

( ३ ) गौणवाक्याचे प्रकार-नामवाक्य, विशेषणवाक्य, क्रिया-विशेषणवाक्य. तसेच तीन तऱ्हेचे वाक्यांश.

( ४ ) संयुक्त वाक्यांत एकमेकांशीं जुळून असलेलीं स्वतंत्र वाक्यें; यांस समानवाक्यें असें म्हणतात.

( ५ ) वाक्याचे दोन भाग--उद्देश्यांग, विधेयांग.

( ६ ) उद्देश्यांगांत उद्देश्य मुख्य--हें नाम अथवा नामसदृश शब्द, नामवाक्य किंवा नामवाक्यांश असतें.

( ७ ) उद्देश्याचा विस्तार--हा उद्देशार्थी शब्द, विशेषणें आणि विशेषणवाक्य यांच्या योगानें होतो.

( ८ ) विधेयांगामध्यें विधेय म्हणजे क्रियापद मुख्य असतें. ' अस ' धातूचें क्रियापद असतां विशेषणें अथवा उद्देशार्थी नामें हीं विधेयांत येतात.

( ९ ) क्रियापद सकर्मक असतां विधेयाला कर्म असतें. हें नाम, नामसदृश शब्द, नामवाक्य अथवा नामवाक्यांश असतें. उद्देश्या-प्रमाणेंच कर्मपदाचा विस्तार होतो.

( १० ) विधेयविस्तार क्रियाविशेषण अव्ययें, क्रियाविशेषण अव्यय-वाक्य किंवा वाक्यांश, यांच्या योगानें होतो. ( याप्रमाणें मागें आलेल्या सर्व गोष्टींवर एकवार प्रश्न करून आणि त्या गोष्टी ताज्या करून घेऊन मग पुढील गोष्टींना आरंभ करावा. )

१६२. प्रथमतः वाक्य घेऊन तें शुद्ध, मिश्र किंवा संयुक्त आहे हें पहावें. वाक्य मिश्र किंवा संयुक्त असल्यास त्यांतलीं निरनिराळीं वाक्यें सांगून गौण वाक्यांच्या जाती आणि संबंध सांगावे. मग

एकेक वाक्य घेऊन त्याचे उद्देश्यांग आणि विधेयांग असे भाग करावे. उद्देश्यांगामध्यें उद्देश्य आणि उद्देश्यविस्तार हीं सांगावीं. विधेयांगामध्यें विधेय, कर्म (यांस ‘विधेयपूरक’ असेंही म्हणतात,) आणि विधेयविस्तार हीं सांगावीं. हें सर्व लिहून दाखविणें झाल्यास व्यवस्थितपणें कोष्टक तयार करून लिहावें.

१६३. आतां कांहीं वाक्यें घेऊन वाक्यपरिच्छेद करून दाखवितों:—

(१) “मोठा पक्षी आपलें सुंदर घरटें उंच वृक्षावर मोठ्या काळजीनें अगदीं एकीकडे बांधितो.”

[ हें शुद्ध वाक्य आहे. यांत एक उद्देश्य आणि एकच विधेय आहे. ]

उद्देश्यांग { उद्देश्य–पक्षी<br>उद्देश्यविस्तार–मोठा

विधेयांग { विधेय–बांधितो<br>कर्म–आपलें सुंदर घरटें

[ विधेयविस्तार ] { स्थलदर्शक–उंच वृक्षावर<br>स्थलदर्शक–अगदीं एकीकडे<br>रीतिदर्शक–मोठ्या काळजीनें.

(२) ह्याच वाक्यपरिच्छेद कोष्टकामध्यें:—

| वाक्य | उद्देश्यांग | | विधेयविस्तार | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
| १ | पक्षी | मोठा | बांधितो | आपलें सुंदर घरटें | उंच वृक्षावर (स्थल)<br>अगदीं एकीकडे (स्थल)<br>मोठ्या काळजीनें (रीत) |

(२)—शुद्ध वाक्यें:—

(१)—आमची गाय कुरणांत फिरून गवत खाते.

(२)—मुलांनीं आपल्या पुस्त्या लिहिल्या.

(३)—सूर्य ढगांमध्यें दिसेनासा होऊन मावळला.
(४)—त्याचा भाऊ त्यास खाऊला पैसे देईल.
(५)—औरंगजेब हा प्रबळ बादशाहा होऊन गेला.
(६)—आमच्या गड्यानें आपलें काम करून टाकिलें.
(७)—चांगले विद्यार्थी रोज सकाळीं लौकर उठून आपले धडे मन लावून करितात.

| वाक्यांक | उद्देश्यांग | | विधेयांग | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
| १ | गाय | आमची | खाते | गवत | कुरणांत फिरून ( रीत ) |
| २ | पुस्त्या | आपल्या | लिहि-ल्या | | मुलांनीं ( कर्ता ) |
| ३ | सूर्य | | माव-ळला | | ढगांमध्यें दिसेनासा होऊन ( रीत ) |
| ४ | भाऊ | त्याचा | देईल | पैसे | त्यास ( संप्रदान ) खाऊला ( कारण ) |
| ५ | औरंगजेब | हा | गेला | | प्रबळ बादशाहा होऊन (रीत) |
| ६ | काम | आपलें | टाकिलें | | आमच्या गड्यानें ( कर्ता ) करून ( रीत ) |
| ७ | विद्यार्थी | चांगले | करि-तात | आपले धडे | रोज सकाळीं ( काळ ) लौकर उठून, मन लावून (रीत) |

(३) मिश्रवाक्य—" (१) मी असें ऐकतों कीं, (२) हरीच्या बापानें त्यास पुस्तकें घेण्यासाठीं जे पैसे दिले (३) ते सर्व त्यानें काल स्नेही मंडळी जमल्यावर (४) जुगारांत घालविले."

[ यांत चार वाक्यें आहेत. पहिलें प्रधानवाक्य; दुसरें, तिसरें आणि चौथें मिळून मिश्र नामवाक्य* असून तें पहिल्याचें कर्म; २, ३, ४, यांत चौथें प्रधानवाक्य; दुसरें हें विशेषण गौणवाक्य आणि तिसरें हें क्रियाविशेषण गौणवाक्य आहे. ]

| वाक्यांक | उद्देश्यांग | | विधेयांग | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
| १ | मी | | ऐकतों | असें | |
| २ | पैसे | जे | दिले | पुस्तकें | हरीच्या बापानें (कर्ता)<br>त्यास (संप्रदान)<br>घेण्यासाठीं (कारण) |
| ३ | मंडळी | स्नेही | जमली | | काल (कालदर्शक) |
| ४ | ते | सर्व | घाल-विले | | (१) त्यानें (कर्ता)<br>(२) यावर (काळ)<br>(३) जुगारांत (कारणदर्शक) |

(४) मिश्रवाक्य—"गाई गृहाशि आल्या, मावळला रविहि कच न आढळला; तेव्हां सोडुनि धृतिनग शुक्रसुताबुद्धिभूमिला,

* गौणवाक्य अथवा समानवाक्य हें पुष्कळदां एकच वाक्य नसून तें मिश्रवाक्य अथवा संयुक्तवाक्य असतें; हें उदाहरणांवरून दिसून येईल.

ढळला." [यांत निरनिराळीं वाक्यें आहेत तीं अशीं:-( १ ) गाई गृहाशि आल्या; ( २ ) मावळला रविहि; ( ३ ) कच न आढळला; ( ४ ) तेव्हां सोडुनि धृतिनग शुक्रसुताबुद्धिभूमिला ढळला ]. यांत ( ४ ) हें प्रधानवाक्य; आणि ( १ ) ( २ ) ( ३ ) मिळून एक संयुक्तवाक्य असून तें ( ४ ) चें क्रियाविशेषण गौणवाक्य आहे.

| वाक्यांक | उद्देश्यांग | | विधेयांग | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
| १ | गाई | | आल्या | | गृहाशि [ स्थल ] |
| २ | रवि | | माव-ळला | | हि ( रीत ) |
| ३ | कच | | आढ-ळला | | न ( रीत ) |
| ४ | धृतिनग | | ढळला | | [ १ ] तेव्हां ( काल )<br>[ २ ] शुक्रसुताबुद्धिभूमिला सोडुनि ( रीत ) |

टीप—वाक्यांत उभयान्वयी व इतर अव्ययें जीं गौण वाक्यें आणि वाक्याचे भाग जुळविण्यासाठीं योजिलीं असतात, तीं परिच्छेद करितांना सोडून द्यावीं. त्याचप्रमाणें एकाद्या वाक्यास शब्दयोगी लागलें असल्यास तें सोडून द्यावें. वाक्यांचा परस्परसंबंध सांगितल्यावर प्रत्येक वाक्य स्वतंत्र मानून वाक्यपरिच्छेद करावा.

( ५ ) **संयुक्तवाक्य**—" ( १ ) रामाला त्याच्या बापानें शाळेंत घातलें, ( २ ) तेव्हां तो हुषार मुलगा आपली पाटी आणि पुस्तकें घेऊन शाळेंत गेला; आणि ( ३ ) तेथें तो आतां मन लावून अभ्यास करीत असतो. " यांत तीन वाक्यें असून तीं समानवाक्यें आहेत.

| वाक्यांक | उद्देश्यांग | | विधेयांग | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
| १ | * | | घातलें | रामाला | ( १ ) शाळेंत ( स्थल )<br>( २ ) त्याच्या बापानें ( कर्ता ) |
| २, | तो | हुषार मुलगा | गेला | | ( १ ) तेव्हां ( काळ )<br>( २ ) आपली पाटी आणि पुस्तकें घेऊन ( स्थिति )<br>( ३ ) शाळेंत ( स्थल ) |
| ३ | तो | | करीत असतो | अभ्यास | ( १ ) तेथें ( स्थल )<br>( २ ) आतां ( काळ )<br>( ३ ) मन लावून ( रीत ) |

( ६ ) **संयुक्तवाक्य**—"कच येतां बहु हर्षें, धन्य म्हणे मीच कन्यका मातें ॥ वांचविला त्वांचि दिला हा, देइल कोण अन्य कामातें ?"

*टीप*—'कच येतां' याचें 'कच आला' असें पूर्ण वाक्य करून घ्यावें; आणि संक्षिप्त वाक्यें असतील त्यांत हवे असतील ते शब्द घालून तीं पुरीं करावीं. यांत निरनिराळीं वाक्यें अशीं आहेत; [ १ ] कच आला; [ २ ] [ तेव्हां देवयानी ] बहु हर्षे; [ ३ ] [ ती ] म्हणे; [ ४ ] मीच कन्यका धन्य [ आहें ]; [ ५ ] त्वांचि हा वांचविला; [ ६ ] त्वां हा मातें दिला; [ ७ ] कामातें अन्य कोण देईल ? यांत ( १ ) ( २ ) हीं शुद्ध समानवाक्यें आहेत. बाकीच्या वाक्यांचें एकच मिश्रवाक्य झालें आहे. यांत ( ३ ) हें प्रधानवाक्य आहे; आणि बाकीच्या वाक्यांमिळून एक संयुक्त नामवाक्य असून तें ( ३ ) यांतील 'म्हणे' याचें कर्म आहे.

* भावेप्रयोग असल्यामुळें उद्देश्य नाहीं.

| वाक्यांक | उद्देश्यांग | | विधेयांग | | |
|---|---|---|---|---|---|
| | उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | विधेय | कर्म | विधेयविस्तार |
| १ | कच | | आला | | |
| २ | देवयानी | | हर्षे | | तेव्हां ( काळ )<br>बहु ( रीत ) |
| ३ | ती | | म्हणे | | |
| ४ | मीं | कन्यका | धन्य आहें | | च ( रीत ) |
| ५ | हा | | वांचविला | | त्वां ( कर्ता )<br>चि ( रीत ) |
| ६ | हा | | दिला | | मातें ( संप्रदान )<br>त्वां ( कर्ता ) |
| ७ | कोण | अन्य | देईल | कामातें | |

---

# अभ्यास

## २१.

१ पुढील वाक्यांचें कोष्टकांमध्यें पृथक्करण कराः—

[अ] **शुद्ध वाक्यें**:—एका खेडेगांवचा रामराव देशमुख एके दिवशीं आपल्या दोन मुलांस बरोबर घेऊन कसब्यांत जावयास निघाला. हरीचें असें बोलणें ऐकतांच मीं लगेच कागद लेखणी घेऊन हरीच्या बापाला पत्र लिहिलें. तुझा वडील भाऊ या संबंधाची हकीकत तुला उद्यां सांगेल. चांगले विद्यार्थी रोज सकाळीं लौकर उठून आपले धडे मन लावून करितात. त्याला असें म्हणावयास कांहीं योग्य कारण नाहीं. त्या कडक पंतोजीनें वर्गांतल्या सर्व उनाड मुलांना चांगला मार दिला. हरीनें आपल्या चाकरास कामासाठीं गांवाला धाडला आहे. मुलांनीं बाहेरून आल्यावर आपले हात पाय स्वच्छ धुवावे.

[ आ ] **मिश्र वाक्यें**:—जेव्हां सूर्य मावळला, गुरें घरीं आलीं, शाळाही सुटल्या, तेव्हां चोहींकडे गडबड उडाली. मी म्हणालों, कीं जर तूं एवढें काम करशील तर तुला मी चांगलें बक्षीस देईन. ज्या मनुष्यास काल मीं बोलाविलें होतें तो आज येणार आहे, म्हणून मी त्याची वाट पाहात आहें. लहान मुलांनीं बारीक सारीक गोष्टींसाठीं हट्ट करावा आणि रडावें हें त्यांच्या स्वभावाप्रमाणेंच आहे.

[ इ ] **संयुक्त वाक्यें**:—बुडी मारण्याची घांट हें एक मोठें पात्र आहे; यांत वायु भरून मनुष्यास आंत बसून खोल पाण्यांत जातां येतें; आणि आंतला वायु नाहींसा होईपर्यंत पाण्यांत राहतां येतें. त्याला कधींही पैसे उसने देऊं नको; तो मोठा लबाड माणूस आहे आणि त्याला फार खर्च करण्याची संवय आहे. जेवण झाल्यावर पाणी पिणें चांगलें; अगोदर पिण्यानें जेवण जात नाहीं. मी जों तेथें जातों तों हरी माझ्या दृष्टीस पडला. दुर्वास कण्वाचे आश्रमीं गेले आणि आश्रमांत कोण आहे, अशा हांका मारूं लागले; शकुंतला तेथें होती तरी तिचें लक्ष नव्हतें; तिनें हांक ऐकलीच नाहीं; तेव्हां दुर्वास ऋषि रागावले आणि शकुंतलेला शाप देऊन निघून गेले.

---

## २६—समास.*

---

१६४. 'तो मुलगा हिंदुस्थानांतील नद्या **तोंडानें पाठ** म्हणतो;' 'प्रत्येक गांवाजवळ **गाईंकरितां** (म्हणजे गुरांकारितां) **रान राखलेलें** असतें;' 'या शेतांत **तांबडी माती** पुष्कळ आहे;' 'योगी शंकरास **निळें कमळ** वाहतो;' 'मारुतीचा देह **वज्रासारखा** होता;' 'ज्याचा **निळा कंठ** आहे त्या देवाला शंकर म्हणतात;' '**राम** आणि **लक्ष्मण** सीतेच्या स्वयंवरास गेले;' 'लग्नांत नवऱ्या मुलाला **शेला** आणि **पागोटें** देतात;' 'तो तें व्रत **मरणापर्यंत** चालविणार.'

---

* समासांचा विचार शब्दविचारामध्यें वास्तविक केला पाहिजे. पण हें प्रकरण पुस्तकाच्या व्यवस्थेसाठीं आणि यांतील विषय मुलांना समजण्यास कठीण असल्यामुळें येथें निराळें दिलें आहे. तें मुलांना योग्य वाटेल तेव्हां शिकवावें.

१६५. मागील वाक्यांत शब्दांमधले निरनिराळे संबंध आले आहेत, हे मुख्यतः चार प्रकारचे आहेत; एक, कोणत्या तरी विभक्तीचा संबंध; दुसरा, विशेषण किंवा विशेषणासारखा शब्द आणि विशेष्य यांचा संबंध; तिसरा, ' आणि ,' ' अथवा, ' ' किंवा, ' ' व, ' यांनीं जोडलेला संबंध आणि चौथा नाम आणि अव्यय यांचा संबंध. हे संबंध शब्द निरनिराळे ठेऊन दाखविलेले असतात. परंतु केव्हां त्या शब्दांमध्यें विभक्तिप्रत्ययासारखें संबंध दाखविणारें कांहीं असल्यास त्याचा लोप करून अनेक शब्द मिळून एकच शब्द बनवितात. वरील वाक्यांतील शब्द पाहा:—

**( १ ) विभक्ति-संबंध—**

**तोंडानें पाठ**=तोंडपाठ. **गाईसाठीं रान**=गायरान.

**( २ ) विशेषण आणि विशेष्य यांचा संबंध—**

**तांबडी माती**=तांबडमाती. **निळें कमळ**=नीलकमल.
**वज्रासारखा देह** ज्याचा तो = वज्रदेही.
ज्याचा **निळा कंठ** आहे तो = नीलकंठ.

**( ३ ) ' आणि ' याचा संबंध—**

राम **आणि** लक्ष्मण = रामलक्ष्मण.
शेला **आणि** पागोटें = शेलापागोटें.

**( ४ ) नाम आणि अव्यय** यांचा संबंध-**मरणापर्यंत**—आमरण.

१६६. अशा रितीनें दोन किंवा अधिक शब्दांचा परस्पर संबंध दाखविणाऱ्या शब्दांचा लोप करून एकच शब्द बनवितात, याला **समास करणें** असें म्हणतात; आणि अशा प्रकारें तयार केलेल्या शब्दास **सामासिक शब्द** किंवा थोडक्यांत **समास** असें म्हणतात.

**१६७. दोन किंवा अधिक शब्दांमध्यें असणारा जो संबंध तो दाखविण्यासाठीं घालावयाच्या शब्दांचा, किंवा**

**प्रत्ययांचा लोप करून त्या शब्दांमिळून एकच शब्द बनवितात, त्यास समास असें म्हणतात.**

१६८. समासामध्यें गाळलेले शब्द अथवा प्रत्यय इत्यादि जेथल्या तेथें घालून त्यांचा अर्थ उघड करून दाखविणें, यास त्या समासाचा **विग्रह** असें म्हणतात; उदाहरणार्थ, ' तोंडानें जें पाठ तें;' ' पोळीसाठीं जो पाट तो; ' ' निळा आहे कंठ ज्याचा तो; ' हे अनुक्रमें ' **तोंडपाठ;** ' ' **पोळपाट;** ' आणि ' **नीलकंठ** ' यांचे विग्रह होत.

१६९. हे समास मुख्यतः चार प्रकारचे आहेतः—

( १ ) पहिल्या प्रकारांत दोन शब्द असून दुसरा शब्द मुख्य असतो, आणि पहिल्याचा दुसऱ्याशीं विभक्तीचा किंवा विशेषणाचा अथवा विशेषणासारखा संबंध असतो; या प्रकारास **तत्पुरुष** असें म्हणतात. वर सांगितलेले ' तोंडपाठ, ' ' तांबडमाती, ' हे तत्पुरुष समास आहेत.

( २ ) दुसऱ्या प्रकारांत शब्द दोनच असतात; परंतु दोन्ही शब्द मुख्य नसतात, आणि पहिल्याचा दुसऱ्याशीं विभक्तीचा अथवा विशेषण-रूपी संबंध असून, सर्व समासावरून उत्पन्न होणाऱ्या अर्थानें तद्दर्शक अशा अन्यपदार्थाचा बोध होतो. या प्रकारास **बहुव्रीहि** असें म्हणतात; उदा०:—चक्रपाणी, नीलकंठ, इत्यादि.

( ३ ) तिसऱ्या प्रकारांत दोन अथवा जास्त शब्द असून, तें ' आणि, ' ' अथवा, ' या अव्ययांनीं जोडलेले असतात. यास **द्वंद्व** असें म्हणतात; उदा०:—रामलक्ष्मण, ब्रह्मा-विष्णु-महेश, इत्यादि.

( ४ ) चौथ्या प्रकारांत एक शब्द अव्यय असून सर्व सामासिक शब्दही अव्यय होतो. याला **अव्ययीभाव** असें म्हणतात; उदा०:—आमरण, यथाशक्ति, हरघडी, इत्यादि.

१७०. हे जे चार प्रकार, ते आणि त्यांचे आणखी पोटभेद कल्पून सहा समास मानिले आहेत; ते असे:—

( १ ) विभक्तितत्पुरुष, यालाच नुसतें 'तत्पुरुष' असें म्हणतात; ( २ ) कर्मधारय; ( ३ ) द्विगु; ( ४ ) बहुव्रीहि; ( ५ ) द्वंद्व आणि ( ६ ) अव्ययीभाव.

( १ ) तत्पुरुष—दोन शब्दांमध्यें असणाऱ्या विभक्तीच्या संबंधाचा लोप करून जो समास करितात, तो तत्पुरुष समास. प्रथमेशिवाय प्रत्येक विभक्तीवरून एकेक असे याचे सहा भेद होतात; ते उदाहरणांसह सांगतों;—

द्वितीया–तत्पुरुष—धोंडफोड्या, धोंडे फोडणारा; परपीडा, पराप्रत पीडा; तोंडपुज्या; अंगचोर; मारखाऊ; आगलाव्या; इत्यादि.

तृतीया–तत्पुरुष—तोंडपाठ, तोंडानें पाठ; कृपावलोकन, कृपेनें अवलोकन; गजमोजणी, गजानें जी मोजणी ती; उपासमार; वस्त्रगाळ; घोडमात; अंगजड; कपाळकरंटा; इ०.

चतुर्थी–तत्पुरुष—गायरान, गाईसाठीं म्हणजे गुरांसाठीं जें रान म्हणजे कुरण तें; पोळपाट; कृष्णार्पण; यज्ञस्तंभ; इ०.

पंचमी–तत्पुरुष—चोरभय, चोरापासून भय; पापमोचन; ऋणमोचन; इ०.

षष्ठी–तत्पुरुष—राजवाडा, राजाचा वाडा; केळफूल; पिंपळपान; देवपूजा; देवघर; इ०.

सप्तमी–तत्पुरुष—रानमांजर, रानांत ( असणारें ) मांजर; घरजांवई, घरांत ( राहाणारा ) जांवई; पाणबुड्या; गृहप्रवेश; दानशूर; रणशूर; घरकोंबडा; इ०.

( २ ) तत्पुरुषाचा नञ्तत्पुरुष म्हणून एक प्रकार आहे. त्यांत पाहिलें पद नकाराच्या अर्थाचें असून तें बहुतकरून 'अ' किंवा

'अन्' असतें. जसें,—अनुपकार, (अन्+उपकार), नव्हे जो उपकार तो; अज्ञान, नव्हे जें ज्ञान तें; अब्राह्मण; अनिष्ट; अनर्थ; इ०.

(३) तत्पुरुषाचें दुसरें पद केव्हां उपपद म्हणजे धातुसाधित असतें; तेव्हां त्यास **उपपद-तत्पुरुष** असें म्हणतात. उदा०:—गृहस्थ (घरांत राहाणारा); आगलाव्या; भाजीविक्या; लांचखाऊ; खेटरखाऊ; इ०.

(४) केव्हां तत्पुरुष समासांत समास झाल्यावरही विभक्ति तशीच राहाते, किंवा सामान्यरूप राहातें; अशा समासास **अलुक्-समास** असें म्हणतात; उदा०:— पंकेरुह (कमल); युधिष्ठिर; **पिशाच्या-हातीं** [कोलीत]; **घोडमात**; इत्यादि.

१७१. जेव्हां तत्पुरुष समासांत दोन पदांपैकीं पहिलें पद दुसऱ्याचें विशेषण असतें, किंवा पहिल्या पदाची दुसऱ्यास उपमा दिलेली असते, तेव्हां त्यास **कर्मधारय** समास असें म्हणतात. जसें,—तांबडमाती (तांबडी अशी माती); नीलकमल (निळें असें कमळ); चोरघडी (गुप्त किंवा चोरून असलेली घडी); कमलमुख (कमलासारखें मुख); घरकाम; विद्यासर्वस्व; काळपुरुष; भवसागर; इत्यादि.

टीप—या समासांत विशेषण असणारा किंवा उपमा दिलेला शब्द मागूनही येतो; उदा०:—प्रसंगविशेष (विशेष असा प्रसंग); लालभडक; मुखकमल; इ०.

(अ) अन्य, दुसरा, अशा अर्थी **अंतर** हा शब्द समासांत येतो; हा शब्द पुढें येऊन मुख्य शब्द अगोदर येतो; असे कर्मधारय समास होतात; उदा०:—ग्रामांतर, दुसरा गांव; वेषांतर, दुसरा वेष; भाषांतर, दुसरी भाषा. सांप्रत भाषांतर याचा अर्थ दुसऱ्या भाषेंत केलेलें रूपांतर असा करितात.

(आ) शब्दयोगी अव्ययांपासून झालेलीं विशेषणें जीं **वरचा**, **वरील**, **समोरचें**, इत्यादि, हीं नामापुढें येऊन झालेले शब्द 'घरावरचा,' 'झाडावरील,' 'देवळासमोरचा,' वगैरे हे कर्मधारय समास होत,

१७२. कर्मधारय समासाचें पहिलें पद संख्याविशेषण असून सर्व समासावरून एकच पदार्थ किंवा संच, जोड, असा अर्थ होत असला, म्हणजे त्यास **द्विगुसमास** म्हणतात; उदा०:—पंचपाळें ( पांच पाळ्यांचा समुदाय अथवा संच, जोड ); पांचशेरी; त्रिभुवन; तीनवार; पंचारती; पंचपदी; अष्टाध्यायी; चतुर्युग; बारभाई; अठरा-बाबू; नवरात्र; त्रिरात्र; इ०.

१७३. दोन शब्दांचा समास होऊन त्यापासून त्या दोन शब्दांच्या जुळणीनें दर्शविलेली स्थिति ज्याची आहे, असा निराळ्या पदार्थाचा बोध होतो, तेव्हां त्या समासास **बहुव्रीहि समास** असें म्हणतात; उदा०:—'चक्रपाणि' यांत 'चक्र' आणि 'पाणि' यांचा समास झाला; त्यावरून 'चक्र आहे पाणीच्या ठायीं म्हणजे हातीं ज्याच्या' 'किंवा चक्रयुक्त आहे पाणि ज्याचा,' अशी स्थिति ज्याची आहे अशा पुरुषाचा म्हणजे विष्णु या देवाचा बोध होतो, म्हणून हा बहुव्रीहि समास होय. याचीं आणखी उदाहरणें:—गजानन; पीतांबर; त्रिनयन; त्रिनेत्र; वांकडमान्या; दुतोंड्या; रड-तोंड्या; कमलाक्ष; दुरंगी; नीलकंठ; इ०.

टीप—बहुव्रीहि समासांतलें पहिलें पद तत्पुरुष व कर्मधारय यांप्रमाणेंच विभक्तींचें रूप, विशेषण किंवा उपमा दाखविणारें असतें. परंतु हा समास, आणि तत्पुरुष किंवा कर्मधारय, यांतला भेद असा आहे, कीं तत्पुरुष किंवा कर्मधारय समासांत पहिल्या पदानें दुसऱ्या पदाबद्दल कांहीं सांगितलेलें असतें; व बहुव्रीहि समासांत दोन्ही पदांमिळून निराळ्याच पदार्थाबद्दल सांगितलेलें असतें. उदाहरणार्थ, 'सत्यव्रत' हा शब्द तत्पुरुष, कर्मधारय आणि बहुव्रीहि असा तिन्ही प्रकारचा समास होईल; पण त्याचा प्रत्येक समासांत अर्थ कसा निराळा होतो तो पाहाः—

सत्यव्रत—सत्याचें म्हणजे खरेपणाचें व्रत, तत्पुरुष समास.

सत्यव्रत—सत्य हेंच व्रत, कर्मधारय समास.

सत्यव्रत—सत्य हें व्रत आहे ज्या माणसाचें असा, म्हणजे प्रामाणिक मनुष्य, बहुव्रीहि समास.

दुसरीं उदाहरणें:—'गजानन,' गजाचें जें आनन म्हणजे मुख तें; तत्पुरुष. गजाचें आनन आहे ज्याला, तो देव म्हणजे गणपति; बहुव्रीहि. 'लक्ष्मीकांत,' लक्ष्मीचा कांत म्हणजे नवरा, तत्पुरुष; लक्ष्मी आहे कांता ज्याची तो देव म्हणजे विष्णु, बहुव्रीहि; 'पीतांबर,' पीत म्हणजे पिंवळें असें जें वस्त्र तें, कर्मधारय; पीत म्हणजे पिंवळें आहे वस्त्र ज्याचें असा देव म्हणजे विष्णु, बहुव्रीहि.

१७४. बहुव्रीहि समासांतील दोन्ही पदांची विभक्ति एकच असते अथवा भिन्न असते. विभक्ति एकच असते तेव्हां त्यास **समानाधिकरण-बहुव्रीहि** आणि भिन्न असतां **व्यधिकरण-बहुव्रीहि** असें म्हणतात. उदाहरणें:— **समानाधिकरण-बहुव्रीहि**–तपोधन, तप हेंच आहे धन ज्याचें तो; नीलकंठ, निळा आहे कंठ ज्याचा तो; आंखुडशिंगी, आंखुड आहेत शिंगें जिचीं अशी (गाय); बहुदुधी; तिमजली (घर); इत्यादि. **व्यधिकरण-बहुव्रीहि**– चक्रपाणि, चक्र आहे पाणीच्या ठायीं म्हणजे हातीं ज्याच्या तो; गजानन, गजाच्या आननासारखें आहे आनन ज्याचें तो; माणुसघाण्या, माणसाची घाण म्हणजे कंटाळा आहे ज्यास तो; इत्यादि.

१७५. 'सहित' अशा अर्थाचें 'स' किंवा 'सह' हें पद मागें येऊन बहुव्रीहि समास होतात; जसें,–स-पुत्र, पुत्रासहित जो तो; सहोदर, सह म्हणजे समान आहे उदर ज्यांचें ते, म्हणजे भाऊ; सगोत्र, सप्रवर, इ०. हा **सहार्थी बहुव्रीहि.**

१७६. 'नाहीं' किंवा 'नव्हे' अशा अर्थाचें 'अ' हें पद अगोदर येऊन बहुव्रीहि समास होतात; जसें, अ-पुत्र, नाहीं ज्याला पुत्र तो; अज्ञान, नाहीं ज्यास ज्ञान तो; हा **नञ्बहुव्रीहि** समास होय.

१७७. मारामारी, लठ्ठालठ्ठी, बोलाचाली, बुक्काबुक्की, भांडाभांडी, असले कित्येक समास आहेत, यांचा विग्रह कसा करावा हें समजण्यास कठीण पडतें. 'मार,' 'मार,' असें ज्या कामांत चालतें तीं 'मारामारी;' 'एक बोलतो किंवा भांडतो,' असें जेथें चालतें, ती 'बोलाबोली,' किंवा 'भांडाभांडी;', इत्यादि. हे बहुव्रीहि समास होत.

टीप—बहुव्रीहि समासानें झालेले शब्द हें मूळचे विशेषणें असतात असें यावरून दिसून येईलच.

१७८. केव्हां तत्पुरुष, कर्मधारय व बहुव्रीहि या समासांत समास झाल्यानंतर दोन पदें असलीं तरी विग्रह करितांना अर्थ नीट होण्यासाठीं आणखी एक तिसरें पद मध्यें घालावें लागतें, मग समास होतांना त्याचा लोप होतो; अशा समासास **मध्यम-पद-लोपी** समास म्हणण्याची चाल आहे; उदा०:—गर्भश्रीमंत, गर्भांत असल्यापासून म्हणजे उपजत श्रीमंत; साखरभात, साखरेनें युक्त असा भात; गजानन, गजाच्या आननासारखें आहे आनन म्हणजे मुख ज्याचें तो देव, [ गणपति ]. आणखी उदाहरणें:— गुडधानी [ गुडदाणी ]; कातरविडा; करवतकीस; लांकूडकाम; बाळमित्र; चुलतभाऊ [ चुलत म्हणजे चुलत्याचे संबंधाचा जो भाऊ तो ]; भाचेसून [ भाच्याची बायको अशी जी सून ती ]; चुलतसासरा; आतेबहीण; आजेसासू; इ०.

टीप—मध्यमपदलोपी हा कांहीं निराळा समास नाहीं. रचनेवरून तत्पुरुष, कर्मधारय, व बहुव्रीहि यांतला कोणताही समास मध्यमपदलोपी होईल.

१७९. **द्वंद्व:**—'आणि,' 'व,' 'किंवा,' 'अथवा,' या अव्ययांनीं जोडावयाचे शब्द त्या अव्ययांचा लोप करून एकत्र लिहितात, व त्यांचा समास करितात. यास **द्वंद्व समास** असें म्हणतात; जसें,—रामलक्ष्मण, राम आणि लक्ष्मण; शेलापागोटें, शेला आणि पागोटें; भीमार्जुन; पांचसहा; खरेंखोटें; मातापितरें; उंचसखल; काळागोरा; बहीणभाऊ; दिवसरात्र; इत्यादि.

१८०. केव्हां द्वंद्व समास ज्या शब्दांचा झालेला असतो त्यां-वरून तशासारखे आणखी दुसरे पदार्थ बरोबर आहेत, असा बोध होतो किंवा दुसऱ्या पदाचा अर्थ 'इत्यादि,' 'वगैरे,' अशां-सारखा असतो; अशा समासास **समाहारद्वंद्व** असें म्हणतात; उदा०:—शेटसावकार, [ सावकार व्यापारी असे लोक ]; पोरबीर, [ पोर वगैरे ]; कोळीमाळी; लहानसान; मीठभाकर; दिवाणदरबार; पानपत्रावळ; इत्यादि.

१८१. ज्या समासांत पहिलें पद अव्यय असून एकंदर समासास अव्ययांचा अर्थ असतो; किंवा कोणतेंच पद अव्यय नसूनही एकंदर समास अव्यय असतो; अशा समासास **अव्ययीभाव** असें म्हणतात. उदा०:—यथाशक्ति; आमरण; हरदिवस; दरघडी; प्रतिक्षण; बिनचूक; बिनधोक; बरहुकूम; गांवगन्ना; इत्यादि.

(अ) नामादिकांस शब्दयोगी अव्ययें लागून झालेलीं रूपें घरावर, झाडाखालीं, शाळेपाशीं, वर्गामध्यें, पुस्तकावरून, मुलाखेरीज, गांवापासून इत्यादि यांना वास्तविक अव्ययीभाव समास म्हणावें; कारण हे एकंदर शब्द अव्ययें आहेत, मात्र यांत दुसरें पद अव्यय असतें.

---

## अभ्यास

## २७.

१ पुढील समासांचीं नांवें सांगून त्यांचे विग्रह कराः—व्याघ्रभय. ब्राह्मणभोजन. आईबापें. खेचर. सत्यव्रत. कृष्णसर्प. काळकुट्ट. नवराबायको. चंद्रप्रकाश. झाडझूड. प्रपंचसुख. घरपट्टी. आगगाडी. यज्ञार्पण. यज्ञस्तंभ. यज्ञमंडप. पानमळा. पानसुपारी. आकाशवाणी. आकाशगंगा. आकाशपाताळ. मधमाशी. बहीणभाऊ. भाऊबहीण. भाऊराया. रानफूल. रानमांजर. रानडुक्कर. रानभाजी. विटीदांडू. घरदार. घरकाम. घरकोंबडा. राजमंदीर. राजवाडा. राजपत्नी. राजसभा. राजसेवा. राजनिष्ठा. राजपुरुष. राजाश्रय. राजद्रोह. कृताकृत. पिनाकपाणी. मृगडोळस. मृगनयना. आतेसून. प्यादेमात. पंकेरुह. आलागेला. विद्याव्यसन. विद्यासर्वस्व. विद्याभिलाषी. शालागृह. शाळामास्तर. पंचवीस. एकुणतीस. साडेचार. हिंदुस्थान. सुविचार. सुलोचना. पुष्टिपत्र. पाठकोरें. कुतर्क. कुग्राम. पंचविशी. लेखनपद्धति. लेखनमाला. गणितशास्त्र. कर्मणिप्रयोग. भावेप्रयोग. विद्यालय. गरीबगुरीब. पानपत्रावळ. करवतकीस. वेणीफणी. भवसागर. भालचंद्र. गांवगन्ना. हरघडी. घडीघडी. पोटबांधणें. कमरबंद. डोयओझें. बांधकाम. फळझाड.

२ पुढील निरनिराळ्या शब्दांचे समास करून त्यांचीं नांवें सांगाः—पद आणि च्युत. पद आणि अर्थ. घन आणि श्याम. पीत आणि अंबर. वन आणि

गाय. चंद्र आणि मुख. प्रति आणि एक. वि आणि धव. हर आणि घडी. बे आणि अब्रू. कवि आणि कृत. काल आणि सर्प. भांडें आणि कुंडें. सांग आणि काम. विद्या आणि धन. चक्र आणि पाणि. जन आणि लोक. संसार आणि सुख. लोक आणि अपवाद. विद्या आणि लाभ. लांकूड आणि काम. वेद आणि विद्या. वेद आणि अर्थ. ज्योतिष आणि शास्त्र. सत् आणि गुण. पंच आणि वट. पंच आणि पाळीं. महान् आणि साधु. भव आणि सागर. राम आणि भार्या. ब्रह्मा, विष्णु आणि महेश. तारा आणि यंत्र. छाप आणि खाना. खून आणि मुद्रा. व्याघ्र आणि भय. धन आणि लाभ. कोप आणि अग्नि. गांव आणि कुटाळ. कान आणि उघाडणी. पर आणि पीडा. प्रत्येक आणि दिवशीं. लक्ष्मी आणि कांत. सु आणि विचार.

---

## २७–विराम-चिन्हें *

१८२. बोलतांना किंवा लिहितांना अर्थ नीट लक्षांत येण्यासाठीं शब्द व वाक्यें यांच्यामध्यें कमजास्त वेळ थांबावें लागतें. कोठें किती थांबावें, हें समजण्यासाठीं कित्येक खुणा ठरविलेल्या आहेत. त्यांस **विराम-चिन्हें** असें म्हणतात.

१८३. मुख्य विरामाचिन्हें अशीं आहेतः—१ स्वल्पविराम ( , ), २ अर्धविराम ( ; ), ३ पूर्णविराम ( . ), ४ प्रश्नचिन्ह (?), ५ उद्गारचिन्ह ( ! ), ६ अवतरणचिन्हें ( ‘ ’ आणि “ ” ) ७ कौंस ( ), [ ], ८ अपसारणचिन्ह (—) आणि ९ विग्रह-चिन्ह ( - ).

१८४. ‘आणि’ या अव्ययानें जोडावयाचे शब्द व वाक्याचे लहान भाग किंवा लहान वाक्यें व एकेरी शब्द, यांच्यामध्यें थोडेंच थांबावयाचें असल्यास **स्वल्पविराम** घालितात; वाक्य

---

* हें सबंध प्रकरण सहाव्या इयत्तेस शिकवावें.

बरेंच मोठें असतां मध्येंच कांहीं अर्थ पुरा झाला असला म्हणजें **अर्धविराम** घालितात; व वाक्य पूर्ण झाल्यावर **पूर्णविराम** घालितात; उदा०:—" हरी, विष्णू आणि केशव असे भाऊसाहेबांचे तीन मुलगे आहेत, व गंगू नांवाची एक मुलगी आहे; संपत्तीला तर तोटा नाहींच; एकंदरींत त्यांच्यावर परमेश्वराची पूर्ण कृपा आहे, यांत संशय नाहीं."

१८५. वाक्यांत प्रश्न केला असतां त्याचे शेवटीं **प्रश्नचिन्ह** घालितात; जसें,—' हिंदुस्थानांत कोणाचें राज्य आहे ? ' युरोपाच्या पश्चिमेस कोणचा महासागर आहे ? '. ' विशेषण म्हणजे काय ? ' ' क्रियापदास कर्म केव्हां असतें ? " इ०.

१८६. एक अथवा अनेक शब्दांनीं, किंवा एकाद्या वाक्यावरून हर्ष, शोक, आश्चर्य, इत्यादिकांचा बोध होत असला म्हणजे त्याच्या शेवटीं **उद्गारचिन्ह** घालितात. उदा०:—' अहाहा ! ' ' हो तर ! ' ' घात झाला ! ' इ०.

१८७. बोलतांना दुसऱ्या कोणाचे विचार किंवा म्हणणें मध्यें घेतलें असल्यास, अशा वाक्याच्या आरंभीं व शेवटीं **अवतरणचिन्ह** घालितात. हें वाक्य लहानच असल्यास चिन्ह एकेकच असतें. त्याचप्रमाणें एकाद्या शब्दाकडे अथवा वाक्याकडे विशेष रितीनें लक्ष जावें असा हेतु असल्यासही एकेरी अथवा दुहेरी अवतरणचिन्हें घालितात. उदा०:—रामा म्हणाला, ' मी येत नाहीं. ' " सत्यासारखें उत्तम दुसरें कांहीं नाहीं. " " सत्य परमेश्वरास फार आवडतें व असत्याचा सर्वांसच फार तिटकारा येतो, " असा बोध सज्जन नेहमीं करीत आले आहेत; ' नाम ' म्हणजे पदार्थाचें नांव. इ०.

१८८. **कंस**:—एकाद्या वाक्यांत अर्थाचें स्पष्टीकरण होण्यासाठीं वाक्यार्थाशीं संबंध नाहीं असा मजकूर मध्येंच घालितात. हा मजकूर असा असतो कीं तो गाळून टाकिला तरी वाक्यार्थाला गौणत्व येत

नाहीं. हा मजकूर वाटोळा (...) किंवा चौकोनी [...] कंस करून त्यांत लिहितात; उदा०:–"राज्याचा खरा वारस शिवाजी ( म्हणजे संभाजीचा मुलगा ) हा त्या वेळीं फक्त सहा वर्षांचा होता, म्हणून त्याचा चुलता राजाराम हा राज्याधिकारी [ खऱ्या राजाच्या नांवानें राज्य चालविणार ] म्हणून राज्य करूं लागला." इत्यादि.

१८९. **अपसारणचिन्हें**:—प्रथमतः सांगितलेला मजकूर जास्त स्पष्ट करण्यासाठीं मध्येंच सुचलेला मजकूर घालणें झाल्यास अशी (-) आणि (-) अशी, अशा दोन रेषा घालून त्याच्या अगोदर बहुधा स्वल्पविराम अथवा अपूर्णविराम [ : ] घालितात; त्यांस **अपसारणचिन्हें** असें म्हणतात; उदा०:—'रामा—जो इतका दांडगाच आहे तो—असें म्हणाला असेल खचित.' 'रात्र अत्यंत रमणीय व शांत होती,—ती शरदांतील पूर्णिमाच होती.' इत्यादि.

१९०. **विग्रहचिन्ह**:—एकाद्या सामासिक शब्दांतील निरनिराळे अवयव भिन्न करून दाखविण्यासाठीं त्यांच्यामध्यें लहान रेघ (-) घालितात; हिला **विग्रहचिन्ह** असें म्हणतात; उदा०:–'राज्य-विभाग;' 'ब्रह्मा-विष्णु-महेश;' 'राम-लक्ष्मण;' 'सुवर्ण-कांत;' धनुष्य-बाण;' 'श्वेत-पुष्प;' इत्यादि.

---

## २८–साधित-शब्द-विचार.*

१९१. भाषेंत जे शब्द असतात, त्यांतले कांहीं मूळचेच असतात, व कांहीं त्या मूळच्या शब्दांमध्यें फेरफार होऊन किंवा त्यांस प्रत्यय लागून होतात; अथवा एकापेक्षां जास्त शब्दही जुळून त्यांचा

---

* साधितशब्दांची माहिती हें प्रकरण फार मोठें व कठीण आहे. तें लहान मुलांना नीटपणें समजणें शक्य नाहीं. तथापि त्याची थोडीशी माहिती मुलांना आरंभीं व्हावी, म्हणून मुलांना उपयुक्त अशा कांहीं गोष्टी येथें सांगितल्या आहेत. हें प्रकरण सहाव्या इयत्तेकरितां आहे.

एकच शब्द बनतो. पहिल्या प्रकारच्या शब्दांस **सिद्धशब्द** व दुसऱ्या प्रकारच्या शब्दांस **साधितशब्द** असें म्हणतात; उदा०:– हरि, विष्णु, सूर्य, लांकूड, धोंडा, कागद, हात, वर, कर (धातु), इत्यादि **सिद्धशब्द** आहेत; व हरीचा, वैष्णव, सौर, लांकडी, धोंडफोड्या, हाताळ, वरील, करितां, इत्यादि हे त्या प्रत्येकापासून झालेले **साधितशब्द** आहेत.

१९२. मराठी भाषेंतील कांहीं थोडके शब्द खेरीजकरून बाकीचें संस्कृत भाषेंतून आले आहेत. त्याचप्रमाणें संस्कृत भाषेंत बहुधा प्रत्येक शब्दाचें कांहीं तरी मूळ ठरवून तें सांगण्याची चाल आहे. या दृष्टीनें पाहिलें तर घोडा, हरि, विष्णु, सूर्य, हे शब्दही साधित म्हणावे लागतील. अशानें हा विषय आरंभीं शिकणारांच्या दृष्टीनें फार कठीण व घोटाळाचा होईल. तेव्हां आपण तूर्त असें समजूं कीं, जे शब्द आयते संस्कृतांतून घेतलेले आहेत, किंवा जे संस्कृतांतून मराठींत येतांना बदल होऊन आले, पण मग मराठींत त्यांचें ठरींव रूप झालें आहे ते, व मराठींत जे जुने मूळचेच आहेत ते, असे सर्व शब्द **सिद्धशब्द** आहेत; व अशा शब्दांपासून आपणास सांगतां येतील असे फेरफार होऊन जे शब्द झाले आहेत, त्यांना **साधितशब्द** म्हणूं.

१९३. साधित शब्दांमध्यें कित्येक केवळ संस्कृत आहेत व कित्येक शुद्ध मराठी आहेत. तेव्हां प्रथमतः संस्कृत साधित शब्दांचा विचार करूं.

(१) नामावरून विशेषणें, विशेषणावरून नामें, त्या दोहींवरून पुन्हा नामें, विशेषणें व धातु; धातूंवरून व अव्ययांवरून तऱ्हेतऱ्हेचे शब्द, असे साधित शब्द होतात; त्याप्रमाणें त्यांस **नाम-साधित, विशेषण-साधित, धातु-साधित, अव्यय-साधित,** अशीं नांवें देतात.

टीप—साधित शब्दांमध्यें जे नामें व विशेषणें यांपासून साधतात, त्यांस तद्धित आणि जे धातूंपासून साधतात, त्यांस कृदन्त अशा संस्कृतांत संज्ञा आहेत. त्यांचा मराठींत उपयोग करण्यास चिंता नाहीं.

## संस्कृत साधित शब्द.

१९४. संस्कृतांत शब्दांचें मूळ ज्यास समजतात, असा प्रत्येक शब्दांत धातु म्हणून असतो. त्यांत शब्दांचा मुख्य अर्थ असतो, मग त्यास प्रत्यय लागून नामें इत्यादि होतात. शिवाय त्या धातूच्या मागें उपसर्ग म्हणून आहेत, ते लावून धातूच्या मूळच्या अर्थांत कमजास्त अर्थ आणितां येतो. उदाहरणार्थ, ' कृ ' हा मूळचा धातु आहे. याचा अर्थ ' करणें ' असा आहे. त्यांतल्या ' ऋ ' चें ' आर् ' असें होऊन व त्यास ' अ ' प्रत्यय लागून ' कार ' असें कृत्य किंवा काम अशा अर्थाचें नाम होतें. त्याच्यामागें आणखी ' अधि ' असा उपसर्ग लागतो; याचा अर्थ ' वर, ' वरतीं ' असा आहे. अशा रितीनें एकंदर शब्द ' अधिकार ' असा सिद्ध होऊन त्याचा ' अंमल ' किंवा ' वर्चस्व ' असा अर्थ झाला. येथें या शब्दाचे तीन भाग आहेतः—उपसर्ग, धातु व प्रत्यय; यांमिळून ' अधिकार ' असें नाम तयार झालें. असे उपसर्ग पुष्कळ आहेत. त्यांतले माहितीसाठीं थोडे येथें सांगतोंः—

टीप—मागें धातुसाधित शब्द, समास, प्रयोजक क्रियापदें इत्यादि सांगितलीं आहेत, ते साधित शब्दच आहेत; पुस्तकाच्या व्यवस्थेसाठीं ते निरनिराळ्या ठिकाणीं सांगितले आहेत.

### (१) उपसर्ग.*

**अति**—पलीकडे, मर्यादेबाहेर;—अतिक्रम, अतिशय.

**अनु**—मागून;—अनुभव ( मागून झालेलें किंवा पाहून झालेलें ज्ञान ); अनुज ( धाकटा भाऊ ); अनुमत; अनुगमन ( सती जाणें ).

* उपसर्गांचा जो मूळचा अर्थ तो शब्दांमध्यें नेहमीं राहातोच असें नाहीं. मुळारंभीं तसा अर्थ असून पुढें त्यांत फरक होतो.

**अप**—लांब, पलीकडे;—अपगत; अपमान; अपशकुन.

**अभि**—जवळ, कडे;—अभिमान; अभ्यास; अभिज्ञ ( शहाणा ).

**अव**—पलीकडे, खालीं;—अवगत; अवकृपा; अवगुण.

**उप**—जवळ, खालीं;—उपवास; उपक्रम ( आरंभ ); उपकार; उपहार.

**नि**—खालीं, आंत;—निबंध; निमग्न; निधन ( मरण ).

**परा**—एकीकडे, मागें;—पराभव; पराक्रम; परावर्तन.

**प्र**—पुढें, कडे;—प्रताप; प्रहार; प्रदेश; प्रभु; प्रभात.

**सम्**—एकत्र;—संगम; संभव; संताप; संग्रह; संकट.

**पृथक्**—निराळें;—पृथक्करण.

**बहिर्**—बाहेर;—बहिर्द्वार; बहिष्कार.

**प्रति**—मागें, फिरून, पुन्हा;—प्रत्युत्तर; प्रतिबिंब; प्रतिशब्द; प्रतिपादन; प्रत्युपकार; प्रतिकूळ; प्रतिपक्ष; इ०.

**वि**—निराळें, जास्त, काढून घेतलेलें;—वियोग; विरक्त; विनाश; विख्यात; विराम; विधवा; विरूप; विदेश; विशेष; विशेषण; इ०.

**सु**—चांगलें;—सुमंगल; सुकर; सुलभ; सुरस; सुरम्य; इ०.

**परि**—आसमंतात्, भोंवतीं;—परीक्षा; पर्यटन; परिज्ञान; परिजन.

**निर्, निस्**—बाहेर काढलेलें;—निर्गुण; निर्द्रव्य; निष्कर्ष; निष्कारण; निष्कांचन; निरामय; निर्बंध; निष्कृति; इ०.

## ( २ ) धातुसाधित नामें [ कर्तृवाचक ].

**तृ** ( ता )—दाता, वक्ता, भोक्ता, हंता, द्रष्टा, इ०. यांचें स्त्रीलिंग ' तृ ' यास ' ई ' लागून होतें; जसें,—दात्री, द्रष्ट्री; इ०.

**अक**—कारक, दायक, बाधक, गुणक, शोधक, योजक, भजक, भंजक, पावक, जनक, रक्षक, इ०.

**इक**—रसिक, पथिक, रथिक, इ०.

**अ**—चोर, सर्प, भव (शंकर), देव, हर, विजय, अर्ह (योग्य), प्रवाह, बुध, इ०.

**इन्**—[ पु० ई, स्त्री० इनी ]—जयी, विजयी, वादी, प्रतिवादी, अनुभवी, अनुयायी [ मागून जाणारा ], अनुगामिनी [ स्त्री० ], दोषी, अपराधी, अपराधिनी [ स्त्री० ], इ०.

**अन**—नंदन [ मुलगा ], मदन, रमण [ नवरा ], विलक्षण, बिभीषण [ भिववणारा ], रावण [ मोठा शब्द करणारा ].

## ( ३ ) धातुसाधित नामें [ साधीं ].

**अ**—त्याग, भाग, पाक, प्रसाद, भाव, संचय, स्तव, रोग, इ०.

**अन**—स्थान, पान, संपादन, पचन, सेवन, हवन, वाचन, इ०.

**अना**—प्रार्थना, वेदना, रचना, विचारणा, इ०.

**ति**—कृति, बुद्धि, शक्ति, स्मृति, गति, मति, प्रीति, सृष्टि, भक्ति, इ०.

**त्र**—पत्र, नेत्र, श्रोत्र, शास्त्र, पात्र, स्तोत्र, क्षेत्र, खनित्र, इ०.

**या**—क्रिया, शय्या, मृगया, इ०.

## ( ४ ) धातुसाधित विशेषणें.

[ विशेषणांपैकीं पुष्कळांचा उपयोग नामांसारखाही होतो. ]

**मान**—यजमान, पवमान ( वारा ), इ०.

**त***—प्राप्त, आप्त, गत, नत, रत, रूढ, मूढ, गूढ, विस्तृत, भीत, आपन्न, जीर्ण, विस्तीर्ण, प्राण, मुग्ध, सिद्ध, लग्न, मग्न, पान, लीन, इ०.

**अनीय**—रमणीय, रक्षणीय, दर्शनीय, इ०.

**य**—कार्य, त्याज्य, वाच्य ( बोलावयाचें तें ), वाक्य, भोज्य ( खाण्यास योग्य ).

**तव्य**—कर्तव्य, दातव्य, भवितव्य ( पुढें घडणारें, नशीब ), इ०.

**इष्णु**—सहिष्णु ( सोशिक ), भविष्णु ( होणारा ), इ०.

**उक**—भावुक, घातुक, कामुक ( इच्छा करणारा ).

**आलु**—कृपालु, श्रद्धालु ( मराठींत झोंपाळू, लाजाळू, भुकाळू ).

**उ**—भिक्षु ( संन्यासी ).

**उर**—भासुर ( तेजस्वी ), क्षणभंगुर, भिदुर ( फुटेल असें ).

## ( ५ ) नामें व विशेषणें यांपासून झालेलीं नामें व विशेषणें.

**अ, य**—भार्गव, शैव, गार्ग्य, पौलस्त्य, वाशिष्ठ, काश्यप, पार्थ, इ०.

**इ**—दाशरथि, कार्ष्णि, दौःशासनि.

**एय**—गांगेय, रौहिणेय, आग्नेय, मार्कंडेय, कौन्तेय, सौभद्रेय, इ०.

**य**—साम्य, तालव्य, मुख्य, चिन्त्य, धन्य, पथ्य, मूल्य.

---

* हा भूतकालवाचक, कर्मणि प्रत्यय आहे. हा मागील अक्षराशीं संधि होतांना किंवा दुसऱ्यास कित्येक कारणांनीं ढ, ण, न, असाही होतो.

ईय—त्वदीय, मदीय, अस्मदीय, इ०.

क, अक, इक—आरण्यक, भिक्षुक, नैय्यायिक, वार्षिक, धार्मिक, आस्तिक ( देव मानणारा ), नास्तिक ( देव न मानणारा ), सैनिक, वैदिक, पौराणिक, कायिक, वाचिक, मानसिक.

ईन—कुलीन, आधीन, प्राचीन, स्वाधीन.

इन्, विन्, मिन्—(स्त्री० इनी, विनी, मिनी; पुल्लिंगामध्यें न् जातो)—शास्त्री, विद्यार्थी, सुखी, हली ( बळराम, शेतकरी ), धनी, मायावी, तेजस्वी, तपस्वी [ तपस्विनी स्त्री० ], स्वामी, स्वामिनी ( स्त्री० ).

वत्, मत्, वान्, मान्, ( स्त्री० वती, मती )—श्रीमान्, ( स्त्री० श्रीमती ), ज्ञानवान्, विद्यावान्, भास्वान् ( तेजस्वी, सूर्य ).

कीय—स्वकीय, परकीय, इ०.

त्य—पाश्चात्य, पाश्चिमात्य, नित्य, कृत्य, अत्रत्य ( येथचा ), अमात्य ( राजाजवळ असणारा प्रधान ).

तन—[ तशा प्रकारचें ]—सनातन, पुरातन, चिरंतन.

म, इम—आदिम, अग्रिम ( आरंभींचा ), अंतिम ( शेवटचा ).

ट, ठ, आट, आल—अचाट, वाचाल, कर्मठ, वाचाट.

मय—चिन्मय, मृण्मय ( मातीचें ), गोमय ( शेण ).

धेय—भागधेय ( दैव ), नामधेय.

## ( ५ ) भाववाचक नामें.

हीं विशेषणांस प्रत्यय लागून होतात. हीं होण्याचे संस्कृत व मराठीं प्रत्यय निरनिराळे आहेत. दोन्हीं प्रकारचीं भाववाचकनामें येथें एकाच जागीं सांगतों:—

संस्कृतः—ता—शुचिता, गुरुता, लघुता, मृदुता, देवता.

त्व—शुचित्व, गुरुत्व, लघुत्व, मृदुत्व, देवत्व.

अ—शौच्य, गौरव, लाघव, दैव.

य—वाणिज्य, मूल्य, दौत्य.

इमा—रक्तिमा, द्रढिमा, कालिमा, मृदिमा.

मराठीः—पण, पणा—बरेपण, बरेपणा, चांगलेपण, चांगलेपणा, काळेपण, काळेपणा, इ० ( हे प्रत्यय सर्व विशेषणांस लागतात ).

गिरी—लुच्चेगिरी, गुलामगिरी.

आ—ताठा, गारठा.

आई—भलाई, धिटाई, दांडगाई, थंडाई.

ई--गरीबी, लांबी, रुंदी, उंची, जाडी, खुशी, फकीरी, बादशाही.

की-फुशारकी, माणुसकी, पाटिलकी.

वा, वी—गारवा, थंडावा, गोडवा, थोरवी [ क्वचित् थोरीव ].

शाई--लंगडशाई.

ओपा—एकोपा.

ण--दाटण, कडण.

आयत—बागायत, कबुलायत.

**१९५. मराठी साधित शब्दः-१- धातूंपासून झालेले शब्द**-पुढील प्रत्ययांनीं कर्तृदर्शक, स्वभावदर्शक किंवा क्रियादर्शक शब्द होतातः—

अ--नट, खिकाळ, हेर.

आ किंवा या—नाच्या, खेळ्या, खेळा, लंगडा, नवशिका, नवशिक्या, झरा, ओटा.

आळ--चोखाळ, ओढाळ, वाचाळ, खोड्याळ.

आळू—लाजाळू, झोंपाळू, भुकाळू, मायाळू.

आऊ, णाऊ--विकाऊ, जळाऊ, पाळाऊ, लढाऊ, ठेवणाऊ, खाणाऊ, पिकाऊ.

ईक--खर्चीक, सोशीक, लवचीक.

का—मारका, बोलका, जळका, फाटका, धडका, चुरका, बुजका.

रा—लाजरा, धांवरा, शिवरा, कांपरा, खुपरा, (-री, स्त्री०) चावरा, फेंदरा.

री—रंगारी, पुजारी, लोणारी, ओतारी.

या, वय्या—विक्या, उपट्या, उचल्या, लढवय्या, गवय्या ( गवई ).

ईव--जाणीव [ ज्ञान ], घडींव, ओतीव, नेणींव.

ईत--लखलखीत, चकचकीत, चिवचिवीत, झगझगीत, पिचपिचीत, पचपचीत.

ता, णार, णारा--या प्रत्ययांनीं, कर्तृदर्शक नामें आणि विशेषणे होतात; उदा०:--मारता, नाचता, मारणार, मारणारा.

ला, ली, लें—यांनीं भूतकालवाचक विशेषणें होतात. धातु सकर्मक असतां हीं कर्मणि असतात; उदा०:—वाळलें, वाळलेलें; मारलें, मारलेलें; जळलें, जळलेलें; केलें, केलेलें; प्यालें, प्यालेलें; वसलेला, असला, इ०.

(२) पुढील प्रत्ययांनींही भूतकाळच्या विशेषणांसारखे शब्द होतात.

आ—दुवा.
ईव—घडींव, पाळींव, ओतींव.
ईत—पडीत, विस्कळीत.
ईर—फुगीर, फुटीर.
ईल, ईक—छापील, पढीक.
ट—कुजट, धुपट, खारट, बनावट.

(३) पुढील प्रत्ययांनीं निरनिराळ्या अर्थांचीं क्रियावाचक नामें होतात:—

अ—मार, बोल, धांव, मारामार, धांवाधांव, धराधर.
अवा, आवा—आढावा, वाढवा, बोलवा, ओलावा.
आ—ठेंचा, भरडा, ठेवा, झगडा, घेरा, ठोका, चावा, हिसका.
आई—चढाई, बढाई, लढाई.
आट—गडगडाट, कलकलाट, लकलकाट.
आव—चढाव, पाडाव, ठराव, शिरकाव.
ई—बुडी, उडी, थुंकी.
ण—चाळण, तळण, दळण, चढण, जळण
णा—पाळणा, चोळणा, झोळणा.
णी—लेखणी, चाळणी, जुळणी, करणी, पाहणी, पेरणी, कापणी, मिळवणी.
णूक—करमणूक, जाचणूक, वर्तणूक, मिरवणूक.
णें—करणें, बोलणें, चालणें, निजणें, उठणें.
ती—वसती, भरती, गणती, खणती, बढती.
प—वाढप, माप, हडप.
वण—वाढवण, कालवण, आंचवण.
ऊं, एँ—हसूं, रडूं, हँसें, रडें.
णावळ—खाणावळ, दळणावळ, धुणावळ.

## २–विशेषणांपासून झालेले शब्द.

**( १ ) सर, का, रा, ला, गा,** यांपासून त्या विशेषणानें प्रदर्शित असा, थोडा गुण यांत आहे, असा अर्थ होतो; उदा०:—वेडसर, पिंवळसर, थोडका, सोपारा, थोरला, लहानगा.

**( २ ) अट, आट, आड, ट, वट,** यांनींही तशाच अर्थाचे शब्द होतातः—लबाड, जुनाट, हलकट, पिंवळट, पिंगट, खोलगट, पिसट, भोळसट, भोळवट, कडवट.

**( ३ ) वाणा, सा,** हे प्रत्यय सारखेपणा किंवा कमीपणा दाखवितातः—दीनवाणा, लाजिरवाणा, गोजिरवाणा, लहानसा, थोडासा, मोठासा.

## ३–नामांपासून होणारे शब्द.

**( १ ) अल्पत्वदर्शक नामें**—कांहीं नामांस कित्येक प्रत्यय लागून त्या नामांनीं दर्शित असा लहानसा पदार्थ अशा अर्थाचीं नामें होतात. हे प्रत्यय आणि त्यांचीं उदाहरणें:— ( १ ) अ आणि आ या अंतांचीं पुल्लिंगी नामें ईकारान्त स्त्रीलिंगी करून असा अर्थ आणितात; उदा०:—डोंगर, डोंगरी; गडवा, गडवी, ( गडू, पु० ); विळा, विळी; वाडा, वाडी; टेकाड, टेकडी; पळी; वाटी; कुंडी; इ०.

( २ ) कांहीं अकारान्त व एकरान्त नपुंसकलिंगी नामें अशींच अल्पत्व-दर्शक करितात; जसें,—पीठ, पिठी; तपेलें, तपेली; बोगणें, बोगणी; टोपलें, टोपली.

**अली**—दिवा, दिवली; कुंचा, कुंचली; सूप, सुपली.

**डी**—पलंग, पलंगडी; लाल, लालडी; तबक, तबकडी.

**कली, कुली, गुली**— चांद, चांदुकली; चिंधी, चिंधुकली; धनुकली; घरकुली; भातुकली; बेटकुली; कणगुली; बुचुकली; बुचकुली.

**रूं**—पाखरूं, शिंगरूं, वासरूं, मेंढरूं, कोंकरूं.

( ३ ) पुढील प्रत्ययांनीं नामांपासून अनेक अर्थाचीं विशेषणें होतात:—

**कट, ट**—मेन [ ण ] कट, वळकट, मळकट, चिवट, हेकट, तेलकट, तुपट.

**आर**—[ तें किंवा, तत्संबंधीं काम करणारा ]—सोनार, कुंभार, सुतार, लोहार, चांभार.

**आरी**—[ तसाच अर्थ ]— चितारी, भुसारी, ओतारी.

वट, ट—पाथरवट, तांबट.

डी, ड्या—नावाडी, वाटाड्या, सोंगाड्या.

अळा—हिंवाळा, उन्हाळा, पावसाळा.

आळू, आळ—झोंपाळू, भुकाळू, लाजाळू, स्नेहाळ, फेंसाळ, पाठाळ, हाताळ, तोंडाळ, घायाळ.

ई—पैठणी, तांबोळी, शिंपी, गुलाबी, हौशी, सरकारी, कोंकणी, बंगाली, मराठी, मुसलमानी.

या—सोन्या, थाप्या, वायक्या, धांदल्या.

र, रा, री, रें—हातेर, सासर, पायरी, पेटारी, पेटारा, वातेरें, पीतेरें.

वट—रानवट, गहाणवट, माळवट, तळवट.

स, सा, शी—डोळस, गोंडस, पाडस, धाडशी, मुंडासा (पागोटें), जिवस, सकस.

गा, गी—पानगा, पानगी; लहानगा, लहानगी; कणगा, कणगी ( कणंग ).

वाला, वान—घरवाला, दूधवाला, गाडीवाला, गाडीवान, बागवान.

ळ, आळ—देवळ, देऊळ, घड्याळ.

डा, डी—कोनाडा, हातोडा, हातोडी, शेंगडी, राखुंडी.

रडा—शिपुरडा, म्हातारडा, सोनारडा.

वटा, वठा—मुखवटा, लाखोटा, गारवठा, गारठा, पानवठा.

वडा, वाडा—पोरवडा, म्हारवडा, मेंढवाडा.

कर, करी—खेळकर, खोडकर, हेलकरी, देणेकरी.

मंत, वंत—बुद्धिवंत, बुद्धिमंत, श्रीमंत, यशवंत, भाग्यवंत.

नणी—( तसलें पाणी या अर्थी ) गुळवणी, चिंचवणी, मिठवणी.

एल—( तेल या अर्थी ) खोबरेल, धुपेल, उदेल, मोगरेल.

चट—( तशी चव या अर्थी ) गुळचट, पानचट, मेणचट.

ष्ट, इष्ट—कोपिष्ट, रागिष्ट ( रागीट ), गर्विष्ट, भ्रमिष्ट.

री—एकेरी, दुहेरी, तिहेरी, कणेरी ( कण्हेरी ), सोनेरी, रुपेरी.

त्रा—एकोत्रा, दुहोत्रा, तिहोत्रा.

दा—पाचुंदा, पोशिंदा.

सूचनाः—साधित शब्दांच्या संबंधाची जास्त मांहिती येथें सांगणें अशक्य आहे. ती शिक्षकांनीं मुलांचे योग्यतेप्रमाणें वेळोवेळीं तसले शब्द वाचनाच्या पुस्तकांत येतील तेव्हां तोंडीं सांगावी.

## २९–व्याकरण करणें.

१९६. **व्याकरण करणें**, अथवा '**व्याकरण चालविणें**' म्हणजे एकाद्या वाक्यांतील प्रत्येक शब्दाची अथवा त्यांतील कोणत्याही शब्दाची व्याकरणसंबंधीं सर्व माहिती सांगणें. उदाहरणार्थ, नाम असल्यास नामाची जात, लिंग, वचन, विभक्ति आणि विभक्तीचा संबंध कोणीकडे आहे हें; विशेषण असल्यास त्याचें विशेष्य; सर्वनाम असल्यास त्याची जात, तें कोणत्या नामाबद्दल आलें आहे हें आणि इतर माहिती नामाप्रमाणें; क्रियापद असल्यास त्याची जात, काळ, पुरुष, लिंग, वचन, वगैरे प्रकार; अव्यय असल्यास त्याची जात, संबंध इत्यादि.

( १ ) व्याकरण करण्यासाठीं पूर्ण वाक्य दिलें असल्यास त्याची जात वगैरे सांगून पुढें त्यांतील कर्ता, उद्देश्य, कर्म, क्रियापद, प्रयोग, ह्या सर्व गोष्टी सांगाव्या. मग त्यांतला एकेक शब्द निराळा घेऊन व्याकरण करावें.

( २ ) सर्व वाक्य चालविण्यासाठीं न देतां एकाद दुसराच शब्द दिला असल्यास त्या शब्दापुरतीच सर्व माहिती सांगावी जास्त कांहीं सांगूं नये.

१९७. ह्या गोष्टी नीट समजण्यासाठीं कांहीं वाक्यें घेऊन त्यांतील प्रत्येक शब्दाचें व्याकरण करून दाखवितों:—

**वाक्य पहिलें—"गोविंदरावांचा थोरला मुलगा हरी दररोज सकाळीं लौकर उठून आपलें दप्तर घेऊन शाळेस शिकावयास जातो.**" हें शुद्ध वाक्य आहे. यांत 'मुलगा' हा कर्ता आणि 'जातो' हें क्रियापद. हा कर्तरिप्रयोग.

**गोविंदरावांचा**—हें 'गोविंदराव' या विशेषनामाच्या षष्ठीचें अनेकवचन; ह्याचा संबंध 'मुलगा' याजकडे. हें आदरार्थी अनेकवचन आहे.

**थोरला**—हें गुणविशेषण; याचें विशेष्य 'मुलगा'.

**मुलगा**—हें 'मुलगा' या पुल्लिंगी सामान्यनामाचें प्रथमेचें एकवचन; या प्रथमेचा अर्थ कर्ता, 'जातो' या क्रियापदाचा.

**हरी**—हें विशेषनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश, 'मुलगा' याजकडे.

**दररोज**—हें कालवाचक क्रियाविशेषण अव्यय; याचा संबंध 'उठून' याकडे. हा अव्ययीभाव समास आहे.

**सकाळीं**—हें ' सकाळ ' या स्त्रीलिंगी सामान्यनामाचें सप्तमीचें एकवचन; ही कालार्थी सप्तमी.

**लौकर**—हें क्रियाविशेषण अव्यय; याचा संबंध ' उठून ' या धातु-साधित अव्ययाकडे.

**उठून**—हें भूतकालवाचक धातुसाधित अव्यय; याचा संबंध ' जातो ' याजकडे.

**आपलें**—हें सर्वनामात्मक गुणविशेषण; याचें विशेष्य ' दप्तर. '

**दप्तर**—हें सामान्यनाम, नपुंसकलिंगी, द्वितीयेचें एकवचन; अर्थ कर्म, ' घेऊन ' या धातुसाधिताचें.

**घेऊन**—हें भूतकालवाचक धातुसाधित अव्यय; याचा संबंध ' जातो ' या क्रियापदाकडे.

**शाळेस**—हें ' शाळा ' या स्त्रीलिंगी सामान्यनामाचें चतुर्थीचें एकवचन; ही स्थलार्थी चतुर्थी.

**शिकावयास**—हें क्रियावाचक अव्यय; याचा संबंध ' जातो ' या क्रियापदाकडे.

**जातो**—हें कर्तरि, अकर्मक क्रियापद; ' जा ' या धातूचें वर्तमानकाळीं, पुल्लिंगी तृतीयपुरुषाचें एकवचन.

**वाक्य दुसरें**—" **मी उद्यां जरूरीच्या कामासाठीं गांवाला जाणार आहें, असें रामानें मला सांगितलें.** " हें मिश्रवाक्य आहे. यांत पहिलें नामवाक्य असून त्याचा ' असें ' याच्याकडे उद्देश आहे. पहिल्या वाक्याचा कर्तरिप्रयोग आणि दुसऱ्याचा कर्मणिप्रयोग. पहिल्या वाक्यांत ' मी ' हा कर्ता, ' आहे ' हें क्रियापद; दुसऱ्या वाक्यांत ' रामानें ' हा कर्ता, ' असें ' हें कर्म व उद्देश्य आणि ' सांगितलें ' हें क्रियापद.

**मी**—प्रथमपुरुष सर्वनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ कर्ता, ' आहें ' या क्रियापदाचा.

**उद्यां**—हें कालवाचक क्रियाविशेषण अव्यय; याचा संबंध ' जाणार ' या धातुसाधित अव्ययाकडे.

**जरूरीच्या**—हें ' जरूरी ' या स्त्रीलिंगी भाववाचक नामाच्या षष्ठीचें एकवचनी सामान्यरूप; ' कामासाठीं ' या सविभक्तिक संबंधीशब्दामुळें.

**कामासाठीं**—' काम ' सामान्यनाम, नपुंसकलिंगी सामान्यरूप ' साठीं ' या शब्दयोगी अव्ययाच्या योगानें.

**गांवाला**—हें ' गांव ' या पुल्लिंगी सामान्यनामाच्या चतुर्थीचें एकवचन; ही स्थलार्थी चतुर्थी.

**जाणार**—हें भविष्यकालवाचक विधिविशेषण; याचें विशेष्य ' मी '.

**आहें**--हें कर्तरि, अकर्मक क्रियापद. धातु, ' अस ' वर्तमानकाळीं, प्रथमपुरुषाचें एकवचन. याचा कर्ता ' मी '.

**असें**—हें दर्शक सर्वनामात्मक विशेषण; याचें विशेष्य मागील नामवाक्य; नपुंसकलिंगी प्रथमेचें एकवचन; हें ' सांगितलें ' याचें उद्देश्य, मूळचें कर्म.

**रामानें**—'रामा' या पुल्लिंगी विशेषनामाचें तृतीयेचें एकवचन; अर्थ कर्ता, ' सांगितलें ' या क्रियापदाचा.

**मला**—हें ' मी ' या प्रथमपुरुष सर्वनामाच्या चतुर्थीचें एकवचन; अर्थ संप्रदान.

**सांगितलें**—हें कर्मणि, सकर्मक क्रियापद. धातु ' सांग ' भूतकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषाचें एकवचन. याचा ' रामानें ' हा कर्ता आणि ' असें ' हें कर्मपद उद्देश्य.

**वाक्य तिसरें—" विद्या हें मनुजास रूप बरवें, कीं झांकलें द्रव्य ही. "** हीं दोन वाक्यें असून दोन्ही मिळून एक संयुक्तवाक्य झालें आहे. प्रत्येक वाक्यांत आहे हें क्रियापद अध्याहृत[3] आहे, आणि प्रत्येकीं कर्तरिप्रयोग आहे.

**विद्या**—सामान्यनाम, स्त्रीलिंगी प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश ' हें ' याजकडे.

**हें**—हें ' रूप ' याचें दर्शकसर्वनाम, नपुंसकलिंगी प्रथमेचें एकवचन; अर्थ कर्ता, ' आहे ' या अध्याहृत क्रियापदाचा.

**मनुजास**—' मनुज ' सामान्यनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचें एकवचन; ही स्वामित्वदर्शक चतुर्थी.

---

१ लिंगाप्रमाणें न फिरणाऱ्या क्रियापदाचें लिंग सांगण्याची जरूरी नाहीं.

२. जेथें लिंगनिर्णय होत नाहीं तेथें लिंग सांगूं नये.

३. अध्याहृत शब्दाचें व्याकरण चालवून दाखविण्याची गरज नसते.

रूप—सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश 'हें' याजकडे.

वरवें—हें गुणविशेषण; याचें विशेष्य 'रूप.'

कीं—पक्षांतरबोधक उभयान्वयी अव्यय. याच्या योगानें संयुक्त वाक्यांतील दोन्ह वाक्यें जोडलीं आहेत.

झांकलें—हें भूतकालवाचक कर्मणि विशेषण; याचें विशेष्य 'द्रव्य'.

द्रव्य—सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश 'हें' याजकडे.

ही—अवधारणाबोधक उभयान्वयी अव्यय.

**वाक्य चौथें—"माझ्या भावानें मला सातव्या वर्षी शाळेंत इंग्रजी शिकावयास पाठविलें."** हें शुद्ध वाक्य आहे. यांत भावानें हा कर्ता, 'मला' हें कर्म, पाठविलें हें क्रियापद, या वाक्याचा भावेप्रयोग आहे.

माझ्या— हें 'मी' या प्रथमपुरुष सर्वनामाच्या षष्ठीचें सामान्यरूप. सविभक्तिक संबंधी शब्दामुळें.

भावानें—हें 'भाऊ' या सामान्यनामाचें तृतीयेचें एकवचन; अर्थ कर्ता, 'पाठविलें' या क्रियापदाचा.

मला—प्रथमपुरुष सर्वनाम, द्वितीया विभक्ति, अर्थ कर्म, 'पाठविलें' या क्रियापदाचें.

सातव्या—हें 'सातवें' या क्रमवाचक संख्याविशेषणाचें सामान्यरूप;* 'वर्षी' हें विशेष्य सविभक्तिक आहे म्हणून.

वर्षी—हें 'वर्ष' या नपुंसकलिंगी सामान्यनामाच्या सप्तमीचें एकवचन; ही कालार्थी सप्तमी.

शाळेंत—हें 'शाळा' या स्त्रीलिंगी सामान्यनामाचें सामान्यरूप, 'आंत' या सप्तमीच्या शब्दयोगी अव्ययामुळें. ही स्थलार्थी सप्तमी.

इंग्रजी—हें विशेषनाम, नपुंसकलिंगी, द्वितीयेचें एकवचन, अर्थ कर्म, 'शिकावयास' याचें.

---

टीप—प्राचीनकाळ असा एक शब्द हवा तर घ्यावा.

* विशेषणाचा उपयोग नाम किंवा सर्वनाम याप्रमाणें झाला असतां तें नामाप्रमाणें चालवावें.

**शिकावयास**—हें क्रियावाचक धातुसाधित अव्यय. याचा संबंध 'पाठविलें' या क्रियापदाकडे.

**पाठविलें**—हें भावी, सकर्मक क्रियापद; पाठव धातु; भूतकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषाचें एकवचन; कर्ता 'भावानें,' कर्म 'मला.'

**वाक्य पांचवें**—"**प्राचीन काळीं भरतखंडांत कालिदास नांवाचा कवि होऊन गेला. त्यानें शाकुंतल म्हणून एक उत्तम नाटक संस्कृत भाषेंत लिहिलें आहे.**" यांत दोन वाक्यें आहेत. पहिल्या वाक्याचा कर्तरिप्रयोग, दुसऱ्याचा कर्मणिप्रयोग.

**प्राचीन**—हें 'काळ' याचें विशेषण.

**काळीं**—हें 'काळ' या पुल्लिंगी सामान्यनामाचें सप्तमीचें एकवचन; ही कालार्थी सप्तमी.

**भरतखंडांत**—'भरतखंड' हें सामासिक विशेषनाम, नपुंसकलिंगी सामान्यरूप, 'आंत' या स्थलदर्शक शब्दयोगी अव्ययाच्या योगानें.

**कालिदास**—विशेषनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन, अर्थ उद्देश, 'नांव' याकडे. (या शब्दाचा येथें विशेषणासारखा उपयोग आहे. 'कालिदास' हें किंवा असें नांव.)

**नांवाचा**—'नांव' याची षष्ठी, संबंध 'कवि' याकडे.

**प्रख्यात**—'कवि' याचें विशेषण.

**कवि**—सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ कर्ता, 'गेला' या क्रियापदाचा.

**होऊन**—हें 'हो' धातूचें भूतकालवाचक धातुसाधित अव्यय, याचा संबंध 'गेला' या क्रियापदाकडे.

**गेला**—हें कर्तरी, अकर्मक क्रियापद. 'जा' या धातूचें भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीयपुरुषाचें एकवचन; 'कवि' कर्ता.

**त्यानें**—'तो' याची तृतीया. अर्थ कर्ता 'लिहिलें' याचा.

**शाकुंतल**—विशेषनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन; अर्थ उद्देश, 'नाटक' याकडे.

**म्हणून**—[ म्हटलेलें ] धातुसाधित विशेषण, याचें विशेष्य 'नाटक'.

**एक**—संख्यावाचक विशेषण, विशेष्य 'नाटक'.

**उत्तम**—नाटक याचें गुणविशेषण.

**नाटक**—सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन. अर्थ उद्देश, ' लिहिलें आहे ' याचें मूळचें कर्मपद.

**संस्कृत**—हें भाषेचें विशेषण.

**भाषेंत**— ' भाषे ' हें भाषा याचें सामान्यरूप; ' आंत ' हें सप्तमीचें शब्दयोगी अव्यय.

**लिहिलें आहे**—हें कर्माणि, सकर्मक, संयुक्त क्रियापद; पूर्णवर्तमानकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन, ' त्यानें ' हा कर्ता. ' नाटक ' हें उद्देश्य, मूळचें कर्मपद.

टीप—'लिहिलें आहे' यांतील 'लिहिलें' हें मूळचें कर्मणि धातुसाधित विशेषण आहे. तें निराळें घेऊन व्याकरण केलें तरी चालेल. मग ' आहे' येवढेंच क्रियापद करून कर्तरि-प्रयोग करावा. 'आहे' याचा कर्ता नाटक; ' लिहिलें ' हें ' नाटक ' याचें कर्मणि-विशेषण.

१९८. आतां आणखी कांहीं वाक्यें घेऊन व्याकरण कसें करावें हें सांगतों. पण आतां प्रत्येक शब्दाचें पूर्ण व्याकरण न करितां कठीण किंवा महत्वाच्या शब्दांचें मात्र व्याकरण थोडक्यांत सांगूं.

( १ ) **हरी ओटीवर पुस्तक वाचीत बसला आहे.**— या वाक्यांत **हरी** हा कर्ता, **वाचीत बसला** हें **हरी** याचें क्रियाविशेषण. **पुस्तक** द्वितीया विभक्ति, अर्थ कर्म, **वाचीत** या धातुसाधित अव्ययाचें. **ओटी-वर**—**ओटी** हें सामान्यरूप, **वर** या शब्दयोगी अव्ययाच्या योगानें.

( २ ) **मी चाकूनें ही लेखणी करीत आहें.**— हा कर्तरिप्रयोग. **लेखणी** हें **करीत** याचें कर्म; **करीत** हें **मी** याचें विधिविशेषण; किंवा **करीत आहें** एवढें संयुक्त क्रियापद, अपूर्ण वर्तमानकाळ. **चाकूनें** तृतीयेचें एकवचन, अर्थ करण. **ही** हें दर्शक सर्वनामात्मक विशेषण, याचें विशेष्य **लेखणी**.

( ३ ) **ही कथा मीं आज श्रवण केली.**— हा कर्मणिप्रयोग. **मीं** हा कर्ता, **कथा** हें कर्म व उद्देश्य; **केली** हें क्रियापद, **कर** धातूचा भूतकाळ; **आज**—कालवाचक क्रियाविशेषण अव्यय; **श्रवण** हें विशेषण, याचें विशेष्य **कथा**.

( ४ ) **तो मौज पाहात पाहात आला.**— **मौज** हें **पाहात** या

धातुसाधित अव्ययाचें कर्म; **पाहात पाहात**—वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय, **आला** या क्रियापदाकडे संबंध. **आला** हें क्रियापद, ये या अकर्मक धातूचें भूतकाळाचें तृतीयपुरुषाचें एकवचन. या क्रियापदाचा कर्ता **तो**.

**( ५ ) आई मुलास जेवूं घालीत असेल.**—**मुलास** चतुर्थी, अर्थ संप्रदान; **जेवूं** ( जेवण ) क्रियावाचक नाम, द्वितीयेचें एकवचन, अर्थ कर्म, **घालीत** या धातुसाधित विशेषणांतील **घाल** धातूचें; **असेल** क्रियापद; कर्ता **आई**.

**( ६ ) माझा बाप आज मुंबई येथें जाणार आहे.**—**माझा** हें संबंधी विशेषण, याचें विशेष्य **बाप**; **मुंबई** द्वितीयेचें एकवचन, अर्थ उद्देश, **येथें** या स्थलवाचक अव्ययाकडे; **जाणार आहे** संयुक्त क्रियापद, उद्देश-वर्तमानकाळ.

**( ७ ) तुला हें काम केलें पाहिजे, अथवा करावें लागेलसें मला वाटतें.**—यांत **काम** हा **पाहिजे** किंवा **लागेल** या क्रियापदाचा कर्ता; **केलें** हें कर्मणि विधिविशेषण, याचें विशेष्य **काम**; **लागेलसें**–**लागेल असें**; **असें** हें मागील वाक्याचें विशेषण, प्रथमेचें एकवचन, अर्थ कर्ता, **वाटतें** या क्रियापदाचा.

**( ८ ) मला बोलावयास किंवा बोलतां येतें.**— यांत **बोलावयास** किंवा **बोलतां** हें क्रियावाचक नाम, अर्थ कर्ता, **येतें** या क्रियापदाचा.

**( ९ ) "करूं ये समाधान जो मूर्ख त्याचें."**—**करूं** हें क्रियावाचक अव्यय; **समाधान** प्रथमेचें एकवचन; अर्थ कर्ता, **ये** या क्रियापदाचा. **जो** प्रथमेचें एकवचन, अर्थ कर्ता, **आहे** या अध्याहृत क्रियापदाचा. **मूर्ख** हें विधिविशेषण.

**( १० ) तूं जावें असें मीं कालच नाहीं कां सांगितलें ? मग आतां मला कां विचारतोस ?**—**तूं** हें **तूं** या द्वितीयपुरुष सर्वनामाच्या तृतीयेचें एकवचन; हें **जावें** याचें कर्तृपद; **जावें** क्रियापद—**जा** या अकर्मक धातूचें विध्यर्थी नपुंसकलिंगी तृतीयपुरुषाचें एकवचन, हा भावेप्रयोग; **नाहीं कां सांगितलें**–**सांगितलें नाहीं काय ?** **सांगितलें** कर्मणि विशेषण, **कां**—प्रश्नार्थक क्रियाविशेषण अव्यय; **विचारतोस**—याला कर्ता **तूं** ( अध्याहृत ), कर्म, **असें** ( अध्याहृत ); कर्तरिप्रयोग.

(११) 'तो परत, आल्यावर मला कळीव.'—यांत आल्यावर यामध्यें आला व यावर असे निराळे शब्द घ्यावे. 'तो परत आल्याचें मला कळीव;' यांत आल्याचें हें क्रियावाचक नाम, कळीव याचें कर्म; किंवा आला एवढें क्रियापद व याचें हें क्रियावाचक नाम; याचें म्हणजे याचें वर्तमान असा अर्थ.

(१२) बाजीरावास पुणें द्यावें लागलें.—यांत पुणें हा लागलें याचा कर्ता; द्यावें हें पुणें याचें विध्यर्थक विशेषण.

(१३) तो आपल्या मुलांस माझ्या स्वाधीन करी ना.—यांत मुलांस हें करी याचें कर्म; स्वाधीन हें मुलांस याचें विधिविशेषण; करी हें क्रियापद; ना हें निषेधार्थक क्रियाविशेषण अव्यय; माझ्या हें संबंधी विशेषण, येथें याचा उपयोग क्रियाविशेषणासारखा आहे.

(१४) असें म्हणून तो जाता झाला.—यांत असें हें म्हणून याचें कर्म; जाता हें तो याचें धातुसाधित विधिविशेषण; व झाला हें क्रियापद; किंवा जाता झाला हें संयुक्तक्रियापद; पूर्णभूतकाळ.

(१५) असें बोलूं न ये.—यांत बोलूं हें क्रियावाचक नाम, हा ये या क्रियापदाचा कर्ता; ये येवढें क्रियापद; न हें अव्यय.

(१६) मला मुंबईस जावयाचें आहे.—यांत जावयाचें हें क्रियावाचक नाम, आहे याचा कर्ता.

(१७) हें पुस्तक मला अजून वाचावयाचें आहे.—यांत पुस्तक हा आहे याचा कर्ता; वाचावयाचें क्रियावाचक विशेषण. अशा वाक्यांत धातु सकर्मक असतां धातुसाधिताचें रूप विशेषण असतें; आणि अकर्मक असतां नाम असतें.

(१८) तुला [किंवा तूं] असें करून चालणार [किंवा चालावयाचें] नाहीं.—तुला [चतुर्थी] किंवा तूं [तृतीया] करून याचें कर्तृपद; असें—करून याचें कर्म; करून—क्रियावाचक नाम, नाहीं याचा कर्ता; चालणार—हें क्रियापदाबरोबर घ्यावें अथवा निराळें विधिविशेषण करावें; चालावयाचें विधिविशेषण, करून याचें

(१९) आम्ही सारी वाट बोलत बोलत आलों—वाट म्हणजे वाट-भर ही स्थलार्थी किंवा अंतर दाखविणारी द्वितीया; आलों

हें अकर्मक क्रियापद आहे, तरी **वाट** हें स्थलवाचक नाम त्याचें कर्म करावें. **तो रानें वनें हिंडला**—यांत **रानें वनें** हें अशाच तऱ्हेचें कर्मपद आहे. **बोलत बोलत**, धातुसाधित विशेषण.

( २० ) '**विश्वासराव लढाईंत मारिला गेला**'—येथें **मारिला गेला** एवढें क्रियापद करावें, अथवा **मारिला** हें विशेषण करावें. '**बोलता झाला**,' '**करिता झाला**,' हे अशाच तऱ्हेचे उपयोग आहेत.

---

## ३०–कवितेंतील व्याकरण-विशेष.*

१९९. साध्या भाषेंतल्यापेक्षां कवितेमध्यें शब्दांचीं रूपें वगैरे बरींच निराळ्या तऱ्हेनें घालण्याची चाल आहे. हा प्रकार मोठ्या व्याकरणांत जेथल्या तेथें सांगितला असतो. हा लहान मुलांच्या व्याकरणांत सांगणें अशक्य आहे. तथापि मुलांना कविता शिकवितात, म्हणून कवितेंतल्या व्याकरणाचे थोडे निवडक विशेष प्रकार येथें सांगतों.

( १ ) गद्यभाषेपेक्षां पद्यांत संस्कृत शब्द फार येतात; तसेच नेहमीं प्रचारांत नसणारे जुने शब्दही येतात. हे शिक्षकांनीं मुलांस जेथच्या तेथें निराळे काढून सांगावे.

( २ ) शब्दामध्यें कोठेंही आलेले नेहमीं ऱ्हस्व असणारे स्वर जरूर पडल्यास दीर्घ करावे किंवा दीर्घ असणारे ऱ्हस्व करावे, अशी कवींची चाल आहे. पण हे फेरफार व्याकरणांत सामान्यरूप होऊन किंवा कसलेंही रूप होऊन जे स्वर आले असतील, तेथें मात्र करितात. शब्दाचा मूळचा स्वर कोणत्याही कारणानें फिरत नसल्यास तो चांगले कवि मुद्दाम कधीं फिरवीत नाहींत. उदाहरणार्थ, 'गुरूचा' यांतला पहिला ऱ्हस्व 'उ' बहुधा कोणी दीर्घ करणार नाहीं, पण दुसरा दीर्घ 'ऊ' हा मूळचा ऱ्हस्व असलेला दीर्घ झाला आहे, तो

---

* हें प्रकरण सहाव्या इयत्तेस शिकवावें.

हवा तर ऱ्हस्व करून 'गुरुचा' असें लिहितील. मात्र हा नियम कवि अक्षरशः पाळितात असें नाहीं.

(३) ज्यामध्यें व्यंजन नाहीं, अशा शब्दाच्या आरंभींचा 'अ' कार किंवा 'आ' कार सोयीप्रमाणें ऱ्हस्व-दीर्घ लिहितात; जसें,— अंठवण, आंठवण; इत्यादि.

(४) झाल्या, केल्या, त्याच्या, माझ्या, तुझ्या, हीं रूपें झालिया, केलिया, त्याचिया, माझिया, तुझिया, तूझिया, अशीं लिहितात; 'त्या' आणि 'ज्या' यांबद्दल 'तया' आणि 'जया' घालितात; जीस, जिनें, तिनें, यांबद्दल जियेस, जयेनें, तियेस, तियेनें असें घालितात.

(५) करून, पाहून; करूं, पाहूं; यांबद्दल करोन, पाहोन; करों, पाहों; करुनी, करूनी, करोनी; इत्यादि अशीं रूपें येतात.

(६) अकारान्त पुल्लिंगी शब्दाचें प्रथमेचें एकवचनी रूप ऊकारान्त व क्वचित् ओकारान्त लिहितात; जसें,—नाश, नाशू, नाशो; वसंत, वसंतू, वसंतो; नाथ, नाथू, नाथो; भाव, भावू, भावो; सागर, सागरू; मनोरथ, मनोरथू; इत्यादि.

२००. हे सर्व प्रकारच्या शब्दांमध्यें सामान्यतः होणारे फेरफार सांगितले. आतां निरनिराळ्या जातींच्या शब्दांचे कित्येक विशेष फेरफार सांगतों:—

## नामें.

(१) विभक्तीनें दाखवावयाचा संबंध विभक्तिप्रत्ययाचा लोप करून केवळ सामान्यरूपानें दाखवितात. अशा रितीनें हवी ती विभक्ति करितात; उदा०:—'रूपास भुलला' याबद्दल 'रूपा भुलला;' 'त्यास देई' याबद्दल 'त्या देई;' इ०. सर्व विभक्तींचीं अशा प्रकारचीं उदाहरणें मोठ्या व्याकरणांत पाहावीं.

( २ ) प्रत्येक विभक्तीचे पुढें सांगितलेले प्रत्यय बहुधा कवितेंतच फार येतातः—

| विभक्ति. | प्रत्यय. | उदाहरणें. |
|---|---|---|
| प्रथमा | ऊ, ओ. | अर्जुनू, दशरथू, नाथो, नाथू, भावो, इ० |
| द्वितीया | तें. | जनातें, त्यातें. |
| तृतीया | एँ, हीं, ईं. | जनें, जनांहीं, जनीं. |
| सप्तमी | इँ, आं. | हातीं, माथां. |

## सर्वनामें.

( ३ ) ती, ही, जी, यांबद्दल ते, हे, जे; त्यास, त्यानें, यांबद्दल तयास, तयानें; तीस, तिनें, यांबद्दल तियेस, तियेनें; ज्यास, ज्यानें, यांबद्दल जयास, जयानें; त्वां, म्यां, यांबद्दल तुवां, मियां, असे फेरफार करितात. ‘ कोण ’ याबद्दल ‘ कवण ’ घालितात.

## क्रियापदें.

( ४ ) मागें जुना वर्तमानकाळ म्हणून जो सांगितला आहे, तो कवितेंत फार येतो; व कवितेंत वर्तमानकाळाचें रूप करणें झाल्यास असेंच करावें, अशी रीत आहे; उदाहरण—‘ जातो ’ याबद्दल ‘ जाई; ’ ‘ करितात ’ याबद्दल ‘ करिती; ’ इत्यादि.

( ५ ) या वर्तमानकाळाचा कवितेंत भूत किंवा भविष्य काळाच्या अर्थींही उपयोग करितात; उदाहरणार्थ—“ मंत्रजप करूनि तो कवि, ये रे वत्सा कचा, असें बाहे; ( भूत ) भेदुनि वृकोदरें पल सर्व निघे त्यांत लेशहि न राहे ( भूत ); ” **मोरोपंत.** “ सर्वेश्वरार्पणविधी करुनी अगण्यें, केलीं जरी **असति** कीं बहुजन्म पुण्यें ” ( भविष्य ); **वामन.**

( ६ ) आज्ञार्थाच्या द्वितीय पुरुषाच्या एकवचनाचीं रूपें जी कर, घे, जा, यांबद्दल कवितेंत करीं, घेईं, जाईं, असें घालितात.

(७) कवि वर्णन करावयाच्या भरांत पुष्कळदां भूतकाळीं वर्णन करावयाचें सोडून जशी काय गोष्ट आतांच चालू आहे असें वर्तमानकाळीं वर्णन करितात; जसें,—“ भीम **विदारी** खड्गें सहज परम कठिण शत्रुचें उर तें; वाटे पविपातींही त्या साध्वीला न गांजितां उरतें. ” “ जातां स्वर्गी **मिरविती** निजगुरुसुतरत्न देव यानीं ते; **वर्णिति** दैत्यांतें किति, किति कवितें, कितिक देवयानीतें. ” “ सलील तइं मंदराख्य हि नग स्वपृष्ठीं **धरा.** ” “ वनोवनिं **फिरा** पिशापरि **म्हणा** अहोरात्र हा. ” मोरोपंत.

(८) क्रियापदाच्या रूपांत प्रत्ययाचे अगोदर ‘ ज ’ (क्वचित् ‘ य ’) घालून केलेलीं सर्व काळांचीं कर्मणि व भावी रूपें जुन्या मराठी भाषेंत करीत असत; तीं रूपें कवितेंत आढळतात; जसें,—कीजशी, करिजती, बोलिजेतो, धरिजेले, धरियले, धरिजेतील, लिहिजेल, जाइजे, बसिजे, इत्यादि.

## अव्ययें.

(९) कित्येक अकारान्त अव्ययें कवितेंत ऱ्हस्व व दीर्घ ईकारान्त करितात; जसें,—करून, करुनि, करुनी; बोलून, बोलुनि, बोलुनी; पासून, पासुनि, पासुनी; जवळ, जवळि, जवळी; प्रत, प्रति, प्रती; च, चि, ची; आंतून, आंतुनि; इत्यादि.

(१०) ‘ऊन’ प्रत्ययान्त अव्ययें केव्हां ‘ उनियां, ’ ‘ ऊनियां ’ अशीं करितात, जसें,— जाऊन, जाउनियां, जाऊनियां; आंतून, आतुनियां; इत्यादि.

(११) सर्वनामांस ‘ वीं ’ प्रत्यय लागून अव्ययें होतात; जसें,—जेवीं, तेवीं, केवीं, इत्यादि. हीं कवितेंतच येतात यांतलें एरवीं, एरव्हीं, एवढें मात्र गद्यांत येतें. जेव्हां, तेव्हां, केव्हां, यांबद्दल जेधवां, तेधवां, केधवां, अशीं रूपें येतात.

(१२) विभक्त्यर्थक अव्ययांपैकीं कांहीं फक्त कवितेंतच येतात. तीं मागें सांगितलींच आहेत. (क० ५६.)

## ३१—मराठी भाषेची उत्पत्ति आणि वाढ यांचा संक्षिप्त इतिहास.*

फार प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत मुख्यतः दोन प्रकारच्या लोकांनीं येऊन वस्ती केली. एक द्रवीड लोक; यांचे वंशज सांप्रत मुख्यतः सर्व मद्रास इलाखा, मुंबई इलाख्यांतील कर्नाटकप्रांत, म्हैसूर आणि कुर्गप्रांत, व निजामच्या राज्यांतील आग्नेयीकडील सर्व प्रदेश ह्या ठिकाणीं राहात आहेत. यांच्या ज्या भाषा त्या **द्राविडी** भाषा होत. दुसरे **आर्य** लोक; ह्यांचे वंशज बाकीच्या सर्व हिंदुस्थानभर राहात आहेत. या दोन लोकांमध्यें पुढें आपसांत भेसळही पुष्कळ झाली आहे. आर्य लोकांच्या ज्या भाषा त्या **आर्य-भाषा** होत. **मराठी** भाषा ही या आर्यभाषांपैकीं एक भाषा आहे.

आर्य लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांची सामान्यतः एक भाषा होती. परंतु आज जसे मराठीचे देशी, कोंकणी, वऱ्हाडी, खानदेशी, असे पोटभेद आहेत, तसे तिचेही पोटभेद होते. या भाषेंतलें वाङ्मय म्हणजे आर्य लोकांचे प्रख्यात धर्मग्रंथ **वेद** हे होत.

पुढें आर्य लोक उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र पसरून चोहींकडे राहूं लागल्यावर त्यांच्या भाषा बदलत जाऊन त्यांच्यामध्यें असलेला फरक वाढत चालला, आणि हल्लीं जशा मराठी, गुजराथी, हिंदी, बंगाली, पंजाबी, उडिया वगैरे निरनिराळ्या प्रांतांतील देशभाषा आहेत तशा निरनिराळ्या भाषा तयार होऊं लागल्या. तेव्हां विद्याव्यासंग करणारे लोक यांनीं त्या भाषांपैकीं जी मुख्य उपभाषा होती, ती घेऊन ती कायमची एकसारखी राहावी अशी तजवीज केली. ही मुख्य उपभाषा म्हणजे आज जशी आपण पुणें प्रांतांतील मराठी भाषा मुख्य म्हणून समजतों, तशी होती; आणि आपण ज्याप्रमाणें सांप्रत सर्व ग्रंथ वगैरे या भाषेंतच लिहितों, तसेंच त्या वेळचे विद्वान् लोक करीत असत. ही भाषा नेहमीं कायमची व उत्तम असावी म्हणून तिचें व्याकरण लिहून तींतील शब्द, रूपें, भाषणप्रकार, वगैरे पक्के ठरवून टाकले, आणि ती निरंतर तशीच राहिली पाहिजे असा सक्त नियम केला. याप्रमाणें ही पोटभाषा **संस्कृत** म्हणजे उत्तम तयार केली म्हणून हिला **संस्कृत**,

* हें प्रकरण शिक्षकांसाठीं आणि प्रौढ विद्यार्थ्यांकरितां आहे.

**गीर्वाण, देवभाषा,** इत्यादि नांवें पडलीं; आणि बाकीच्या आर्यभाषांना पुढें **प्राकृतभाषा** असें म्हणूं लागले. तथापि त्या वेळच्या निरनिराळ्या आर्यभाषा आणि ही संस्कृतभाषा, या सर्वांना **संस्कृत** किंवा **गीर्वाण** असें एकच नांव देण्याचीही चाल आहे.

कोणी विचारील कीं असा कृत्रिम प्रकार कसा झाला ? भाषा कोणाला ठरवितां येते कीं काय ? तर याचें उत्तर देणें मुळींच कठीण नाहीं. आर्य लोकांतील विद्याव्यासंगी लोकांनीं म्हणजे ब्राह्मणांनीं वेद, उपवेद, शास्त्रें, वगैरे अगदीं अक्षरही न बदलतां आज हजारों वर्षें जशींच्या तशींच कशीं राखिलीं आहेत ! शिवाय या संस्कृत भाषेचें व्याकरण कसें अगदीं पूर्ण नियमबद्ध आहे ! दुसरी गोष्ट अशी आहे, कीं ही ठरींव भाषा केवळ विद्याव्यासंगाची भाषा म्हणून चालू राहिली. लोक-व्यवहार प्राकृत भाषांमध्यें चालत. भाषा बदलत जाते ती लोक-व्यवहारांत बदलत जाते. याच कारणानें **संस्कृत** भाषा पुरातन काळापासून अजूनपर्यंत आर्यसारस्वताची भाषा म्हणून बहुतेक जशीच्या तशीच चालू आहे.

**संस्कृत** भाषेच्या बरोबरच्या ज्या इतर आर्य-उपभाषा त्यांतील वाङ्मय म्हटलें म्हणजे वेदादि फार प्राचीन ग्रंथ होत. त्यांतील निरनिराळे भाग मुळारंभीं ज्यांनीं लिहिले, त्यांनीं आपापल्या प्रांतिक उपभाषेंत लिहिले असतील; पण ते जसेच्या तसे राहिले नाहींत. वर सांगितल्याप्रमाणें **संस्कृत** भाषा बनल्यावर त्यांत **संस्कृत** भाषेशीं जुळण्यासारखे फेरफार केलेले असलेच पाहिजेत. तथापि त्या ग्रंथांतून **संस्कृत** भाषेच्या व्याकरणपद्धतीशीं जुळणार नाहींत असे भाषेचे प्रकार अजून पुष्कळ आढळतात. हे वैदिक प्रकार होत, असें संस्कृत व्याकरणांत ठिकठिकाणीं म्हटलें आहे. हेंच ते ग्रंथ त्या वेळच्या निरनिराळ्या प्रांतिक उपभाषांमध्यें लिहिलेले होते, याचें प्रमाण होय.

**आर्यभाषा** व्यवहारांत कोठपर्यंत चालू होत्या, हें ठरविण्यास चांगलेंसें साधन नाहीं. बौद्धधर्मसंस्थापक **गौतममुनी** हा इसवी सनाच्या पूर्वीं सहाव्या शतकांत झाला. त्याच्या वेळीं **प्राकृत** भाषा जारीनें सुरू होत्या. तसेंच इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत झालेला प्रख्यात बौद्ध चक्रवर्ती **अशोक** यानें आपलीं धार्मिक शासनें निरनिराळ्या ठिकाणीं चालू असलेल्या निरनिराळ्या प्राकृत भाषांत कोरून ठेविलीं आहेत. यावरून त्या सुमारास **प्राकृत** भाषा उत्तम रीतीनें प्रचारांत होत्या, आणि संस्कृताच्या बरोबरीच्या आर्यभाषा सुमारें इसवी सनाच्या पूर्वीं सातव्या शतकांत अप्रचलित झाल्या, म्हणजे त्यांसच **प्राकृत** भाषा म्हणूं लागले, असें दिसून येतें.

निरनिराळ्या **प्राकृत** भाषा ह्या तेव्हांपासून इसवी सनाच्या आठव्या शतकापर्यंत चालू होत्या. त्या वेळीं सर्व देश धार्मिक आणि राजकीय चळवळी, व्यापार, इत्यादि गोष्टींनीं भरभराटींत होता असें इतिहासावरून दिसतें. या प्राकृत भाषांत बौद्धधर्म, जैनधर्म यांचे व दुसरे अनेक काव्यें, नाटकें, वगैरे ग्रंथ झाले आहेत. तेव्हां या भाषाही भरभराटींत होत्या असें दिसतें. नंतर आर्यलोकांची वस्ती फार विस्तृत होऊन भाषाशास्त्राच्या नियमांप्रमाणें सुमारें आठव्या, नवव्या आणि दहाव्या शतकांत या भाषांमध्यें फरक पडत गेला आणि त्यांपासून मराठी, गुजराथी, हिंदी, बंगाली, वगैरे निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या देशभाषा बनल्या. तेव्हां एथपर्यंतची भाषापरंपरा-( १ ) **आर्यभाषा** किंवा **संस्कृत**, ( २ ) **प्राकृत** आणि ( ३ ) **देशभाषा** अशी होय.

या वेळीं वऱ्हाडप्रांत, नागपूर व बालाघांटपर्यंतचा प्रदेश, जबलपूर, सागर, हे प्रांत, खानदेश, आणि यादव राजांची राजधानी जी देवगड तिच्या भोंवतालचा बराच मोठा प्रदेश, कोंकण आणि हल्लींचा पूर्व व पश्चिम महाराष्ट्र या प्रदेशांत **महाराष्ट्री** या नांवाची प्राकृत भाषा चालू होती. या प्राकृत भाषेचें स्वरूप बदलत जाऊन जी देशभाषा तयार झाली, ती **मराठी** भाषा होय. ही भाषा सुमारें इसवी सनाच्या आठव्या शतकामध्यें बनली असावी; कारण दहाव्या शतकापासून शुद्ध **मराठी** भाषेंत लिहिलेले असे शिलालेख वगैरे आढळूं लागतात.

मूळच्या ज्या **आर्यभाषा**, त्यांत फरक होऊन **प्राकृत भाषा** झाल्या व पुढें त्यांत फरक होऊन **देशभाषा** झाल्या, म्हणजे काय झालें, हें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. देशांतरानें भाषा बदलते, बारा कोसांवर भाषेंत फरक होतो, अशी मराठींत म्हण आहे. त्याचप्रमाणें कालांतरानेंही भाषेंत फरक पडत जातो. लोक आपल्या सोयीप्रमाणें बोलण्याचा प्रयत्न करितात. बोलण्याचा कठीण प्रकार असेल तो सोपा करितात. अशा रितीनें प्रथमतः एकादी भाषा असेल तींत फरक होऊन दुसरी होते. याप्रमाणें कालांतरानें फेरफार होऊन जुन्या भाषांच्या नव्या भाषा बनत जातात. मूळच्या आर्यभाषांच्या प्राकृत भाषा, प्राकृतांच्या देशभाषा, हा प्रकार अशाच रितीनें झाला. किंवा असेंही म्हटलें तरी चालेल कीं, सांप्रतची आपली मराठी भाषा ही फार प्राचीनकाळच्या एका आर्यभाषेचें कालांतरानें फेरफार होत जाऊन बनलेलें नवीन स्वरूप होय.

संस्कृत भाषा ही मात्र मुद्दाम ठरवून टाकल्यामुळें अशा रितीनें फिरली नाहीं. ती तेव्हांपासून आतांपर्यंत अगदीं बहुतेक जशीच्या तशीच राहिली आहे. **संस्कृत** भाषेंत शब्दादिकांचा मोठा भरणा आहे. त्यामुळें **प्राकृत भाषा** आणि **देशभाषा** यांना ती भाषा म्हणजे एक शब्द-भांडारच

होऊन बसलें आहे. त्या भाषेंतून प्राकृत भाषांनीं आणि देश-भाषांनीं निरनिराळ्या वेळीं लागतील तसे शब्द, व्याकरणाचीं रूपें आणि प्रत्यय, आणि तसेच भाषासांप्रदाय, वगैरे घेतले आहेत, आणि अद्यापिही घेण्याचा क्रम सारखा चालूच आहे.

प्राकृत आणि देशभाषा यांनीं आर्यभाषा आणि संस्कृत यांतून जे शब्द घेतले आहेत ते कठीणांचे सोपे करून आणि अनेक फेरफार करून घेतले आहेत. तसेंच, मूळच्या व्याकरणसंबंधाच्या आणि भाषापद्धतीच्या गोष्टीही फेरफार करून घेतल्या आहेत. जसें, मूळच्या पांच चार काळांच्या रूपांतून देशभाषेंत एकाददुसऱ्याच काळाचीं रूपें घेतलीं आहेत; इत्यादि. शब्दांमध्यें फेरफार करून घेणें यास **अपभ्रंश** असें म्हणतात. **अपभ्रंश** म्हणजे चांगल्याचें वाईट होणें, असा वाईट अर्थ आहे. या शब्दांना हें नांव देणें बरोबर नाहीं. यासाठीं यांस **परिणत शब्द** असें नांव देऊन या फेर-फारास **परिणति** असें म्हणावें; आणि असे घेतलेले जे शब्द त्यांस **तद्भव शब्द** म्हणजे मूळच्या शब्दापासून झालेले शब्द, असें म्हणतात. तसेंच कित्येक शब्द फेरफार न करितां जसेच्या तसेच घेतात. यांना **तत्सम** म्हणजे मूळचेच घेतलेले किंवा मूळच्या शब्दांसारखे असलेले शब्द असें म्हणतात. जसें,—**बदर** याचें प्राकृत **बअर**, मराठी **बोर**; **ताम्बुलिक**,—प्राकृत **ताम्बूलिअ**, मराठी **तांबोळी**; हे **तद्भवाचे** प्रकार होत; आणि गुरु, कवि, मति, भानु, तरु, वगैरे शब्द जसेच्या तसेच घेतले आहेत, हे **तत्सम** शब्द होत. कित्येक शब्दांमध्यें केवळ देशभाषेच्या पद्धतीला साजण्यासारखा असा थोडाच फेरफार करून घेतात. हा तिसरा प्रकार आहे. जसें, **रीति, रीत, गति, गत, पद्धति, पद्धत**, इत्यादि. हे शब्द बहुतेक **तत्सम** शब्दच होत. मूळच्या शब्दांचे **प्राकृत** किंवा **देशी** शब्द करून घेणें अथवा मूळचे प्रत्यय वगैरे बदलणें आणि देशभाषेंत शब्द तयार होणें, या गोष्टींच्या संबंधानें कांहीं ठरींव नियम आहेत, त्याप्रमाणें हे फेरफार होत आले आहेत. हे नियम आणि त्यांचीं उदाहरणें या अल्पलेखांत देतां येत नाहींत. मराठी भाषेंतील विभक्तींचे प्रत्यय आणि क्रियापदांचे प्रत्यय, तसेच दुसऱ्या प्रकारचे अनेक प्रत्यय, समासांची पद्धत, वगैरे प्रकार मूळ संस्कृतावरून आलेले आहेत असें उघड दिसून येतें. तसेंच मराठींतील सुमारें शेंकडा नव्वदांहून जास्त शब्द मूळच्या आर्य किंवा संस्कृत भाषेंतून घेतलेले आहेत. कित्येक शब्द मूळचे संस्कृतांतले नसून येथच्या मूळच्या रहिवाशांच्या भाषांतले असावे असें वाटतें, असले शब्द जुन्या आर्यभाषा आणि संस्कृत भाषा यांतही आढळतात. परंतु ते ओळखून निराळे निवडून काढणें हें आतां बहुतेक अशक्य झालें आहे.

मराठी भाषेची सुमारें तेराव्या शतकापर्यंतची स्थिती पाहिली तर तींत

मूळचे आर्यभाषांतून आलेले शब्द आणि **तद्भव** शब्दच बहुतेक होते. कांहीं त्या वेळच्या भोंवतालच्या अन्य भाषांतले शब्दही असतील. त्या वेळचे ग्रंथ **ज्ञानेश्वरी** वगैरे यांत असाच प्रकार आढळतो. पुढें मुसलमान लोकांचा प्रवेश इकडे झाल्यावर आरबी आणि फारशी शब्द भाषेंत आले. नंतर मुसलमानी अंमल नाहींसा झाल्यापासून, संस्कृताचा अभ्यास जास्त सुरू होऊन संस्कृत भाषेंतले शब्द मराठी भाषेंत येऊं लागले आणि हे परकी शब्द जात चालले आहेत.

ज्ञानदेवानंतरचे कवि जास्त पढीक आणि संस्कृताचा विशेष अभ्यास करणारे होत गेले, यामुळें **तत्सम** शब्द घेण्याचा प्रघात वाढत जाऊन अखेरीस नवीन **तद्भव** शब्द बनविण्याची वहिवाट अजीच बंद पडली. पुढें इंग्रजी अंमल झाल्यावर संस्कृताचा अभ्यास आणखी जास्त झाल्यामुळें मराठी भाषेंत **तत्सम** शब्दच फार येऊं लागले आहेत.

याशिवाय मराठी भाषेंत महाराष्ट्राच्या भोंवतालच्या प्रांतांत चालणाऱ्या भाषा ज्या कानडी, हिंदी, गुजराथी, त्यांतले शब्द पुष्कळ आले आहेत. पुढें युरोपियन लोक इकडे आल्यानंतर फ्रेंच आणि पोर्तुगीज या भाषांतून थोडेसे, आणि इंग्रजी भाषेंतून बरेचसे शब्द मराठींत आले आहेत.

एकच भाषा झाली तरी ती सर्व प्रांतभर एकसारखीच बोलत नसतात. तिच्यामध्यें ठिकठिकाणीं फरक असतो. हा फरक विशेषतः लक्षांत घेण्यासारखा असला म्हणजे उपभाषा होतात. मराठी भाषेच्या गणण्यासारख्या उपभाषा अशा आहेतः—( १ ) पुण्याची किंवा देशी; ही मुख्य मराठी भाषा गणलेली आहे; ( २ ) कोंकणी ( गोवें प्रांतांतील ); ( ३ ) मालवणी; ( ४ ) चितपावनी; ( ५ ) मुंबई प्रांतांतील, विशेषतः परभू लोकांची; ( ६ ) कोल्हापूर प्रांतांतील; हिच्यावर कानडीचा पगडा फार आहे; ( ७ ) वऱ्हाडी; ( ८ ) नागपुरी; आणि ( ९ ) खानदेशी; हिच्यावर गुजराथीचा पगडा आहे. याशिवाय एक वेळ मराठी राज्य दूरवर पसरलें होतें, यामुळें तंजावरी, इंदुरी, वगैरे असेही भाषेचे प्रकार झाले आहेत.

**मराठी वाङ्मयः**—जुनें मराठी वाङ्मय बहुतेक कविताबद्धच आहे. हें फार मोठें असून त्यांतील ग्रंथही उत्तम प्रकारचे आहेत. हे सर्व वेदान्त, भक्तिमार्ग आणि पौराणिक आख्यानें यांवर आहेत. या ग्रंथांच्या भाषेवरून मराठी वाङ्मयाचे चार प्रकार होतातः—

( १ ) ज्ञानदेवाचा म्हणजे जुना काळ; (२) एकनाथाचा म्हणजे मध्यकाळ; ( ३ ) रामदास स्वामींचा म्हणजे तिसरा काळ आणि ( ४ ) मोरोपंताचा म्हणजे अर्वाचीन काळ. हा प्रत्येक काळ आणि त्यांतील मुख्य कवि असे आहेतः—( १ ) ज्ञानदेवाचा काळ, आरंभापासून सुमारें १५५० पर्यंत; कवि ज्ञानदेव, मुकुंदराज, नामदेव. ( २ ) एकनाथाचा काळ, सन १५५० पासून

१६५० पर्यंत; कवि एकनाथ, मुक्तेश्वर, रघुनाथपंडित, आनंदतनय, विठ्ठल, श्रीधर. ( ३ ) रामदासाचा काळ १६५० पासून १७५० पर्यंत; कवि रामदास, तुकाराम, वामन. ( ४ ) मोरोपंताचा काळ, १७५० नंतर; कवि मोरोपंत, महिपति, अमृतराय, रामजोशी, अनंतफंदी.

हे जे कवींचे चार काळ त्यांतील भाषेचे प्रकार असे आहेतः—ज्ञानदेवाच्या वेळच्या भाषेंत जुने आणि तद्भव शब्द फार; तत्सम शब्द फार कमी. लोकांत चालूं असलेल्या भाषेंत लिहिण्याचा मुख्य प्रयत्न एकनाथाच्या काळांत झाला. त्या वेळच्या भाषेंत आपल्यास फार जुने वाटतील असे शब्द थोडे व तत्सम शब्द जास्त येऊं लागले, आणि कित्येक आरबी आणि फारशी शब्द आले. तसेंच या काळच्या कवींच्या भाषेंत कवित्व जास्त सुरू झालें. या काळांत वेदान्तपर कविता जास्त झाली. रामदासाच्या काळांतल्या कवींची भाषा दुसऱ्या काळांतल्या भाषेपेक्षां अधिक सोपी, आणि तींत तद्भव शब्द कमी आणि तत्सम शब्द जास्त. या काळांतल्या कवींच्या वर्णनामध्यें केवळ वेदान्तापेक्षां लोकव्यवहाराकडे जास्त लक्ष दिलेलें आढळतें. मोरोपंताच्या वेळीं तद्भव शब्द नवीन घेणें मुळींच बंद झालें; तत्सम शब्द फार येऊं लागले; कवितेची रचना संस्कृताप्रमाणें करण्याकडे प्रवृत्ति विशेष झाली आणि सुंदर वर्णनें आणि अलंकार पुष्कळ आले.

या सर्व मराठी कवींनीं भक्ति, ज्ञान—वैराग्य, इत्यादि विषयांवर आणि रामायण-भारत-भागवतांतील पौराणिक आख्यानांवर कविता लिहिली आहे. शिवाय मागें सांगितलेल्या चारी काळांत निरनिराळ्या कवींनीं उपदेशपर आणि भक्तिपर पदें पुष्कळ रचिलीं आहेत.

मराठी गद्यमय ग्रंथरचना मराठ्याचें राज्य स्थापन झाल्यानंतर पुष्कळ झाली आहे. राजकीय प्रसंगांच्या बखरी, हकीकती आणि टिपणें आणि कित्येक पुरुषांचीं चरित्रें, अशा रितीनें या वेळचा गद्यमय ग्रंथसंग्रह पुष्कळ असून उत्तम प्रकारचा आहे. त्याप्रमाणें या काळांत रचलेले ऐतिहासिक-वर्णनपर पवाडेही पुष्कळ आणि चांगल्या प्रकारचे आहेत. याच काळांत पौराणिक आख्यानांवर लावण्यांच्या चालींचीं पदें अनेक रचिलेलीं आहेत. यांचा भरणा दक्षिणेंतील जंगम आणि लिंगाईत लोकांजवळ फार आहे.

याप्रमाणें सरासरी इंग्रजी राज्यस्थापनेपर्यंतचा मराठी भाषेचा संक्षिप्त इतिहास सांगितला. पुढील इतिहास अगदीं नवीन असल्यामुळें तो लिहिण्याची वेळ आली नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

समाप्त.

